श्री

# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें.

## भाग २ रा.



शिंदेसरकारचे वकील गुलगुले

यांचे दफ्तरांतील

**श्रीमंत गायकवाड, पेशवे, पवार व होळकर**

राजघराण्यांचा असल पत्रव्यवहार.

१७९४ ते १८७१ विक्रमी.

संपादक,

आनंदराव भाऊ फाळके

मुद्रक,

य. ता. माणगांवकर, आलीजाह दरबार प्रेस,

लष्कर, ग्वाल्हेर.

१९३०

# सूचीपत्र.

## विषयसूची.

## चिन्हसूची.

❋ असल पत्राची तारीख.

* पैवस्तीची तारीख.

† † पत्र व पैवस्तीखेरीज अन्य तारीख.

ᛘ हस्ताक्षर कनिष्ठ अधिकारी.

† ,, वरिष्ठ अधिकारी.

卍 ,, राजमुद्रा.

# ग्रंथसूची.

| | | |
|---|---|---|
| २ | खरे. यशवंत वासुदेव | मराठी राज्याचा उत्तरार्ध. भाग १. १९२७ |
| ३ | खरे. वासुदेव वामन शास्त्री | ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ७, ८, ९ |
| १ | आपटे. दत्तात्रय विष्णु | इतिहासमंजरी शके १८४५ |
| ४ | तारीख | जागीरदारान. भाग १, २ .. १९१३ |
| ५ | नातू. विष्णु रघुनाथ | आलिजाह बहादुर माधवराव शिंदे .. यांचे चरित्र .. .. १८९४ |
| ६ | पारसनीस. दत्तात्रय बलवंत | श्रीब्रम्हेंद्रस्वामी यांचें चरित्र १९०० |
| | | इतिहाससंग्रह. भाग २, ३, ५, ६, २० |
| | | शिंदेशाही पत्रव्यवहार .. .. |
| ७ | पुरंदरे. कृष्णाजी वासुदेव | पुरंदरे दप्तर. भाग १ .. १९२९ |
| ८ | भागवत. अनंत नारायण | होळकरशाही इतिहासाचीं साधनें भाग १. १९२१ |
| ९ | भारतेतिहास मंडळ. | चंद्रचूड दप्तर. कला १ शके १८४२ |
| | | चतुर्थ संमेलन वृत्त .. १८३० |
| | | फार्शी मराठी कोश .. १९२५ |
| १० | रघुनाथ यादव [ विरचित ] | पाणिपतची बखर .. .. १९१४ |
| ११ | राजवाडे. काशिनाथ विश्वनाथ | मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १, २, १०, ११, १३, १४ १९०० |
| | | एतिहासिक प्रस्तावना .. १९२७ |
| १२ | राजाध्यक्ष नरहर व्यंकाजी | जिवाजी बल्लाळ केरकर यांचे चरित्र .. .. १९०७ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | राजे. धोंडो मोरेश्वर | इंदुर संस्थानची बखर .. | १९०० |
| १४ | लेले. काशीनाथ कृष्ण | धार संस्थानचा इतिहास .. | १९१८ |
| १५ | वाड. गणेश चिमणाजी | बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी. भाग ३ विभाग १ | १९०७ |
| १६ | सरदेसाई. गोविंद सखाराम | नानासाहेब पेशवे .. | १९२६ |
| १७ | साने. काशीनाथ नारायण | भाऊसाहेबांची बखर .. | १९२२ |
| | | होळकरांचीं कैफियत. | शके १८०८ |
| १८ | सत्कर्योत्तेजक सभा धुळें | इतिहास आणि ऐतिहासिक [ पेशवाईची अखेर ] | १९०७ |
| १९ | संशोधक | शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग १. | १९३० |
| | | इतर-अप्रकाशीत पत्रें | |

ENGISH.

| | | | |
|---|---|---|---|
| 1. | Aitchison C. W. | Treaties and Engagements vol iii, iv. | 1893 |
| 2, | Broughton Capt. D. | Letters from a Maratha Camp | 1892 |
| 3. | Compton Herbert | European Military Adventurers of Hindusthan, | 1892 |
| 4. | Luard Capt C, E. | Gwalior Gazetteer vol i ... | 1908 |
| 5. | Malcolm Maj-Gen. Sir John. | Memoirs of Central India vol i | 1880 |
| 6, | Prinsep H. T. | Memoirs of Mohamad Amir Khan | 1832 |
| 7, | Tod. Col James | Annals and Antiquities of Rajasthan, vol ii. | 1914 |

श्रीकृष्ण

# शिलेदाराची भालेराई.

पुढें गेले त्यांचा शोधीत मारग ।
चला जाऊं माग घेत आम्हीं ॥
— श्रीतुकाराम

'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें' या मालेचा हा द्वितीय भाग ईश्वरकृपेनें इतिहासभक्तांस सादर करण्याचा हा सुयोग लाभत आहे. या भागांत आलेलीं सर्व पत्रें बहुशः 'गुलगुले संग्रहांतून' वेचलेलीं असून त्यांची संख्या १९९ होते. हीं सर्व पत्रें म्हणजे पेशवे, पवार, गायकवाड व होळकर यां चार राजघराण्यांतील व्यक्तींचा पत्रव्यवहार होय. गायकवाडांचें कार्यक्षेत्र गुजराथपुरतेंच मर्यादित असल्यामुळें आणि पेशवे, पवार व होळकर यांचे वेगळे 'वकील' व स्वतंत्र 'कमाविसदार' कोट्यास रहात असल्यामुळें गुलगुल्याशीं कारणपरत्वें त्यांचा जितका संबंध आला तेवढ्यापुरताच हा प्रासंगिक संग्रह असून तो पहिल्या भागांत दर्शविल्याप्रमाणें त्रोटक व तुरळक स्वरूपांत निघावा हें क्रमप्राप्तच आहे. [ भाग १ भालेराई ४ ] अर्थात् याविषयीं अन्य अपेक्षा ठेवणें योग्य होणार नाहीं.

वरील चार घराण्यांतील पुरुषांचीं एकंदर ३०० पत्रें 'संग्रहांत' सांपडलीं त्यांतून किरकोळ व क्षुल्लक पत्रें वगळून बाकी १९४ निवडक पत्रें या भागांत छापलीं आहेत. केवळ पांच पत्रेंच संग्रहा बाहेरचीं आहेत. [ लेखांक ५, ६, ८, १६, १७. ] हीं पांच पत्रें मिळवून या भागांतील एकंदर पत्रांची संख्या १९९ होते. यांचा कालानुक्रम संक्षेपतः सांगावयाचा म्हणजे सुमारें ७० पत्रें पूर्वपानिपतीय असून शेष पानिपतोत्तर कालांत मोडतात. पेशव्यांचीं १८, पवारांचीं १०, गायकवाडांचीं २ व होळकरांचीं १६९ अशीं घराण्याच्या मानानें पत्रांची फाळणी होते. हें घराणेंवार प्रमाण लक्षांत घेतां होळकरांचेंच पारडें जड झालें आहे. याहिपेक्षां तें अधिक भारी झालें असतें तरी त्याबद्दल वैषम्य न वाटतां खरोखर संतोषच वाटला असता. कारण संशोधनाला ती गोष्ट इष्टच होती. सिवाय शिंद्यांचे 'सोबती' ह्या नात्यानें होळकरांचीं जितकीं साधनें बाहेर येतील तेवढीं हवींच आहेत. या हेतूनेंच स्वतंत्र भाग रचण्याची मूळ कल्पना होती पण ती सफळ होऊं शकली नाहीं असें स्पष्टच सांगणें भाग आहे. पेशवे व होळकर यांचीं जीं अनेक पत्रें अवलोकनांत होतीं तीं सर्वच प्रसिद्धीसाठीं या वेळीं लाभलीं असतीं तर केवळ होळकरांचाच नव्हे पण पेशव्यांचासुद्धां एक स्वतंत्र खंड सादर करता आला असता. हा भाग थोडा लांबणीवर टाकूनही तीं साधनें अनुकूल झालीं नाहींत याबद्दल खेद वाटतो. अस्तु. पेशवे, पवार व गायकवाड यांच्या पत्रांचें अल्प प्रमाण पाहतां हा भाग होळकरशाहीचाच आहे असें म्हटलें असतां प्रत्यवाय होणार नाहीं.

पेशवाईसंबंधीं निरनिराळ्या दिशेनें अनेक साधनें उपलब्ध झालीं असून सध्यांही होत आहेत. या दृष्टीनें कोटा 'संग्रहांतील' हा साठा कांहींच नसल्यानें पेशव्यांविषयीं विवेचन करण्यास वाव नाहीं व तोच प्रकार पवार व गायकवाड यांच्या संबंधानें समजला पाहिजे.

जुन्या व जीर्ण पण चमत्कारी चिटोऱ्यांची चिरस्थायी चट लावणाऱ्या **विविधज्ञानविस्तार** व **काव्येतिहाससंग्रह** या दोन मासिकांतून जीं साधनें प्रकाशित झालीं तीं अप्राप्य असल्यामुळें होळकर शाही इतिहासावर त्यांचा काय परिणाम झाला हें सांगवत नाहीं. तथापि **राजवाडे, खरे** व **पारसनीस** या त्रिवर्गांनीं जे प्रयत्न केले ते विशेषतः प्रसंशनीय असून उल्लेखनीय आहेत. खरे शास्त्री यांनीं ३ पारसनिसांनीं ९ व राजवाड्यांनीं ११६ अशीं होळकर राजघराण्यांतील व्यक्तींचीं १२८ पत्रें प्रसिद्ध केलीं आहेत. हें प्रमाण कदाचित् परिमित वाटेल पण त्रिवर्गांच्या तत्कालीन अन्य साधनसंचयानुसार त्याचें परीक्षण केलें असतां तें ऐतिहासिक परंपरेंत परिवर्तन करविणारें आहे यांत शंका नाहीं.

होकरशाहीसंबंधीं राजवाड्यांच्या १, ३, ६, १०, १२, १४ या सहा खंडांप्रमाणेंच पारसनिसांच्या 'इतिहाससंग्रहाचे' २, १२, १४, १७, १८, २६ हे सहा भाग वाचनीय आहेत. तसेंच अलीकडे **होळकरशाहीचीं '[स्वतंत्र]' साधनें** एकत्रित करून तीं प्रकाशित करण्यासाठीं श्रीयुत **अनंत नारायण भागवत** यांची योजना झाली असून तिची फलश्रुति दोन भागांच्या रूपानें झालेली आहे व पुढेंही व्हावयाची आहे. ती पूर्णतया फलद्रुप झाल्यासिवाय होळकरशाहीचें खरें मर्म कळणें शक्य नाहीं. याही पेक्षां होळकरांचे दिवाण **चंद्रचूड** यांचा जो प्रचंड **संग्रह** पुणें येथील **भारतेतिहास मंडळाला** मिळाला आहे तो उघडकीस येण्यापूर्वीं होळकरशाहीचें रहस्य कळणार नाहीं. अर्थात् तोपर्यंत होळकरशाहीसंबंधानें तार्किक विधानें करणें प्रशस्त होणार नाहीं. हें बव्हंशीं खरें असलें तरी त्याच्या आशेवर फार दिवस तिष्ठत बसणेंही बरें वाटत नाहीं म्हणून हातीं असलेल्या पत्राधारेंच कांहीं गोष्टींचा टीपांत ऊहापोह करण्याचा यत्न केला आहे. यामुळें महत्वाच्या कोणी नवीन गोष्टी बाहेर येऊन एकाद्या विशिष्ट प्रसंगाचें स्पष्टीकरण झालें किंवा एकादी तुटलेली शृंखला जोडली गेली व या सर्वांचा होळकरशाही इतिहासांत नवीन भर पडण्याचा कामीं उपयोग झाला तर शिंद्यांचे 'जन्माचे सोबती व स्नेही' यांची अल्प सेवा घडली असें समाधान होईल. या भागांत उपयुक्त अशीं विशेष सामुग्री आली नसली तरी 'संग्रहांतील' सर्व पत्रें प्रसिद्ध झाल्यावर होळकरशाहीवर त्यामुळें नवीन प्रकाश पडल्यासिवाय राहणार नाहीं.

टीपांतून प्रसंगोपात् विवेचन केलें असलें तरी कांहीं ठळक ठळक गोष्टी दिग्दर्शनार्थ सुचविणें अगत्याचें आहे.

(१) मोगल बादशाहकडून महादजी शिंद्यांनीं '**नालखी**' मिळवून ती पेशवाईत प्रथम प्रविष्ट केली असा जो ग्रह प्रचलित आहे तो या पुढें तरी निदान बदलावा लागेल. कारण शिंद्यांच्या 'फरमानवाडी' पूर्वीं ४० वर्षें 'नालखीचा' प्रवेश पेशवाईत झाला होता असें साधार सिद्ध होतें. [ लेखांक २ ] नाना व महादजी या दोन इतिहासप्रसिद्ध पुरुषांची तुलना करतांना इतिहासक्षेत्रांत वादविवादास रंग चढविणाऱ्या १७९२ च्या फरमानवाडीस बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. या फरमानवाडीच्या दरबाराचें सायंत विवेचन करण्याचें प्रस्तुत प्रयोजन नाहीं. तथापि वरील गोष्टीचा विचार करीत असतां जीं उपलब्ध साधनें चाळावीं लागलीं व नालखीचा जो नवीन शोध लागला त्याच्या अनुरोधानें यासंबंधीं थोडें विवरण करणें अवश्य होतें.

छत्रपतीचे सेवक व मुख्य प्रधान या नात्यानें मोगलाकडून आलेल्या 'बहुमानाचा' स्वीकार करणें पेशव्यांस प्रशस्त होतें किंवा नव्हतें याचा निर्णय करण्याचा प्रसंग शिंद्यांनीं फरमानडीच्या रूपानें उपस्थित केला असतां त्याचा 'राजनीति' व 'व्यवहार' या दृष्टीनें 'तात्विक' विचार करणें नाना

फडणीसास प्रथमतःच प्राप्त झालें आणि असला ‘ बहुमान ’ घेणें अयोग्य होतें असा निवाडा नानानें दिला असतां केवळ शिंद्यांच्या ‘ आग्रहास्तव ’ त्याला मूग गिळून स्वस्थ बसावें लागलें असा इतिहासकारांचा या संबंधांत प्रायः इत्यर्थ आहे. [ नातू २४७, खरे भाग ९ पृष्ठ ४५८३ व भाइसं चतुर्थसंमेलन पान ८७-८८ ]

१७९२ या सालींच प्रथमतः असले बहुमान घेण्याची पेशव्यांस पाळी आली असें जें भासविलें जातें तें वस्तुतः भ्रांतिमूलक आहे असें स्पष्ट कळतें. कारण यापूर्वी अशा प्रकारचे तीन प्रसंग घडलेले कागदोपत्रीं प्रत्यक्ष पाहावयास मिळतात—

१. १७४५ सांत मेलसे मुकामीं ‘ फरमानवाडीचा ’ पहिला दरबार झाला. त्या वेळीं दिल्ली येथील पेशव्यांचे वकील हिंगणे याजबरोबर मोंगल बादशाहाकडून आलेला बहुमान नानासाहेब पेशव्यांनीं स्वीकारला आहे. [ राजवाडे खंड ६ लेखांक १७५ ]

२. १७५४ सालीं दुसरा प्रसंग रघुनाथराव दादासाहेब यांनीं पाठविलेल्या नालखीचा होय. [ लेखांक २ ]

३. १७७२ या सालीं तिसरा प्रसंग विसाजी कृष्ण बिनिवाले यानें थोरले माधवराव पेशवे यांचे कनिष्ठ बंधु नारायणराव पेशवे यांच्या नांवें ‘ मीरबक्षीगिरीचा बहुमान ’ मोंगलाकडून घेतला तो होय. [ खरे उत्तरार्ध पृष्ठ २४५ ]

अर्थात् १७९२ पूर्वी पेशवाईंत ‘फरमानवाडी’ झाली असून ‘बहुमान’ घेण्याची प्रमाणशीर प्रथा प्रस्थापित झालेली होती हा पुरावा वरील ग्रहाचें निराकरण होण्यास पुरें नाहीं काय ? महादजी शिंद्यांच्या ‘चरित्रकारास’ नवीन साधनें उपलब्ध तरी नव्हतीं पण त्यांचे ‘निबंधकार’ यांना या प्रश्नाचें ‘अंतरंग विषद करणारी पत्रें’ अनुकूल असतांही खरें रहस्य उमगूं नये याचें आश्चर्य वाटतें. या प्रकरणीं नानाचा विरोध असूयारहित होता असें जें प्रतिपादिलें आहे तेंही शंकास्पद वाटतें. हिंगणे वकील, रघुनाथराव दादा पेशवे किंवा विसाजी कृष्ण बिनीवाले या त्रिवर्गाकडून तीन वेळां आलेले बहुमान ग्राह्य ठरावेत पण शिंद्यांनीं आणलेला बहुमान अग्राह्य भासावा हा व्यवहार कोणता व ती नीति तरी कसली ? यास ‘ तात्विक विचाराचा ’ शुद्ध निष्कर्ष मानावयाचा काय ?

( २ ) १७४६ मधील बुंदेलखंडच्या मोहिमेस शिंद्यांस येऊन मिळण्यापूर्वी मल्हारजी होळकर यांची ‘स्वारी सुटलाणें, तांडा, पावागड, डोंगरपुर व उदेपूर या प्रांतीं’ होती असें पहिल्यानेंच समजतें. या स्वारीच्या बोधामुळें जिज्ञासा जागृत होऊन तत्संबंधीं विशेष वृत्तांत शोधण्याच्या कामीं हें एक उत्कृष्ट साधन उपलब्ध झालें आहे. [ लेखांक ३७ ]

( ३ ) माळव्याची वाटणी झाल्यानंतर शिंदेहोळकर स्वतंत्र ‘तहरह’ करीत असत. [ लेखांक ११, ३७ ] असले ‘ करार, तहरह [ व ] वाटण्या ’ प्रत्यक्ष पहावयासही मिळतात. [ लेखांक ५१, ५२, ६६ ७५, ७६, ७७, ] इतकेंच नव्हे तर वांटणीतत्वाविषयीं मल्हारजी होळकरांचे जे विचार प्रगल्भ झाले होते त्यांची चांगली जाणीव होते. [ लेखांक ३१, ७२ ]

( ४ ) पानिपतच्या घनघोर युद्धांत मराठ्यांचा पराभव झाल्यानंतर हिंदुस्थानची ‘अखत्यारी’ मल्हारजी होळकरांकडे सोपविली व नाना साहेब पेशवे देशीं परतले. या वेळीं होळकरांच्या शिरीं किती कामें होतीं व त्यांपैकीं त्यांनीं कोणकोणतीं बजावलीं याचें अनुमान करणें सोपें झालें आहे.

'ग्वाहेर झांसीचा बंदोबस्त करून होळकर रामपुऱ्याकडे आले. तेथें कोटेकरांस हातीं घेऊन जयपूरकर व तत्पक्षीय उमेदसिंग बूंदीकर, राजासिंग घोडचढा, सुरतराम पोता व अभेसिंग' इत्यादिकांची वाट लावून आपले कारभारी गंगाधर यशवंत चंद्रचूड आणि शिंद्यांकडील चिंतो कृष्ण वळे, व खानाजी जाधव सेनापति या त्रिवर्गांस कुंभेरीकर जाटाकडे पाठवून त्यांच्या मध्यस्तीनें अबदाली, सुजाउदौला व मोंगल बादशाहा इत्यादिकांशीं संधान राखून त्यांनीं जिकडे तिकडे स्थिरस्थावरता केली. किंबहुना याच संधीस चंद्रचूड, वळे, व सेनापति जाधव ही मंडळी 'मथुरा दिल्लीपर्यंत' स्वारीस गेली होती असें स्पष्ट कळतें आणि या कामगिरींत त्यांना बरेंच यश मिळालें असलें पाहिजे असें ग्रहित धरण्यास मुळींच संकोच वाटत नाहीं. [ लेखांक ६४, ७४, ] इतकेंच नव्हें तर बटवाऱ्याच्या लढाईचें जें वर्णन टॉडनें दिलें आहे तें विसंगत व विपर्यासात्मक आहे असेंही कळून येतें. [ लेखांक ६५ टीप ५२ ] या इतिहासकाराचा कल ऐतिहासिक सत्य सांगण्यापेक्षां मराठ्यांचा पाणउतारा करण्याकडे विशेष आहे असा ग्रह झाल्यावांचून रहात नाहीं.

(५) उत्तर हिंदुस्थानांत प्रवेश होऊन मराठ्यांचें प्राबल्य झाल्याबरोबर इकडील राजे रजवाड्यांनीं लौकीकी उपचारांनीं त्यांच्याशीं स्नेह वाढविण्याचा उपक्रम केला. त्यांतच राखीचा शिष्टाचार निर्माण झाला. याचें प्रत्यंतर पहिल्या भागांत आलेंच आहे. [ लेखांक १७९ टीप १९४ ] कोटेकर राणावतजी ही जशीं शिंद्यांची रक्षाभगिनी झाली होती त्याचप्रमाणें उलट व्यवहार म्हणून हरकूबाई होळकर ही जालीमसिंगाची रक्षाभगिनी असल्याचें मनोरंजक उदाहरण पहावयास मिळतें. [लेखांक १०६]

(६) मल्हारजी होळकर यांचें एक नवीन चित्र 'गुळगुळे वकील' यांच्या संग्रहीं सांपडलें. त्याचें रंगीत छायाचित्र चित्रकाराच्या नांवासह दिलें आहे. यद्यपि चित्रकारानें नांव व निवास बरोबर काळही दिला असतां तर त्याची महीमा वेगळीच झाली असती. अस्तुः पुढें त्याचाही शोध लागण्याचा संभव आहे.

(७) यशवंतराव होळकर यांनीं निरनिराळे ६ मराठी सिक्के वापरले आहेत. [ लेखांक १२९, १४५, १४६, १५१, १५५, १५६ ] अलीकडे जीं फारसीपत्रें अवलोकनांत आलीं त्यांवर त्यांचा फारसी सातवा सिक्का पहावयास मिळाला त्यांतील उतारा येणेंप्रमाणें:— 'जुबदतुल उमरा बहादरुल मुल्क फरजंद अरजुमंद आलीजाह महाराजाधिराज राजराजेश्वर जशवंतराव होळकर सुबेदार बहादर नुसरत जंग फिदवी शाह आलम बादशाह गाजी १२१६'

यासिवाय आणखीही कांहीं गोष्टी दर्शवितां आल्या असत्या पण त्या तितक्याशा महत्वाच्या नसल्यामुळें व त्यावेळच्या इतर पत्रांच्या नकला पूर्ण झाल्या नसल्यानें त्यासंबंधीं दिग्दर्शन केलें नाहीं. पूर्णपानिपतीय किंवा तत्कालिन ज्या मुख्य गोष्टी निदर्शनास आल्या तेवढ्याच संक्षेपतः सुचविल्या आहेत.

या भागांत प्रकाशित झालेल्या पत्रांचा हा प्रकार झाला पण पूर्वपानिपतीय अप्रकाशित असें जें एक साधन सांपडलें आहे त्याचा निर्देश करणें इष्ट आहे. दिवाण रामसिंगजी कछवा टांकेदार हरसी जिल्हे नरवर हे हल्लीं शिंदेशाहींत जागीरदार असून नरवरकर राजे यांचे हे वंशज होत. त्यांनीं आपल्या संग्रहीं असलेलें एक हस्तलिखित जुनें बाड मला अवलोकनास दिलें. तें थोडेसें वाचून पाहिल्यावर जरा चमत्कारिक पण चित्ताकर्षक वाटलें म्हणून समग्र चाळून पाहिलें. आश्चर्य हें कीं तो ग्रंथ सर्व काव्यमय इतिहासच निघाला. संवत् १७६१ पासून संवत् १८०१ पावेतों सुमारें ४० वर्षांचा इतिहास यांत दिलेला आहे.

या हस्तलिखित हिंदी पोथीचा आकार १३ इंच लांब आणि ९ इंच रुंद असा असून एकंदर पानांची संख्या २०८ आहे. पाठपोट लिहिलेल्या बंदास एक पान मानलेलें आहे, अर्थात् सुमारे ४१६ पृष्ठांचा हा ग्रंथ आहे. पृष्ठाच्या प्रत्येक बाजूवर २२ ते २८ ओळी लिहिलेल्या आहेत. ग्रंथाचें नांव '**खांडेराव रासो**' असें दिलें असून त्याचे 'कविसंग्रह' व 'जंगजस' असे दोन स्वतंत्र खंड केलेले आहेत. 'कविसंग्रह' या भागांत नांवाप्रमाणेंच अनेक कवींच्या कवितांचा संग्रह केला आहे. कवींची संख्या ५२ होईल. 'जंगजस' या प्रकरणाचा कर्ता मात्र एक असून त्याचें नांव जदुनाथ असें दिलें आहे. 'पृथ्वीराज रासो' या काव्याचा सुप्रसिद्ध कर्ता जो '**चंद बरदाई**' त्याचा हा जदुनाथ वंशज होय. नरवरकर राजे यांचा खांडेराय हा मंत्री होता. तो जातीचा 'सनोडिया ब्राम्हण' असून मोठा योद्धा व चतुर मुत्सद्दी होता. त्याचे तिघे पुत्रही पित्याप्रमाणेंच पराक्रमी निघाले. सर्वांत धाकटा पुत्र जो नवलराम त्याच्या अनुमतीनें 'जंगजस' या खंडाची रचना जदुनाथ कवीनें केली. 'भाद्रपद वद्य ५ भौमवार संवत् १८०५' [२० सितंबर १७४९] रोजीं हें काव्य त्यानें समाप्त केलें आणि 'वैशाख वद्य ७ मंगलवार संवत् १८०७' [७ मे १७५१] रोजीं 'बिजेपुर मुकामीं खेमराम कायथ श्रीवास्तव' यानें कविसंग्रह व जसजंग हे दोनी भाग एकत्रित करून ग्रंथित केले. तीच ही प्रत होय.

हें अनपेक्षित पण अपूर्व असें पूर्वपानिपतीय साधन जें उपलब्ध झालें आहे त्याची रूपरेषा काय व उपयुक्तता कोणती याविषयीं जिज्ञासा जागृत होऊन निदान त्याचें सार कळण्याची अभिलाषा उत्पन्न होणें साहाजिक आहे. सकृत्दर्शनीं याचें समर्पक समाधान करणें शक्य नाहीं. सारांश मात्र असा सांगतां येईल कीं, औरंगजेबाच्या शेवटच्या कारकीर्दीपासून थेट महमदशाहच्या अखेरी पर्यंतचा वर्णनात्मक हा हिंदी ग्रंथ असून त्यांत नरवरकर राजे व त्यांचा मंत्री [ खांडेराय ] यांचें चरित्र मुख्यतः रेखाटलें आहे. नरवरच्या अष्ट दिशेस वास करणारे बंडखोर जमीदार, बलिष्ठ राजे व बेबंद सुभेदार यांच्या कारस्थानामुळें नरवरकरांवर जे प्रसंग ओढवले ते प्रामुख्यानें कथिले असून मोगल बादशाहाचे आज्ञेनुसार दक्षिण, गुजराथ, दिल्ली व काबूल या देशांस स्वारीशिकारीसाठीं नरवरकर गेले त्याचें वर्णनही दिलें आहे. बहुशः प्रत्येक घटनेचें स्थल, वर्ष, मास, पक्ष व तिथी दिलीं असून कांहीं ठिकाणीं तर वेळही दिला आहे. हें काव्यच असल्यामुळें व तेंही नरवरकर राजे व मंत्री यांच्या प्रशंसापर असल्यानें कविकल्पनेची भरारी भरपुर असली किंवा वैयक्तिक वाखाणणीची अतिशयोक्ति दिसली किंतु त्या भरांत ऐतिहासिक कार्यकारणपरंपरेचा जो ओघ अप्रतिहत वाहावयास पाहिजे त्याची त्रुटी राहिली तरी त्यांतून बरेच इतिहासाचे धागेदोरे शोधून काढतां येतील असें वाटतें.

मराठेशाहीच्या इतिहासास याची उपयुक्तता कितपत प्रस्थापित होईल हें आज निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. तथापि [ छत्रपती ] **संभाजी** व **शाहु**, **बाजीराव** [ पेशवे ] व **मल्हारजी** [ होळकर ] यांचीं नांवें स्पष्ट दर्शविलीं असून औरंगजेबानंतर झालेल्या 'बादशाही गरदीत' प्रत्यक्ष वावरत असलेल्या अनेक कवींनीं आपल्या रसाळ वाणीनें जे उद्गार मराठ्यांसंबंधीं काढले आहेत त्यावरून उत्तर हिंदुस्थानांत या काळीं मराठ्यांविषयीं कोणती कल्पना रूढ झाली होती याचें अनुमान करण्यास हें एक उत्कृष्ट साधन होईल यांत मुळींच संकोच वाटत नाहीं. शिंद्यांचा उल्लेख कोठें आढळत नाहीं हें आश्चर्य आहे! अस्तु. मराठ्यांच्या कोणत्याही स्वारीचें स्वतंत्र सुसंगत व सविस्तर वर्णन यांत सांपडत नसलें तरी ज्या भूभागाचें वर्णन हा ग्रंथ देतो तो सर्व प्रदेश सांप्रत शिंदेशाहींत अंतर्भूत असल्यानें तत्कालीन स्थानिक परिस्थितीचें ज्ञान करविणारें साधन या मानानें याचा केवळ शिंदेशाहीसच नव्हे तर मराठेशाहीस अत्यंत उपयोग होणार आहे.

या ग्रंथाची नकल करण्याचें काम चालू आहे. तें समाप्त झाल्यावर त्यास स्वतंत्र भागाच्या रूपानें छापावा अशी इच्छा आहे. या कामास कांहीं कालावधी लागणारा असल्यानें परिचयार्थ त्यांतील कांहीं उतारे खालीं देत आहे.

**दोहा कृष्णकवि**

जौ रघुनाथ कृपाल हौ दीजै विद्या येह । षंडन राव सुराइसौं भाषा करौं सुनेह ॥
नृपकुल वरनैं प्रथमहीं पुनि द्विज षंडन वंस । परसरांम सौं तपबली त्यौं अवनी पर अंस ॥
सिंघासन पै रामजू सोभें सोभ अपार । व्हांतैं रविकुल प्रगट भौ बहुत नरेस कुंमार ॥
त्रेतावीतैं द्वापरहि सूरज वंस अनेक । दांन विधांन सुनीति में राजा भये विवेक ॥
कलिजुग मही अमल भयौ कछवाहैं नृपनाथ । आसकरन तिंहीं वंस मैं प्रगटे वुद्धि सनाथ ॥
है राजा नल आदि तैं नरवर गढ जागीर । साहि अकस कछु काल में भई तिन्हैं तागीर ॥
तैंहिं कुल मैं प्रगट भौ नृप अनूप तिहिं नांम । करी चाकरी साहि की नरवरगढ के कांम ॥
दयौ बहादुर साहिनैं नरवर गढ ततकाल । करि सलाम नृप साहि कौं नरवर भयौ बहाल ॥
रहैं सिवपुरी नग्र मैं करैं राज कौ भोग । कंवरू भये गजसिंघु तब तिनि कैं आछे जोग ॥
वरनौं विप्र सनौढिया खंडन की उतपाति । निर्मल ग्याति अठारहू वरननि मै सुभ जाति ॥
साषि ब्रह्म उपमंन्नि की कहं लौं गनौं अलेष । वुद्धिमांन साषे कहीं वरनौं वरन विसेष ॥
प्रथम उगत्ति सुमनि के पांडे भये उदोत । तिनि पांडे के वरनऊं साषिनि के बहु गोत ॥

**चौपही**

उदोत पांडे के राजारिषि भये । धरम दांन जिनि सुवरन दये ॥
जिनि कैं धूंमरिषि भये पुनीत । तिन नहीं करी जगत आनीत ॥

**दोहा**

फिरि गालारिषि पांडे भये महाधर्म के भाइ । ताही कुल मैं ऊपज्यौ पांडे त्रिजसु आइ ॥
वंस नागश्रम अवतर्‍यौ तिनिके सुत अजैश्रंम । धर्मधजा जा कैं वंधी पावै लिषौ सुक्रंम ॥
आनंद पांडे कैं भये महश्रंम पांडे नाह । तिहिं घर दुर्गा ऊपजे तिन नरहरि सुत गाह ॥

**चौपही**

नरहरी पांडे के परसराम । लौहौरे टोडरमल अभिराम ॥
तिहिं बंस भये पांडे गुपाल । तिनिके सूरति भये भवाल ॥

**दोहा**

उपमनि कुल सुनि उपज्यौ बिंद्रावन सौ धीर । ता बिंद्रावन कैं भये बली सुषंडन वीर ॥
षंडन रैया राव कैं भये पुत्र सुनि तीन । सूरतिराम लछिमन भये नवलरांम परवीन ॥
सूरतिरांम कुंवार कैं भये नैनसुख लाल । लछीराम कै तीनि सुत्त जेठे भये निहाल ॥
निवाजीराम मझिले भये लहुरे विक्रमाजीत । नवलरांम कैं अवतरे भुमिपाल सहजीत ॥

**दोहा कृष्णकवि**

नित उठि नृप दरबार मै जात सुषंडन रूप । मया करैं जा पै सदा श्री अनूप मन भूप ॥

साथ रहैं श्री कंवर कैं सैल सिकारैं रिंघ। कृपा करैं जिनि सौं सदा श्री कंवर गजसिंघ ॥
षंडन राव अमान का दिय पचास असवार। भटनावर सुभ नग्र मैं रहैं हमेस उदार ॥

इतिश्री कविसंग्रह विरंचिते षांडेराव रासौं समवो वंसावरी वरननो नांम प्रथमोप्रकास ॥

### कवित

लुकवासैं लोह जीत्यौ सद्दीषांन भयौ रीत्यौ बिकट पठाननि कीं काटि काढीं जाति है ॥
दृषिनि के दंडन दलनि देश मंडन सुरैया राव षंडन की फौजें फहराति है ॥
देस देस फेरा होत जमजूत जेरा होत तो सौं कौंन मांडे षेत षग्गनि की षाति है ॥
दृषिनि के दंडन दलनि देस मंडन सुरैया राव षंडन की फौजैं फहराती है ॥

### कवित्त करनकवि

इह उहई फौजैं डंगहाकीं उठीं लूटिवे कौं कालपी कर्लीजर समेति कौंच जरदी ॥
दिल्लीकौ तषतु दृषिनीनि नैंव जाइ लूटयौ मालवेकी वसुधा पूरनमल मरदी ॥
साम्हरि के सरि पै सवाई [ ? ] सहदानैं करे महता षजानौं लै अराबिनि की अरदी ॥
तेरैं धाक षंडन पुंमान गढ बावंनी मैं जांनी नही ग्वालियर पातिसाहि गरदी ॥

### बखतराय.

दृषिन के दलनैं झक झोरतु खीचीनु हाडानु गौरनिके गुर ॥
जद्दव के दल मैं दल दावतु वाग उठे नर सूरति के सुर ॥

### कवित्त भगवंतराय.

दंडत अदंड उषिल षंडन पुंमान तुम कूरम के दिल के करैया चितगाही के ॥
कहै भगवंत दौरि दृषिनी चलाये दल दंगल षिपाये तैं सीतून पातिसाहि के ॥
तौंवर पवांर जाट जादौं वा सिकरवार लीनैं देस जीति जे जबर गुमराही के ॥
ताकति रह न छलबल की काहू मैं जल कागद लौं गरिगे गुमान जाही ताही के ॥

### सवैया

भाट कि येसे बनै हम साखि कौं कोऊ हमारी करै नही सारी ॥
जैसी की तैसी कहैं मौहौ उपर राखत हैं कटि माझ कटारी ॥

### गाहा ?

सद्दीय षां उच्चरिय वयनं। नगदी चाकर रहियै अपनं ॥
संवत इकसठि कातिक मानह। सिवपुरी सुहर रहे संस्थानहं ॥

### छप्पय.

रहि पठांन चाकरी जाइ दरबार नित्त प्रति। सहस तीनि पठांन संग राजंत नंद दिति ॥
इक्क दिवस सद्दी पठांन दरबारह आइय। संग भीर उनमत्त सबै अंग कवच सजाईय ॥
कही सुनौ महाराज भूप अनूप बिचारिय। दांम दांम भर देहु तलबकौं अबै हमारिय ॥
बहु क्रोध नजरि असुरांनकीं बदबातैं सबहि कहिय। नही ज्वाबु दीन नृपराजनैं सुनि करि तब चुपु ह्वै रहिय॥
चल्यौ दूत पग जलद तकि भटनावर थांनहं। मध्यानहि रवि होत जाइ पौहौचंत अमानहं ॥

### दोहा.

सत्रहसै बासठि सही कातिक मास सुजांन । सुदि की छठि सबरे कहैं मंगलवार प्रमांन ॥

### छप्पय.

दीपमालिका बीति सरद रितु सबै सुहाइय । षष्ठी मंगलवार सज्यौ द्विजराज अवाइय ॥
बूढा डोंगर सुनिव म्लेछ डेरा कत भारिय । चारि सहस असवार जंग उनमत्त निहारिय ॥

### कृष्णकवि

कटे अर्ध सत षेत मैं फिरे जंग तजि सूर । भीर सबै पठांन लै चले समर तजि नूर ॥

### दोहा कृष्णकवि

प्रथम मीर तैमूर तैं डिल्लीपति सुलितांन । ता पाछैं बबरु भये फेरि हिमाऊं जांनि ॥
ब्रम्हचर्ज अवतार भौ तिहिं कुल अकबर साहि । करे जेर छत्री सबै सरन रहे अब गाही ॥

### छप्पय.

जहांगीरु फिरि भये तेज महिपै पसरंतह । साहिजिहांनि तिंहिं वंस उदित अवनी प्रगटं तहं ॥
आलमगीर उदार भये तिन वंस अमानह । अमलि सबै छिति अंत दसौ दिग्गज फुरमानह ॥

### दोहा.

सूबा पुर उजेनिकौ पायौ सेष सलैम । और फौजदारी किती तिनके कहौं सुयैम ॥
अमलि सबै गढ ग्वालियर छत्री दूंन कहाइ । अब नरवर गढ चलनकौं कीनौं सेष सुभाइ ॥
पुर पराइछौ नाम है नदी पार सुभ नैंम । रितु वसंत सुभ चैत मैं आयौ सेष सलैम ॥

### छप्पय.

करि डेरा सिंघनवास कैं समे ताल निहारिय । सुकल पक्ष सुभ चैत अधिक आनंद सुभारिय ॥
कियौ कूंच सलैम चैत सपक्षि बषानैं । उपमनि ऊपर कोपु कियौ सब सैंन सुजानैं ॥

### दोहा

सेष सलैम अनंद मैं पौरी दाषिल जान । भटनावर के लरन कौं भेज्यौ काइम षांन ॥
सत्रहसै करि वासठा वैसाषह बदि तीज । ता दिन पंडन राव सौं सेषनि होय नक्रीज ॥

### दोहा कृष्णकवि.

दक्षिन दिसि पर गज्जि कैं आलमगीर उदार । लगि पचासहि बरष लौं जहां बजायौ सार ॥

### चौपाई.

चारि पुत्र अवरंग कुंवारह । सूबा बांटि दिये तिनि बारह ॥
रषिय बहादुर दिल्लि थानह । आजम साहि सुसंग अमानह ॥

### छप्पय.

दषिन धर दिसि लगि कालवस भये अमानह । दिसां विदिसि षबरि जांनि नृपराजनि आंनह ॥
बहु इष्ट करामाती सकस भावई भूतनि ग्यान हुव । समसेर बहादरु तपबली अथे गयौ जिमि भांन भुव ॥

### दोहा.

कालु भयव अवरंग कौ आजम संग प्रतिछि । तषत आगरे कौं चल्यौ उमड्यौ साइर अच्छि ॥
बंधी सेन अवरंगकी आजम संग दऱ्याव । तिनिके नाम पतछि करि भाषा कहौ प्रभाव ॥

### छंद पाधरी

हाडा हठील विर दैंत संग । कहि रामसिंघ जुद्धनि उमंग ॥
दृषिन नरेस की सेना संग । जय जपत वीर जीतैं सुजंग ॥

### छप्पय

कूंच करिव दरकूंच साहि आजम सिरताजह । करि डेरा सिवपुरी रैंनि रहि येक अवाजह ॥
सैनसहित तट सिंघ आंनि नरवरगढ मिल्लिव । उपमन्नि संग अमान कंवर गजसिंघ सुहि ल्लिव ॥
उपमनि करि ततबीर धीर गज सिंघ कुवारह । दो सत संग असवार येक गजराज उदारह ॥
पैदल अद्ध हजार संग उनमत्त महाचर । सत्रहसै चौंसठा मास उत्तिम सुचैत धर ॥
हजरति आजमसाहि संग श्री गजसिंघ कुंवार । चले अकबराबाद कौं जुद्ध जुरन उपचार ॥
इत करिकरि दरकूच साहि आजम अमान भर । धसि चामिल नदि थाह तेज ग्रीषम सुआनंसर ॥
मडे जाजउ षेत नेत हिंदवांन अमानह । कूरम नृप उत सज्जि उत्तै सुत संग सुजानह ॥
कविकृश्र कहै सुखमा वरनि धरनीपति इमि हेत किय । अनूपसिंध रघुराज कौं नरवरगढ हजरति दिय ॥

### दोहा.

आजम भय इतकालबस जीति बहादुर साही । तषत अकबराबाद मैं फैऱ्यौ छत्र सु साही ॥

### छप्पय

श्रीमहाराज अनूप देव लोकह पधारिय । राजभार महिभार दियौ उपमनि बिचारिय ॥
बढि मोद उदित सिवपरी सुभ यह अभिषेक विचार भुव । महाराजराज रघुकुलतिलक श्रीगजसिंघ प्रताप हुव

### दोहा

भीमसिंघ के हेत सौं दृषिन लई महूम । षंडन सिर भुजभार दै चढयौ सत्र धरि धूम ॥
देस भदावर तैं तहां आयौ कवि जदुनाथ । जा पर सब कृपा करत महि के सब नरनाथ ॥
बरदाई कवि चंदकुल प्रगटयौ सुमति निधांन । तातै कवि जदुनाथ कौ करत नृपति सनमान ॥
कही सुकवि जदुनाथ सौं करि कै कृपा अपार । षंडन रैयाराव कौ करौ ग्रंथ विस्तार ॥
जितनी जीती जंग तैं बरनौ सबै विचारि । जा संवत मै ज्यौ भइ ज्यौं सत्रुनि सौं रारि ॥
हुकुमु पाइ नवलेस कौ करि हरिचरन प्रनाम । जंगनि कौ बरननु कऱ्यौ ग्रंथ जंगजस नाम ॥

### किरवान उदोतराय

ताने नरबदा मैंड पर मरहटा मठ किये मालये ते षोदि काढे दृष्षिन के ज्वांन ॥
तहं कहतु उदोत भट विकट घंटानि मद्धि विज्जुलसी सूरति कंवर किरवान ॥

### कवित उदोतराय

भाई जयसिंघ कौ सुहाई सवी मूरति कमाई कलाधारी की षलक षाति लष्षिनी ॥
उदोत सुकवि वलीविंद सुव अदवुद धुंध मारि दूसरे घर पै विरद रष्षिनी ॥

लोहकोट कोठारीनैं ओट राषे ऊमट उलेटे मरहट दल दरिया समषिनी ॥
कूरम हरौल वली षंडन धुंमान तुम मडे मांडौगढ ताते उमडे न दृषिनी ॥
सुध्ध नहीं भये जुध्ध काजै बुध्धाराव भटकाये भीलवारे लौं कहतु जगु सषिनी ॥
हाडा हठ भंजन प्रबल राव षंडन तुम्हारी समसेर अरि भरनि कौं भषिनी ॥
उदोत सुकवि विंदनंदन महीप जंबूदीपति सुजसु जल दधिहूते नषिनी ॥
चाहैं तुम्है चक्कवै सुथूंन चारि चक्र के सुचक्कवै न चिंताचूर चमूचूर दृषिनी ॥
घरी सात आठ ककाठ से फटे है सीस ईस और काली मिलि गावैं सुर मंगली ॥
राजा गजसिंघ कैं प्रताप फौज फुटि गई लूटि लये हाथी गढ बूंदीकी कला हली ॥
कौंन रन मडे वलि वुंडराव कोठारी सों वीस विसैं जुध्ध जीत्यौ षंडन महावली ॥
चारि भाग हाडा मारे चारि भाग राइठौर सात भाग षीची मारे पांच भाग दंगली ॥

## कवित धरमपाल

दृषिन के दलनें दृलेलषांहूं लूटि लये तिनि सौं न कोऊ कहै लरन लरन हैं ॥
दृषिन के दलनि सौं हाडा षीची दहलांनैं थहर थहर कंपे डरन डरन हैं ॥
दृषिन के दल भाजे कूरंम के वलनि सौं उनि कौं मिले हैं सोई इनिके चरन हैं ॥
साहूकार सिरौंज के कहैं कर जोरि जोरि षांडेराव साहिब के सरन सरन हैं ॥

## कवित

दृषिन के दर्याव फैलि फूट्यौ अनहद हद काहूपैं न मू काउ क्यों सुनत अवाजेकौ ॥
साहिके दगर के बगर मै घनेरे मीर वीर बजरंग अन भंग साज साजे कौ ॥
तिनि सौं उकढि बढि कीनी मरहठनी सौं होकैं रषवारौ पतिसाहिनिके छाजे कौ ॥
मैंड राषि हिंदुनि की मैंड दोऊ दीनही की वैडौ भयौ षंडन दिली के दरवाजे कौ ॥
चढे बजरंग भर कोपि गहैं करिवर कंपे अरि थ्थरथर भंजन अभंग भर ॥
भुंमियां भवाल सर करैं किरवान वर षौंसि लेत कैउ घर जानै ताही नारी नर ॥
वियौ भयौ वीर वर कियौ करतार कर विंद्रावनजू कौ ताहि नर मोहन कौ वर ॥
धौंसनि धुकार धर होत धैर धरधर डरत अडर डर षंडन मरद डर ॥
साजी फौज प्रबल सबल दल दृष्पनतैं हाडानिकी धर सर कीनी मारि गाहीकौ ॥
पाषी दैकै निजामनमुलक दिल्ली कौं गये कौंन उमराउ चौरैं लरै चढि धाइ कौ ॥
तिनि सौं समाहि समसेर बहादुर ह्यौ बांका पैंहौंचौं गौ षांन महमंदसाहिकौ ॥
सूरी वां सपुत्त सुरतेस षांडेराइजू के बाजी राषी ताजी गाजी मिलि बाजीराइ कौ ॥

## सवैया

जाइ मिल्यौ मरदांनौ मल्हार कौं दांन हथ्यार किवार सवाई ॥
उपऊ कींन्यौ भलौ नवलेस कौ दृष्पिन की सजि फौज पठाई ॥
राषि लियौ सैहैरां ठैहैरां सब औंर नरेसनि देस लुटाई ॥
राजा सराहैं सराहतु राज प्रजा सब सूरतिराम बचाई ॥

### दोहा सरूपराम

दोहरा इकऔद मारी षिदिरि षां लिय संग। दृषिनी सब मारि दीनै जीति षंडन जंग ॥
दृषिनिनि ऊमर षानु घेन्यो फौजदारजु धारकौ। आयौ तुरत ताकौं लिषौ सिरदार मनसबदार कौ ॥
मदति हमारी करौ घेरैं हमै फौज गनीम की। श्रीराव षंडन तुम प्रचंड समान आर्जुन भीम की ॥
उमर षांके बांचिकैं कागद तुरत नवाब। श्री षंडन बली बंड तब कीन्यौ कूंच सिताब ॥
ऊजर अरि बरनगर हुव दर वर दल सुनि दौर। षंडन राव प्रचंड सब सुभाटनिकौ सिरमोर ॥
सुनत अवाई फौजकी बढयौ अतंकु अपार। गये दृषिनी भाजि सब उतरि नरबदा पार ॥
इंहिं विधि ऊमर षांनको कीन्यौ बडौ सहाव। उथपनु थापनु भूमि पर षंडनु रैयां राव ॥

### दोहा

संवतु सत्रहसै नवै भयौ प्रगट जब आइ। जादौ सिकरवार जुरि कीन्यौं यही उपाइ ॥
जैपुर षंडन राव है कूरम नृप दरबार। दुचितौ साहाबाद उत सूरतिराम कुंवार ॥
आयौ है व्हां दृषिनी प्रबल वीर मल्हार। जाकै दल की धाक तैं भाजे मुलुकु अपार ॥
ताते अब ही औचकां कीजे दरवर दौर। घेरि बिजैपुर लीजियै नवलराम तिंहिं ठौर ॥
चहूं वोर तैं कूदि कैं लीजे कोटु छिडाइ। षबरि पाइ गोपालु नृप जौंलौं पौहौंचै आइ ॥
आठ रोज बीतें लरत बाढी रारि दुरंत। जैपुर साहाबाद फिरि पौहौंची षबरि तुरंत ॥
सुरतिराम मल्हार सौं यह राषि ठहराइ। षंडी साहाबाद की तबहीं दैंहिं चुकाइ ॥
मदति हमारे अनुजकी करौ आपु इहिं बार। लेहु चुकारे तै अधिक और पचीस हजार ।
तुरत राव मल्हार नैं राजी व्है तिंहिं बार ? बोलहु सुबट सबहि मिलि तुरत होइ असवार ।
भैजे तिनिके संग भट सूरति रांम कुवार। मदन सोलंकी धाकरौ षंडन व्दै सिरदार ॥
आठैं सुदि बैसाख की चढयौ पहर दिन सुद्ध। आयै दर पर दृषिनी लख्यौ होत तहं जुद्ध ॥
मिली फौज दोऊ जबै तबै धाकरौ धाइ। श्री नवलैस कुंवार पर दरवर पोहोंच्यो आइ ॥
दीनी षबरि कुंवारकौं पोहोंची कुमक सुआइ। कढयौ किलै तैं कोपु करि नवलसिंघु समुहाइ ॥

### दोहा

सत्रहसै फिरी छ्यासठा प्रगट भयौ जब साल। गयौ तबै सुरलोक श्री अनूप महिपाल ॥
सत्रहसै सतहतरा संवतु फिरि निरधारि। सैयद मुगलनि ता समै कींनी अदभुत रारि ॥
अबदुल्लह सैयद प्रबल हुसनअली षां जांनि। कालजमन से जमन व्है पौहौंमि प्रगटे आंनि ॥
पैहेलैं फरुक्क साहि सौं मारि मुगल करि जेर। कीनी दोउ दींन मैं जिनि जाहर समसेर ॥
प्रबल निजामनिमुलकु सुनि दृषिन मुगल प्रचंड। भेजीं बाईसी बडीं हुसन अली बलिबंड ॥
पठयौ बकसी आपनौ प्रबल दिलावल षांन। बडे बडे उमराइ संग सैयद सेष पठांन ॥
भेज्यौ राजा भीमु संग कूरम नृप गजसिंघु। हिरनाकुस जिमी जमनकौ प्रगटयौ ज्यौं नरसिंघु ॥

अठांरहसै येकास मैं सिकरवार कौ चाल। कातिक सुदि पांचौं दिवस जीते जुद्ध गुपाल ॥
वान गगन वसु ससिक ह्यौ संवतु यही बिचारि। भादौ बदि तिथि पंचमी भौमवारू निरधारि ॥
कन्यौ समापति ग्रंथ तब कवि जदुनाथु बनाइ। रह्यौ अवनि जुग जुग अमन नवलसिंघु श्रीराइ ॥

पोथी लिषीं—श्रीठाकुर श्रीनवलरामजी कौ भैया पैमराम काइथ श्रीवास्तव नै
मि. बैशाख बदि ७ मंगलवार संवतु १८०७ सुभस्थान बिजैपुर.

**औरंगजेब** कालवश झाल्यावर त्याचा पुत्र आजमशाहा यानें दक्षिणेंतील गुंते आटोपते घेऊन मोगल बादशाही हस्तगत करण्यासाठीं उत्तरेकडे तांतडीनें धांव घेतली. या वेळीं जी कुमक त्यानें मिळविली त्यांत मराठ्यांचेंही सैन्य असून त्याचा तळ शिवपुरीस पडला होता असा जो उल्लेख आला आहे तो संस्मरणीय आहे.

संवत् १७८१ ( सन १७२४ ) या सालीं मराठ्यांनीं धारचा फौजदार नवाब उमर खां यास घेरा घालून बडनगर उद्ध्वस्त केलें. उमर खानानें खांडेरायाची कुमक मागितली पण ती आली असतां [ तिला झुकांडी देऊन ] मराठे नर्मदा पार झाले असेंही वर्णन यांत दिलें आहे.

१७३४ सांत मल्हारजी होळकर खंडणी उगवण्यासाठीं शाहाबादेस आले होते. त्या संधीस खांडेराव याचा तिसरा मुलगा नवलराम बिजेपूरास करोलीकर राजे यांचा अंकित म्हणून राहत होता. त्याला सिकरवार व जाधव यांनीं गराडा घातला असतां त्यांतून त्याची मुक्तता करण्याविषयीं नवलरामाच्या वडील बंधूनें [ सुरतरामानें ] होळकरांची मनधरणी केली. म्हणून मल्हारजी होळकर यांनीं 'वैशाख शुद्ध ८ संवत् १७९० [रोजीं] बिजेपूरास' येऊन नवलरामाच्या शत्रूचा पराभव केला असें वर्णन या कवितांतून दिलें आहे. हा शोध इतिहासांत नवीनच आहे. तारखेसंबंधानें मात्र घोटाळा दिसतो. कारण याच सुमारास होळकर पेशव्याबरोबर दिल्लीस होते. [ब्रम्हेंद्र लेखांक २६]

Indian Historical Commission गेल्या दिसंबरांत ग्वाल्हेरीस आलें होतें. या प्रसंगा निमित्य 'पूर्वपानिपतीय शिंदेशाही' या विषयावर मराठींत एक खर्डा तयार केला होता. तो या ग्रंथाच्या शेवटीं जोडला आहे. ह्याचें इंग्रजी भाषांतर करून तें कमिशनकडे पाठविलें होतें पण Select Committee स तें मानवलें नाहीं. 'खिदमतगारी' खेरीज इतर गोष्टी वगळून हा निबंध वाचण्याचा तिनें आग्रह धरला. निराधार असें एकही विधान केलें नसले तरी इतिहासांत मतभेदास वाव राहतोच. म्हणून कोणी वादग्रस्त प्रश्न असल्यास त्याबद्दल चर्चेस सवड ठेऊन समग्र लेख वाचूं द्यावा अशी परत सूचना केली पण तीही रुचली नाहीं. अर्थात् शिलेदारानें आपला खर्डा परत घेतला. तो मालेच्या वाचकांस सादर करीत आहे.

आतां शेवटीं आभारप्रदर्शन राहिलें. श्रीयुत **माधव लक्ष्मण देसाई** यांनीं राजवाडेकृत खंड ८ व श्रीयुत **माधवराव व्यंकटेश लेले** यांच्या विनंतीस मान देऊन श्रीमंत **राजेसाहेब** इचलकरंजी यांनीं 'खरेकृत भाग १, होळकरांची कैफियत व भारतवर्षाचे' फुटकळ अंक वाचावयास पाठविले त्याविषयीं लेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे. तसेंच गुरुवर्य **बाळकृष्ण रामचंद्र बोकील** एम. ए. तथा **लक्ष्मणराव तात्याजी शिंदे** यांचे पूर्वीप्रमाणेंच ग्रंथ तयार करण्याच्या कामीं निरंतर साह्य होत आहे हें सांगण्यास आनंद वाटतो. या भागाचें मुद्रण काळजीपूर्वक विशेष सुबक करण्यासाठीं आलिजाह छापखान्याचे व्यवस्थापक **यशवंतराव माणगांवकर** यांनीं जो त्रास सोसला त्याविषयीं त्यांचे आभार मानल्या सिवाय लेखणीस विश्राम देववत नाहीं.

'बोलिलों जें कांहीं तुमचिया हिता ।
वचन नेणता क्षमा कीजे' ॥

—श्रीतुकाराम

**कृष्णमंदिर, ग्वाल्हेर.**
मिती विजयादशमी गुरुवार,
**प्रमोदनाम संवत्सर, १९८७ विक्रमी.**

**आनंदराव भाऊ फाळके.**



श्रीमंत सुभेदार मल्हाररावजी होळकर.

चित्रकार—हीरानंद बासी सोपारका.



# शिंदेशाही इतिहासाचीं साधनें

## भाग २ रा.

# श्रीमंत पंत प्रधान पेशवे

## यांचा असल पत्रव्यवहार.

१७९४-१८५० विक्रमी.

लेखांक [ १ ]  श्री  * संवत् १७९४ फाल्गुन वा १

[ २४ फरवरी १७३८ ]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

बाळाजी यशवंत [ गुलगुले ] गोसावी यांसि.

सेवक बाजीराउ बलाळ प्रधान नमस्कार सुा समान सलासेन मया व अलफ. मोजे बिराखेडी[1] पाा उरमाळ हा गांव राजश्री माहाराव [ दुर्जनसाल ] याणी तुम्हास दिल्हा

---

(१) कोव्यास गुलगुल्यांची जी स्थापना झाली त्यासंबंधीं सरदेसायांनीं परस्पर विरुद्ध अशीं दोन विधानें केलीं आहेत. [ १ ] 'उत्तर हिंदुस्थानांत शिंदे होळकर वावरूं लागले त्या वेळीं तिकडील कारभार रामचंद्रबाबा करीत असे. त्यांचे वशिल्यानें अनेक सारस्वत कुटुंबें उत्तरेंत विशेषतः शिंदेशाहींत प्रसिद्धीस आलीं. कोटेकर गुलगुले हें अशांपैकींच एक होय.' [ नाना पेशवे ३९ ] [ २ ] 'The ancestors of this Saraswat family, Sirnamed Gulgule, were placed by the Peshwa at Kotah under the orders of Scindia.

आहे तेणे प्रो तुम्हास करार केला आहे. मोजे मजकूरी दुसरियाचा तालुका नसे. तुम्ही कीर्द[२] करून वसूल घेत जाणे. वरकड कमाविसदारास त्या गांवाची समंध नाहीं. जाणिजे छ * १५ जिलकाद. ।' अज्ञा प्रमाण.




---

लेखांक [ २ ] श्री * संवत् १८१० पौष शुद्ध ८
[ २ जनवरी १७५४ ]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
बाळाजी येसवंत व आबाजी रघुनाथ [ निगडीकर ]
कामविसदार प्रांत कोटे गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा अर्बा खमसेन मया अलफ. सरकारची

---

[ भाग १ भालेराई ५ ] याविषयीं थोडें जास्त स्पष्टीकरण करावेसें वाटतें. रामचंद्रबाबाचीं जीं थोडीं पत्रें 'संग्रहीं' सांपडलीं तीं पुढें तिसऱ्या भागांत पाहावयास मिळतील. त्यावरून निदान असें विधान त्यांना करितां येणार नाहीं. अन्य अप्रकाशित पत्रें असल्याचें ते सांगतात त्यांत याचा संदर्भ लागत असेल तर न कळे. पण तसें त्यांनीं स्पष्ट कोठें दर्शविलें नाहीं. उलट गुलगुले संग्रहाशीं परिचय झाल्याबरोबर दुसरीच कल्पना उद्भवते! अस्तु. त्याच साधनान्वयें जो बोध झाला तो पहिल्या भागांत दाखविला आहे. [ लेखांक २ टीप ४ ] त्यांत याचा लवलेशही नाहीं. अर्थात् ही कल्पना विचारणीय ठरत नाहीं. तसेंच ' शिंदे व होळकर या दोघांचा ' कारभार रामचंद्रबाबा करीत असे ' ही भाषा देखील नव्यानेंच कानीं पडते. दुसरें विधान ज्या पत्राधारें केलें तें बहुधा हें पत्र असावें. वस्तुतः स्थापनेची कल्पना या पत्रावरून मुळींच निघत नाहीं. उलट या पूर्वींच गुलगुले कोट्यांत होते व त्यांस महाराव यांनीं इनाम दिला होता [ ती सनद प्रत्यक्ष उपलब्ध असून ] त्याचीच साक्ष हें पटवितें. किंबहुना शिंदे होळकरादिकांचे ' वरकड कमाविसदार ' यांचे अस्तित्व सिद्ध करतें. पत्रान्वयेंच बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, ही मूळ देणगी कोटेकरांची. ती बहाल करते समयीं त्यांत भागीदारांचा संबंध पेशव्यांनीं ठेविला नाहीं. मूळ स्थापनेविषयीं मात्र तें केव्हांही आधारभूत मानतां येत नाहीं. पारसनिसानें देखील असाच प्रकार केला आहे. [ ऐस्फुले भाग ३ पान २१ ] तो पत्राभावी केला असल्यामुळें क्षम्य तरी भासतो. पण प्रत्यक्ष प्रमाण परीक्षणानंतर जो हा निष्कर्ष निघतो त्याचें मात्र नवल वाटतें. असो. उपलब्ध पत्रानुसार संदर्भ जितका सयुक्तिक वाटला तितका जुळविला आहे. वाचक आपापले ठायीं निर्णय करतील.

(२) लावणी, संचणी, लागवड व वसाहत इत्यादि अर्थ होत असले तरी ' चक दिया ' या वाक्यावरून वसाहतीचाच भावार्थ जास्त संभवतो. महारावजीचे सनदेनंतर चकवसाहतीचे कामास प्रारंभ झाला असला तर मात्र इतर अर्थ अधिक शोभतील.

'नालकी[3]' जैपुरीहून पुण्यास रवाना केली आहे. यासि तुम्ही हाजिर कहार देउन कोव्यातून उजेनीस पोहचावणे. जाणिजे छ * ७ रबिलैावल. आज्ञा प्रमाण. (लेखन सीमा)

---

लेखांक [ ३ ] श्री * संवत् १८११ जेष्ट वद्य ९

[ १४ जून १७५४ ]

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री
बाळाजी यशवंत कमाविसदार प्रांत कोटे
निा। जयाजी सिंदे गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार सुा। खमस खमसेन मया व अलफ. राजश्री येसवंतराव पवार याचे निस्बतीची मामलत प्रो। मजकूरची राजश्री कृष्णाजी नायक भिडे याजकडे पेसजी होती. याचे तर्फेने गोपाळ आत्माजी व हरी बलाल अमलावरी होते.

---

(३) १७५३ सालीं प्रथमतः दादासाहेब जे उत्तर हिंदुस्थानच्या स्वारीला निघाले ते या वेळीं जयपुराहून कुंभेरीकडे वळले. मोगल बादशाहाशीं त्यांची भेट यापूर्वी कधीं झाली नव्हती असें इतिहास सर्रास सांगतो. तेव्हां ही '**नालखी**' आली कोठून व हें कोडें उमजावयाचें कसें? ती दादासाहेबांनींच तयार करविली असें गृहीत धरलें तर कोणी वाद उपस्थित होत नाहीं. एरवीं तसें मानण्यासाठीं साधक व बाधक असे दोनी प्रकार दिसून येतात. [१] 'वकील मुतलकीबरोबर नालखी' प्रथम मराठेशाहींत आली अशी सर्व साधारण पण जी साधार समजूत आहे. [इतिसंग्रह ऐटि. भाग १ क्रमांक ९] तिच्या अपरोक्ष [२] या संधीस दिल्लीहून दादासाहेबांस 'पोशाख' आल्याचें राजवाडे सांगतात. किंबहुना महिना व तारीखही देतात. [पेशवे शकावली १३१] ती या पत्रानंतर दोन महिन्याची आहे. एवढाच काय तो विसंगतपणा भासतो. हें पत्र 'मोहरी' असून त्यांत वर्ष, मास व मिति स्पष्ट दिलीं आहेत, त्याअर्थीं शंकेस वाव नाहीं. मग राजवाड्याशीं ताळमेळ कसा बसावा? मोगलाकडून अशा बहुमानाचा उल्लेख चिंतोकृष्ण एका पत्रीं करतो. [१ जून १७५२] तो स्पष्ट पेशव्यासंबंधीं नसला तरी त्याच वेळीं 'नालखी' पेशव्यांस मिळाली असावी अशी संभाव्यता वाटते. अस्तु. ती दादासाहेबांस मिळाली किंवा शिंदेहोळकरांनीं आणिली या दोहींपैकीं कोणताही प्रसंग पुढें खरा ठरो. एवढा बोध मात्र होतो कीं, या [मोगलाकडून आलेल्या] 'नालखीविषयीं' कोणी प्रश्न अथवा पृच्छा [स्वयम् पेशव्यांनीं अथवा त्यांच्या मुत्सद्यांनीं] केली नाहीं. तसेंच या दाखल्यानंतर पुढें 'वकील मुतलकी' चे वेळीं जें ग्रामण्य झालें, त्याची 'तात्विक राजनैतिक तथा आग्रहानुग्रह' मीमांसा करणारांनीं हें पत्र अवश्य लक्षांत घेतलें पाहिजे. [नातूकृत शिंदे २४७-४८ भाइसं. चतुर्थसंमेलन ८७] विशेषतः 'मराठ्यांचे गुणदोष' वर्णन करणाऱ्या चरित्रकारानें हें वाचावें अशी सूचना केल्याखेरीज रहावत नाहीं. [नाना पेशवे पान २२, ५८, ५९, ६०] चिंतोकृष्णाचें पत्र पुढील भागांत येणार आहे म्हणून दिग्दर्शनार्थ विवेचन केलें आहे.

त्यास यशवंतरायाचे हिसियाचा रूपये गोपाळ आत्माजीस व हरी बलाळ यांसि काये जो संस्थान मजकूरीचा पावला असेल तो लहून देणे व तसेच पत्रही यशवतराव पवार याचे नावे लहून देणे. जाणिजे छ * २२ साबान.

लेखन सीमा

---

लेखांक [ ४ ]

श्री * संवत् १८१३ मार्गशीर्ष शुद्ध ५
[ २६ नवंबर १७५६ ]

श्री
बलाळ चर
णी तत्पर सम
शेर बहादर
नीरंतर

राजश्री बाळाजीपंत व चिमणाजीपंत
कादार पा पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो समशेर बहादर[४] सलाम. सुमा सबा खमसेन मया अलफ. राजश्री महादाजी अबाजी [ पुरंदरे ? ] याजकडील उटे खरिदी करावयासि धनजी चौधरी रवाना केला. त्याजपासोन दस्तक सरकारचे असता जकाती[५] बाा रुपये ५१ यकावन घेतले म्हणोन हुजूर विदित जाले. [ तरी ] ही गोष्ट कार्याची नाही. देखत पत्र सदरहू यकावन रुपये घेतले ते माघारे देणे. फिरोन बोभाट येउ न देणे. जाणिजे छ * ३ माहे रालौवल.

मोर्तब सुद

पैवस्ता छ २३ रावल
[ १६ दिसंबर १७५६ ]

---

(४) हा थोरले बाजीराव पेशवे यांस मस्तानी नांवाच्या यावनी स्त्रीपासून झालेला मुलगा होय. पानिपतचे युद्धांत घायाळ होऊन तो परत देशीं येत असतां वाटेंत औषधोपचारासाठीं कुंभेरीकर जाटाकडे थांबला असतां तेथेंच तो मरण पावला.

(५) जकात वसूलीविषयीं हा आक्षेप अयोग्य वाटतो. कारण खंडणीपलीकडे असली मागणी निदान हक्कानें तरी करितां येत नव्हती. खंडणी वेळशीर न पटल्यामुळें असल्या सवडी निर्माण होऊन प्रघात पडला असला तरी तो कायदेशीर ठरवितां येणार नाहीं. वहिवाट या सदराखालींच त्याला घालावें लागेल आणि हेंच धोरण बहुधा शिंद्यांनीं स्वीकारिलें असून पेशव्यांचे 'दस्तकास' मान देण्याविषयीं सुचविलें आहे. किंबहुना मराठ्यांच्या वतीनें अशी सवलत कोटेकरांस मिळाली असतां तिची विस्मृति व्हावी याविषयीं गोड भाषेंत गुलगुल्यास टपका दिला आहे असें म्हटलें तरी चालेल. [ भाग १ लेखांक ६, १०९, १४८ ] हा अन्योन्य व्यवहाराचा प्रकार पाहातां जकात परत करण्याची ही मागणी मात्र सदोष म्हणतां येत नाहीं. 'बहिरोजी सिंदे व फतुखान' यांस ही रकम परत केली असून पावती 'बकलम बाबुराव गुणाजी दिा श्रीमंत दत्ताजी सिंदे' याचे हातची आहे.

लेखांक [ ५ ] श्री * संवत् १८१३ पौष वद्य १०

[ १५ जनवरी १७५७ ]




राजश्री सठवोजी[६] जाधव गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बालाजी बाजीराव प्रधान असिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकिये कुशल लिहित जाणे विशेष. मोजे गार ताा पाटुस [हा] गाव मुकासा तुम्हांकडे आहे. त्यास तुम्ही गावास उपसर्ग देता, ज्याजती पैंका घेता म्हणोन हुजूर विदित जाले. त्यावरून हे पत्र लिहिले असे. तरी पहिल्यापासून मोकास बाबेचा येवज घेत आला त्या प्राो घेणे. ज्याजती उपसर्ग न देणे. फिरोन बोभाट येउ न देणे. छ * २४ रविलाखर. बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [ ६ ] श्री * संवत् १८१३ पौष वद्य १०

[ १५ जनवरी १७५७ ]

चिरंजीव राजमान्य राजश्री सदाशिव चिमणाजी या प्रती बालाजी बाजीराव प्रधान असिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. भवानजी ताकपीर यांस प्राा कल्यान भिवंडीपैकी चार हजार रुपये द्यावयाची नेमणूक आहे. त्यापैकीं शणोजी ताकपीर याचे पुत्र, राणोजी सिंदे यांचे नातु[७], लेकीचे लेक यास रुपये २००० दोन हजार करार करून दिल्हे असेत. प्राा मजकूरपैकी पावते करीत जाणे. रो छ * २४ रबिलाखर. सुमा सबा खमसेन मया अलफ. बहुत काय लिहिणे ।' हा असिर्वाद.




---

(६) पिलाजी जाधव वाघोलीकर याचा हा पुत्र होय. या घराण्याचे वंशज सांप्रत महाराष्ट्रांत वास करीत असून त्यांजकडे शिवपुरी समीप शिंदेशाहींतून थोडी इनामी जमीन चालते.

(७) हें व अशींच अनेक पत्रें क्षीरसागरानें 'वंशावली' तयार करण्याच्या कामीं पाहिलीं असून त्यानें त्यांचा लक्षपूर्वक विचार केला आहे. या साठींच तिची योग्यता मोठी आहे हें पदोपदीं पुढें निदर्शनास येईल.

लेखांक [ ७ ] श्री * संवत् १८१४ जेष्ट वद्य ३

[ ६ जून १७५७ ]

राजमान्य राजश्री चिमणाजी गोविंद

कमाविसदार पा पाटण

दिा मलारजी होलकर गोसावी यांसि.

सेवक रघुनाथ बाजीराव नमस्कार. सुा समान खमसेन मया व अलफ. पा मजकूरची मामलत राजश्री जनकोजी सिंदे याचे तर्फेने रा बालाजी यशवंत याजकडे आहे. त्यास तुम्ही प्रतरणा करून वसूल परभारे घेता, मनमाने तैसी वर्तणूक करिता, बालाजी यशवत याचे निस्बतीचे ग्रहस्त अमलावरी पौ मजकूरी आहे, त्याचे इतल्याने कारभार करीत नाही म्हणून विदित जाले. त्याज जनकोजी सिंदे याचे अमलदारासी प्रतरणा करणे व इतल्याने कारभार न करावा यात तुम्ही आपले बरे काये पाहिले आहे ! हली [ हे ] पत्र सादर केले असे. तरी वाजबी अमल येकाचे यक इतल्याने करीत जाउन हिसे रसीद रुपया घेत जाणे. याचा बोभाट अथःपर आलियास परिछिन्न कार्यास येणार नाही. जाणिजे छ * १८ रमजान. ¹ आज्ञा प्रमाण

लेखन सीमा

---

लेखांक [ ८ ] श्री * संवत् १८१४ जेष्ट वद्य ७

[ ८ जून १७५७ ]

० श्री ०
राजा शाहु नर
पति हर्ष निधान
बाळाजी बाजी
राव प्रधान

आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री बाळाजी पंडित

---

( ८ ) शिंदे होळकर यांची परस्पर 'चित्तशुद्धता' नव्हती याची जाणीव दादासाहेबांस होती. [ पुरंदरे भाग १ लेखांक १५८, १५९ ] हा 'स्वजनविरोध व [ गृह ] कळह पेच वारेल' या हेतूनें शिंदे व होळकर यांजबरोबर त्यांची सांगड घालण्यांत आली असावी. [ राजवाडे खंड १ लेखांक २ ] त्यांचेच समक्ष कुंभेरीच्या प्रसंगीं चुरस विकोपास गेली. शिंद्यांप्रमाणें कदाचित् होळकरांनीं देखील या विषयीं कांहीं कालपर्यंत मौन धारण केलें असेल असें मानिलें तरी कर्णोपकर्णी याची वार्ता त्यांचे कानीं आल्यासिवाय राहिली नसावी. किंबहुना 'खातोलीपर्यंत' आल्यावर प्रत्यक्ष परिणाम पाहावयास मिळाले असतील. [ भाग १ लेखांक १३३ ] अशा स्थितींत या गोष्टीविषयीं त्यांचें केवळ एकच पत्र 'संग्रहीं' मिळावें याचें नवल वाटतें.

प्रधान ता मोकदमानी मौजे तडवले संमत वाई. सुा समान खमसेन मया व अलफ. मौजे मार व मौजे पिंपोडे प्राा मजकूर या गावाचा सिवेचा कजिया अजी तागायत काही जाला नाहीं. येसे असता हाली तुम्ही कजिया करून पिंपोडेकरानी आपले सिवेच्या सेतात अउते लाविली असता तुम्ही कजिया करून मानसे मारीली,[१] अउते घरूं देत नाही, म्हणून हुजूर विदीत जाहले. तरी नवीनच कजिया सिवेचा करावया गरज काये! हे लबाडी कार्यास येणार नाही. हाली हे अज्ञापत्र सादर केले असे. तरी पिंपोडे या गावास नवीन सिवेचा कजिया न करणे. सुदामत हरदु गावचे चालत आल्या प्रो वर्तणे. नुतन कजिया केलिया मुलाहिजा होणार नाही. हे पष्ट समजोन वर्तणुक करणे. नोदिगर असेल तरी तुम्ही हुजूर येणे. पिंपोडकरही अणउन वाजबी ईनसाफ करणे तो हुजूरच केला जाइल. जाणीजे छ * २० रमजान. या कामास सरकारचा जासूद पाठविला आहे. तरी लिहिले प्रो वर्तणे. नाही तरी जासुदासमागमे हुजूर येणे. जाणिजे छ [मार.] ग[१] अज्ञा प्रमाण.

लेखन सीमा

---

लेखांक [ ९ ] श्री * संवत् १८१५ माघ वद्य ३०

[ २७ फरवरी १७५९ ]

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री

कादार पा पाटेण केशवरायाचे

निा रा जनकोजी सिंदे गोसावी यांसि.

सेवक बालाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुा तिसा खमसेन मया व अलफ. पेशजी तुम्हाकडे पांच हजार रुपयाची सनद सादर केली आहे. त्याप्रमाणे यैवजाची

---

(९) हें पत्र तसें तर क्षुल्लक आहे, पण एका महत्वाच्या प्रश्नावर त्याचा प्रकाश पडत असल्या मुळें उपयुक्त ठरतें. तें असें कीं ‘ सितोळे देशमुख [ पुणेंकर ] यांचा व त्यांचे तक्षीमदार भाउबंदाचा ’ ‘ सिवेचा कजिया होउन खून लाडोजी सितोळे यांचे मानसांनी केला. सबब सरकारांतून २५००० दंड गुन्हेगारी लावली. धाकटा भाउ घरी होता. त्याजला नेउन उभा करून आंगठे धरविले. डोकीवर दगड [ दिला ? ] उन्हांतही उभे केले. ’ सितोळे [ शिंद्यांचे ] आप्त, त्याची या प्रमाणें ‘ बेअब्रू केली ’ ह्यावरून ‘ पेशवाईंत [ नानाचे वेळीं ] न्यायाचा ताजवा कसा होता त्याची कल्पना येते ’ असें पारसनीसानें जे कौतुकास्पद उद्गार काढले आहेत त्यांची मीमांसा करून मर्म ओळखण्यासाठीं इतिहासभक्तांस हें उपयोगी पडेल. [इतिसंग्रह ऐटि. भाग ५ क्रमांक २५] न्यायासंबंधानें प्रश्नच नाहीं. शिंद्यांच्या न्यायप्रियतेची साक्ष पत्रच देत आहे. पण नानांच्या निवाड्यांतील द्वेषयुक्त दृष्टीवर शिंद्यांचा जो कटाक्ष दिसतो तो किती योग्य आहे आणि न्यायाचा झगा घालून नानानें आपल्या द्वेषबुद्धीची तृप्ति कशी करून घेतली हें मात्र चांगल्या रीतीनें स्पष्ट होत आहे.

तरतूद करून सदरहू यैवज सत्वर हुजूर येऊन पावे ते करणे. दिरंग येकंदर न करणे. जाणिजे छ * २८ जमादिलाखर. आज्ञा प्रमाण. सदरहू यैवज कर्जपटी[१०] बाबत सत्वर पाठउन देणे. जाणिजे.

लेखन सीमा

---

लेखांक [ १० ] श्री * संवत् १८१७ वैशाख वद्य १४

[ १४ मे १७६० ]

राजश्री बालकृष्ण [ ? ] गोसावी यांसि.

स्नो सदाशिव चिमणाजी आशिर्वाद. सुा सितेन मया व अलफ. तुम्ही कोट्यास जाउन पोहचला असाल. अद्याप राजश्री छत्रसाल [कोटेकर] फौजसुधा येउन सामिल[११] होत नाहीत. हे कोण गोष्ट! या उपरी खासा स्वारी जल्द मजल दर मजल जाउन चमेल

---

( १० ) या कर्जपटीची मूळ कल्पना रामचंद्र मल्हार सुखठणकराचे सुपीक [जमाखर्ची] डोक्यांतून निघाली व तिचा प्रयोग प्रथम त्यानें आपले कारकीर्दींत करून दाखविला. [पेशवे शकावली १२२] तिचा विस्तार होऊन आतां ती शिंदेहोळकरांच्याही पाठीस लागली. [ भाग १ लेखांक २१८, २१९ ]

( ११ ) दक्षिणेंतून उत्तर हिंदुस्थानांत येते समयीं मार्गांतील राजेरजवाडे यांस स्वपक्षानुकूल करून न घेतां भाऊसाहेब केवळ ' खंडण्या करीत करीत आले ' असा जो कटाक्ष भाऊबखरकाराचा आहे तो सकृत्दर्शनी आक्षेपार्ह वाटतो. [ १११ ] कारण कीं 'मंडलीक इकडील लक्षांत कोण आहेत, कोणाचें राजकारण कसें आहे किंवा सारेच तिकडे आहेत ? हे वर्तमान [ ठेवून ] युक्तिप्रयुक्तीनें राजकारण राखून जे इकडे नसतील ते हाताखाली घालण्याच्या इच्छेनें बुंदेले, सुजाअतदौला, माधोसिंग, बिजेसिंग, कोटेवाले व राणाजी या सर्वांस पत्रें [व] वकील पाठविली ' [ खंड १ लेखांक १७१, १७३, १७४ ] तत्संबंधीं हें पत्र साक्ष पुरवितें. या प्रमाणेंच प्रत्येकाकडे ' पत्रें व वकील ' गेले असतील असें विधान केलें व तें पुढें साधार सिद्ध झालें तर इतकेंच प्रतिपादन करितां येईल कीं, ' सर्वांस अनकुल ' करण्याचें यत्न केले व करविले तथापि त्याची फलप्राप्ति काय तर ' सूरजमल जाट ' यासिवाय दुसरें नांव दिसत नाहीं आणि तेंही धूमकेतुवत् झळक दाखवून अकस्मात् मावळतें. सारांश परिणामीं ' खंडणीच पदरीं पडली ' हा जो निष्कर्ष बखरकाराचा आहे तो अन्य पुरावा पुढें येईपर्यंत अढळ राहातो. अस्तु. कोटेकरांविषयीं थोडा विचार करणें कर्तव्य आहे. शिंद्याच्या भाईचाऱ्यासाठीं कुंभेरीकर जाट अबदाली विरुद्ध येऊन मिळाला [ भाऊबखर ११४ ] पण भाईचाऱ्यांत अग्रेसरत्व पटकावणारे कोटेकरांचें नांव कां सापडूं नये ? ' कलीयुगी प्रपंची इष्टत्व, मित्रत्व सर्व स्वार्थीचें आहे. ' ही राघो दादाजीची उक्ति खरी आहे. [ ९ नवंबर १७६० ] तथापि कोटे केवळ सरहद्दी संस्थान नसून शिंदेहोळकरांची ' जागीर ' होती. यामुळें साहाजिकच ' मैत्री ' जडली व तिचें रूपांतर 'भाईचाऱ्यांत' होऊन ' रक्षाबंधनद्वारें ' सीमा झाली. [ भाग १, लेखांक २६, ५१, १७९, १८०, २२३ ] त्यापैकीं व्यक्तिगत भाव वगळला तरी स्वार्थ व परमार्थ बलवत्तर होऊन त्याचा प्रादुर्भाव झाला याची निदान प्रचीति

[नदी][१२] उतरणार. अशा मध्ये त्याणी येउन सत्वर मिलावे. यैसे करून न ध्यावे जे त्याच्या येण्यासाठी फौजा त्या मुलकात तटून राहिल्या आहेत. या प्रा याणी करून घेतल्यास त्याचे उपयोगी नाही. मुलकाची खराबी होईल हे पुरते त्याजला उमजउन देउन फौज

---

मिळते. ' श्रीछत्रसालजी के वा श्रीपटेल साहेब के वचन कथन कारदाद छो, तिही माफक बरतनो. तफावत न राखनो. सिंद्या की सरकार अर कोव्या की सिरकार को दरपुसत सु भाईचारो छे. सो दरपुसत निभावनो. थांका मिलापा सो म्हाका मिलापा छे. अर थांका दुसमन सो म्हांका दुसमन छे. ' [ ४ जुलै १७६५ ] ही सलगी शब्दांतच न राहातां कृतींतही उतरली. त्याचें प्रत्यंतर पहावयास मिळतें. [ भाग १ लेखांक ११५, ते ११८ ] तसा प्रकार या वेळीं दिसत नाहीं. याविषयीं विस्मय आतांच वाटतो असें नव्हे तर तत्कालिन शिंदेशाही मुत्सद्यांसही त्याचा भास झाला होता. ' कोटेकर तो दिवसाकडे पाहून स्थिरता करतात. अल्पबुद्धीचे कारण. ' असें त्रिंबक दत्ताजी स्पष्ट बोलून दाखवितो. [ २३ जुलै १७६० ] मागें साहय्य केल्याचा जसा स्पष्टोल्लेख आहे तसा बोध या प्रसंगीं होत नाहीं. ओढाताण केलीच तर असें म्हणतां येईल कीं, आबदालीकडे त्यांचा कल नव्हता, किंवा तत्पक्षीय ' बुद्धीभेदामुळें ' ते तटस्थही राहिले नाहींत. त्यांच्या अटी मानल्या नाहींत म्हणून ते मराठी पक्षाकडे पानिपतावर मिळाले नसले तरी त्यांची सहानुभूति मात्र मराठ्याकडेच होती आणि त्यामुळें उपसर्ग करणारे ' खींची ' याचा समाचार घेण्याचें काम त्यानीं पत्करिलें. [ लेखांक ११ ] हा युक्तिवाद कांहीं अंशी मननीय असला तरी तो निर्णयात्मक नाहीं असें जरा खोल दृष्टीनें पाहातां कळेल. ' खींचीसी ' कोटेकराचे ' हाडवैर ' असल्यामुळें परस्पर चकमकी झडत असत. तसेंच ' खींचीची ' नांगी कायमची मोडण्यासाठीं कोटेकर संधीचीच वाट पाहात होते. विशेषतः मराठ्यांच्या संगतीनें अथवा संमतीनें ती त्यांना हवी होती आणि तत्संबंधी त्यांनीं शिंद्यांकडून वचनही मिळविलें होतें. [ भाग १ लेखांक १२८, २१७, ] या वेळीं उघड रीतीनें ' खींचीनें ' मराठ्यांचा विरोध केला. त्यामुळें आयतीच संधी घर बसल्या मिळाली. प्रतिकाराच्या मिषानें आपले मनोरथ सिद्धीस नेण्यासाठीं वकीलापाशीं कोटेकरांनीं क्रिया करून कृतार्थता मिळविण्याचा हा घाट घातला असावा. शिंदे व त्यांचे हस्तक गुलगुले तथा होळकर यांस ती जड वाटल्यामुळें आणि ' कोटेकराशीं ' त्यांचे वेगळे ' करारमदार जाले ' असल्यामुळें भाऊसाहेबांनीं आपला हात आटपता घेतला असेंच अनुमान निघतें. या ' कराराचें स्वरूप ' निश्चित नसलें तरी ' सेत्रुचे पारपत्य जाल्यानंतर कोटेकर वगैरे सर्व पादाक्रांत होतील ' या भाषेवरून निदान ' खींचीशी ' तरी त्याचा संबंध नसावा असें ओघानें अनुमान करणें प्राप्त होतें. [ भाग १ लेखांक २२२ ]

( १२ ) 'मुचकुंद तीर्थस्नान करून भाऊंनीं आगरियाच्या रोखे गंभीर नदीवर मुकाम केला. तेथें शिंदेहोळकरांच्या भेटी झाल्या, हें बखरकाराचें वर्णन राजवाड्यांस मान्य नाहीं. [ऐप्र.खंड१पान ६९,७२] '६ जुलै रविवारी मथुरेचे सुमारें शिंदेहोळकर भेटले' असें ते सांगतात. [ खंड १ लेखांक १९५, २१७ टीप २८१, २९७ ] बखरीप्रमाणें व पत्राधारें जर मुकामाचे उतारे घेतले तर त्यांत पडतूरापासून ते थेट दिल्लीपावेतों परस्पर इतकें साम्य आहे कीं बखरकाराविषयीं खरोखर कौतुक वाटतें. विस्मयजनक असें कांहीं असेल तर तें इतकेंच कीं, ' वोडसिया, आरोन, मालना व [काली] पहाडी ' हे चार पत्रांकित मुकाम बखरींत कसें आले नाहींत ? दरमियानी पडाव वगळून मुख्य तळ बखरकारानें दर्शविलें असें

सुधा सत्वर येउन सामिल होत ते करणे. फौज किती आहे? येतात किंवा नाही? जैनगर

मानले तर 'अशेरगड बोडसिया व मुचकुंद' हे तीन मुकाम निराधार ठरविण्यास आधार कोणता असा उलट प्रश्न बखरी तर्फे केला तर त्याचे उत्तर काय ? अस्तु. हा दृष्टिकोण बदलून राजवाड्यांच्या विधानाविषयीं विचार केला तर ज्या मूळपत्रीं भिती आहेत त्याविषयीं फारसा प्रश्न उपस्थित होत नाहीं. पण ज्या पत्रांत मुळांतच तारखा नाहींत त्यांचा क्रम लावतानां मतभेद किंवा भुरळ होणें शक्य आहे आणि हाच प्रकार भेटीसंबंधानें घडला असावा असें वाटतें. ज्या तीन पत्रांत तारखा नाहींत त्यांपैकीं दुसऱ्या पत्राची तारीख राजवाड्यानें ठरविलीं नाहीं. [२०२] तिसऱ्याची 'अजमासी' तारीख दिली. [ २१७ ] पहिल्याची 'पैवस्ती' सोडून 'अजमासी' ठरविली [ १८७ ] त्यामुळें जो घोटाळा झाला तो विचारणीय आहे. 'पैवस्ती सिवाय सिरोंजेस आलों' या पहिल्या पत्रांतील स्थळ संकेतामुळें क्रम व तारीख जमली. दुसऱ्याची तारीख देण्याची इच्छा नसतांही क्रम चुकला. अर्थात् तिसऱ्याचा अदमास जमला नाहीं. त्यामुळें परस्पर विरुद्ध अशीं दोन विधानें घडलीं. [ १ ] ६ जुलै रविवारी मथुरेचे सुमारे भेट झाली ! असें मुख्य विधान झालें. [ २ ] शिंदे होळकर व जाट यांची सैन्यें २५ जूनच्या अगोदर येऊन मिळाली [ ३ ] ८ जून पासून १२ जुलैपर्यंत चमेल उत्तर तीर व आग्रा ह्याच्या मधील प्रदेशांत भाऊसाहेबांस राहणें भाग पडलें. [ १९४ टीप २७८ ] शिंदेहोळकरांचीं सैन्यें कोठें व कधीं मिळालीं हा वाद गौण समजून थोडा वेळ वगळला तरी '१२ जुलै पर्यंत चमेल आग्रा मधील प्रदेशांत' राहणें भाग पडलें 'तर' ६ जुलै रविवारी मथुरेस भेट कशी घडते? दोहों पैकीं कोणतें तरी एक खरें मानावें लागेल. राजवाड्यांचा मथुरेचा सिद्धांत सिद्ध होऊं शकत नाहीं. '२ जिलकादी मथुरेवर आले' असें गृहीत धरून त्याचा जो संदर्भ 'रविवाराशी' व 'भेटीशीं' जुळविला त्याचा चमत्कार ही पाहाण्यासारखा आहे. '२ जिलकादी' सोमवार आहे. राजवाड्यांच्या तत्वाप्रमाणें रविवार ओढून आणला तर तो येण्यासारखा आहे. [लेखांक १४ टीप ५९] पण २ जिलकादी ६ जुलै कधींही आणतां येणार नाहीं. '२ **जिलकाद्**' म्हणजे जंत्रीनुसार **१६ जून** येतो आणि १६ जूनला रविवार येत नाहीं व मथुराभेट संभवत नाहीं. कारण ८ जुलैपर्यंत 'गंभीर' सोडली नव्हती असें स्पष्ट आहे. [लेखांक २१२,२१५] अर्थात् मथुरेची कल्पना ढासळते. हा आचार्यांचा दोष नव्हे पण पत्रांतील २ जिलकादचा चमत्कार आहे. त्या ऐवजी २ **जिल्हेज** पाहिजे. व त्यामानानें १५ जुलै येते. व ती पत्राशीं खासी जमते. इतकेंच नव्हे तर 'सरदार जाटसहवर्तमान मथुरेवर आलो' या वाक्याचा शद्बशः संदर्भही लागतो. अर्थात् भेटी त्यापूर्वीच झाल्या असें स्पष्ट होतें. [ लेखांक २०० ] रविवाराविषयीं आग्रह असलाच तर तो त्या सुमाराचा धरला पाहिजे. मग तो ८,१५,२२ किंवा २९ जून पैकीं कोणताही असो. तो विषय स्वतंत्र चर्चेचा आहे. पण त्यांपैकीं कोणताही मानला तरी तो गंभिरा नदी संबंधीच ठरेल. ही केवळ कपोलकल्पना नव्हे तर [ शिंदेहोळकर, ] 'जाट व वजीर' यांचे भेटीविषयीं बरीच स्पष्टता झाली असून ती १ जुलै १७६० च्या पूर्वीची ठरते. [ पुरंदरे भाग १ लेखांक ३८७ ] 'वोडसिया' हा बखरकाराचा घाट बोडसिया असला पाहिजे किंवा फार तर सिरोजच्या दक्षिणेकडील बेरसिया निघेल. 'भाऊसाहेब सांगितल्या वाटेनें चमेल पार आले' अर्थात् 'होळकर भर सभेंत गर्जो लागले' हें बखरकाराचे वर्णन 'अवास्तव' होतें असें जें राजवाड्यांनीं प्रतीपादन केलें तें तूर्ततरी निराधार आहे हें निराळें सांगावयास नको. राजवाडेकृत पहिल्या खंडांतील कांहीं तारखा हस्तदृष्टिदोषामुळें व कांहीं मुद्रणलीलेनें चुकल्या आहेत. त्यासंबंधीं इतर प्रकाशित साधनें हातीं आल्यानंतर लिहिण्याचा विचार आहे.

वाले आम्हासही येतो आसे लिहितात. पठाणाकडेही जाबसाल पका करितात. कोटेकर यासही कांही बुधीभेद करतात आसे आइकिले. याचा शोध करणे. वर्तमान सत्वर लिहिणे. जरूर. बहुत प्रकारे समजाउन फौज घेउन येणे. छ * २७ रमजान. बहुत काये लिहिणे.

लेखन सीमा

---

लेखांक [ ११ ] श्री * संवत् १८१७ भाद्रपद वद्य ३०

[ ९ अक्टोबर १७६० ]

राजमान्य राजश्री कृष्णाजी [ ? ] गोसावी यांसि.

सेवक सदाशिव चिमणाजी नमस्कार सुा इहिदे सितेन मया व अलफ. तुम्हास खीचीवाडेकराची गढी फूल बडोदे[१३] कोटेकरानी घेतली आहे, ते राजश्री जनकोजी सिंदे याजकडील कमाविसदार लालाजी बलाल [गुलगुले] या जवळून ताकीद करउन सोडून देवावया करिता सरकारची पत्रे देउन पाठविले. त्यावरून तुम्ही कमाविसदारासी कटकट करिता म्हणोन हुजूर विदित जाहले. यैशास कोटेकरानी [सी] करार मदार जालेले आहेत ते पुढे राजश्री मल्हारजी होळकर व जनकोजी सिंदे त्या प्रांते आलियावरी त्यासी समजून घेतील. तुम्ही त्या गांवाविसी कमाविसदारास तगादा न करणे. उठोन खींची वाड्यास जाणे. जाणिजे छ * २९ सफर. ॥ सरकारची पत्रे कमाविसदाराजवळ माघारी मागता ती न मागणे. उतरे मात्र घेउनं येणे. जाणिजे छ मार. आज्ञा प्रमाण.

लेखन सीमा

---

लेखांक [ १२ ] श्री * संवत् १८१७ माघ शुद्ध ११

[ १५ फरवरी १७६१ ]

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री

आबाजी व बालाजी [यशवंत] व गणेश[१४] [अनंत]

कमाविसदार कोटे गो यांसि.

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुा इहिदे सितेन मया व अलफ.

---

(१३) फूल बडोद तर नकाशांत कोठें सांपडत नाहीं पण स्थानिक माहितीवरून तें कोटा राज्यांत छीपा बडोदच्या ईशान्येस तीन चार कोसांवर अंधेरी नदीच्या पश्चिम तिरावर असल्याचें समजतें. तेथे मोडकळीस आलेली गढीही अद्याप आहे.

(१४) शिंदेशाही भाग १ लेखांक २२४ टीप २३० पहा.

चिरंजीव राजश्री [सदाशिवराव] भाउची अबदालीची लडाई[१५] होउन चिरंजीव निघाले ते आजमेर व रूपनगर प्रांते आले म्हणून श्रवण जाहाले. येशास कोव्यात तहकीक खबर आली असेलच. तर चिरंजीव[१६] कोठे आले, समागमे फौज किती आहे ? तहकीक वर्तमान सविस्तर लिहिणे. जर रूपनगर आजमीरीकडे न आले असिले तर कोणीकडे निघाले ? येविसीचे खबरेस दिलीस व अबदालीचे लस्करात दोन दोन जोड्या कासिदाच्या पाठउन चिरंजीवाचे व राजश्री जनकोजी सिंदे याचे वर्तमान ठीक लाउन लिहून पाठवणे. ॥ जाणिजे छ * ९ रजब. आज्ञा प्रमाण.

लेखन सीमा

पैवस्ता छ २२ रजब. माघ वद्य ९ मंदवासर.
सुा इहिदे सितेन. स. १८१७
[ २८ फरवरी १७६१ ]

---

(१५) पानपतच्या घनघोर संग्रामांत विश्वासराव भाऊचा अंत झाला असें तर कळलें पण सदाशिवराव भाऊ व जनकोजी शिंदे या दोघांविषयीं नाना प्रकारच्या बातम्या उठल्या [ १ ] 'भाऊ साहेब थोरले व जनकोजी शिंदे लढाई झाली तेथून विस कोसांवर एक जमीदार याची गढी होते जमीदार मिळोन जाट याच्या मुलखांत गेलेत. त्याची हातची पत्रें तो आले नाहींत परंतु कायम आहेत' अशी प्रथम बातमी आली. [इतिसंग्रह ऐटि १४ लेखांक २] [२] 'नजीबखान, सुज्यातदौला यांचे वकिलानें भाऊचे वर्तमान खुणामुद्रानिशी विपरीत सांगितलें [ ३ ] वरकड वकिलाच्या पत्रीं बिकानेरकडे आहेत. [ ४ ] कोणी अला जाटाकडे लिहितात. [ पुरंदरे भाग १ लेखांक ४१७ ] विश्वासराव गोळी लागून ठार झाले. फौजेनें शिकस्त खादली. ज्यास जिकडे सोय पडली तिकडे निघाले. भाऊसाहेब व जनकोजी शिंदे कोणीकडे गेले त्याचें ठिकाण नाहीं,' अशी युद्धांतून आलेल्या व कुंभेरीस थांबलेल्या सटवाजी जाधवरावाची प्रत्यक्ष स्थिति होती तेव्हां तत्संबंधीं नाना तर्कवितर्क चालले तर त्यांत नवल कोणतें ? [ इतिमंजरी ३०० ] अस्तु. या अनेक वार्तांपैंकीं 'बिकानेर, रूपनगर अजमेरकडे' गेल्याची बातमी जास्त संभवनीय वाटली असें दिसतें आणि त्यादिशेनें शोध करण्यासाठीं पेशव्यांचीं दोन पत्रें गुलगुल्यास आलीं. [लेखांक १३] इतकेंच नव्हे तर साहित्यासहित सैन्य पाठविण्याची देखील योजना झाली. [पुरंदरे भाग १ लेखांक ३९९,४०१ ते ४०६ व ४१०] परंतु भाऊसाहेब किंवा जनकोजी शिंदे यांचा शोध लागला नाहीं. जनकोजी शिंद्याप्रमाणें सदाशिवराव भाऊ या नांवाचा तोतया पुढें निर्माण झाला व त्याचें इतकें खूळ माजलें कीं त्याच्या साठीं स्वतंत्र स्वारी करून महादजी शिंद्यांस त्याचें पारिपत्य करावें लागलें. त्यासंबंधीं पुढें पत्रव्यवहार येणार आहे त्यावेळीं आपोआप स्पष्टीकरण होईल.

(१६) पानिपतची लढाई 'पौष शुद्ध ८ बुधवारी' [ १४ जनवरी १७६१ ] झाली असें राजवाड्यांनीं बखरानुरोधें प्रथम प्रतिपादन करून नंतर त्यांनीं सप्रमाण सिद्धही करून दाखविलें आहे. [ खंड १ लेखांक २८१ टीप ३२४ व इतिमंजरी ३०० ] त्यास आतां पुरंदरे दप्तरांतूनही विशेष पुष्टी मिळते. [ भाग १ लेखांक ४१७ ] अर्थात् भाऊबखरकाराची सत्यता निर्द्वंद्व ठरते. [ पान १५९ ] या पराजयाचें 'वर्तमान नर्मदेवरी ऐकिलें' असें बखरकारानें जें दुसरें वर्णन दिलें आहे त्यासंबंधीं

लेखांक [ १३ ]

श्री * संवत् १८१७ फाल्गुन शुद्ध १०
[ १६ मार्च १७६१ ]

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री
लालाजी बलाल व आबाजी रघुनाथ
व गणेश अनंत गोसावी यांसि

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. सुा इहिदे सितेन मया व अलफ. तुम्ही छ †२२ रजेबचे पत्र पाठविले ते छ ‡ ३ साबानी पावले. श्रीमंत राजेश्री भाउसाहेब व जनकोजी सिंदे याचे सोधास आझे प्रो कासिद जोड्या पाठविल्या आहेत. माधोसिंग [कछवा] याणी बहुत धुंद मांडली ये विसीचा अर्थ वगैरे वर्तमान विस्तारे लिहिले ते कळले. यैशास [ त्याचे ] पारपत्याचा विचार करित असो. सर्वही नीटच होईल. तुम्ही वर्तमान वरचेवरी लिहित जाणे. जाणिजे छ * ८ साबान. १' आज्ञा प्रमाण.

मोर्तब
सुद

पैवस्ता छ १४ माहे मजकूर
[ २२ मार्च १७६१ ]

---

लेखांक [ १४ ]

श्री * संवत् १८३१ मार्गशीर्ष शुद्ध ११
[ १३ दिसंबर १७७४ ]

श्रीमाहाराजाधीराज श्रीमाहाराजा श्रीमाहाराव उमेदसिंघजी ज्योग्ये. श्री मुख्ये प्रधान श्री रघुनाथ बाजीरावके आसिर्वाद बाचनै. इहाके समाच्यार भला छै. आपुका

---

कागदोपत्रीं पुरावा पाहूं जातां 'लढाई नासल्याचें जयनगरहून वर्तमान नर्मदातीरीं येतांच नर्मदेहून रुपये कापड देऊन बापूजी नाईक व सदाशिव रामचंद्र [ सुखठणकर ] रवाना केले.' असें निर्णयात्मक सिद्ध होतें. [ पुरंदरे १ लेखांक ४०२ ] मुक्काम ठरला पण मिति मात्र निश्चित करतां येत नाहीं. जनवरी १८ पर्यंत पेशव्यांस वर्तमान नव्हतें असें स्पष्ट आहे. [ पुरंदरे भाग १ लेखांक ३९५ ] ३ फरवरीला वार्ता उज्जयनीस पोहोंचली होती व 'श्रीमंत नानासाहेब पेशवे सुरंजेस दरमजल गेलेत' असा पत्रांत स्पष्टोल्लेख आहे. [इतिसंग्रह ऐटि. क्रमांक १४ लेखांक २] त्याअर्थी ही वार्ता निदान त्यासुमारें लागली असावी. अस्तु. नर्मदेच्या तळाचे तारखेबरोबर ही समस्या सुटणार आहे.

† २८ फरवरी १७६१ ‡ ११ मार्च १७६१

सदा भला चाहीजे. आप्रंच बहुत्त दीन पाती समाचार नाही पाए है सो लीषजोजी. आप्र इहाकी हकीकती बिदीवार श्रीराजराणे जालमसीघजी को लीषी है. सो जान के आपुको लायक सो करनो. आपु आदी राजा छौ. थाकी शूरता बडी छै. ती उपर थाकी बडाई जानकर करोगे. मीती आगहन शूदी ११ संवत १८३१. बिसेख क्या लिषिये.

† श्रीमहाराजाधीराज श्रीमहाराज [श्री]महाराव उमेदसीघजी जोग्ये | श्रीमंत् रघु नाथराव |

---

लेखांक [ १५ ] श्री * संवत१८३१ मार्गशीर्ष शुद्ध १२

[ १४ दिसंबर १७७४ ]

सीधश्री सर्वउपमालायक श्रीराजराणे जालमसीघजी ज्योग्ये श्रीमुख्ये प्रधान रघुनाथ बाजीराव के आसीर्वाद बंचना. ईहाके समाचार भला छै. उठाका भला चाहीजेजी. आप्रंच सीरकार कारबारीने फतूर[१७] करो. उनी षातीर तुकुजी हुलकर वा माहादजी सीधीया उनोकु लेकर दक्षन गये. तीन उपरी सीधीयाकी अंत:करणमे संपूर्ण रुष उठा. की जाणी आपु [इ]काईक तुकोजीकी भी उठा. [उ]की [या] रुष देषी. ती उपरी म्हाने हीदोस्थानकुं कुच कीयो. अबी थाकी तरफ आवां छा. कोटाको आदीराजा छो. थाकी शूरता बडी लोकमे प्रसिद्द छे. सीरकारपर यो समया विपरीत [प]डयो छै. ती उपरी बडाई जाणी करोगे. दर कुच कोटाकु पुहुचत है. मीती आगहन शुदी १२ संवत १८३१. बिसेख क्या लिषिये.

† सीधश्री सर्वउपमा लायक श्रीराजराणे जालमसीघजी जोग्य | श्रीमंत् रघु नाथ राव |

---

लेखांक [ १६ ] श्री * संवत् १८३९ मार्गशीर्ष वद्य ८

[ २७ दिसंबर १७८२ ]

| श्रीमंत् रघु नाथ राव |

राजश्री माहादजी सिंदे गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ बाजीराव असिर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. बहुत दिवस

---

(१७) कारभाऱ्याप्रमाणें फितुरीचा आरोप दादासाहेबांनीं शिंदेहोळकरांवर ठेविला नाहीं हें खरें. तथापि 'रोष करून' उभयतांनीं त्यांचा पक्ष सोडिला असें जें म्हटलें आहे त्यासंबंधीं पुढें पत्रव्यवहार येणार असल्यामुळें येथें विस्तृत विवरण करीत नाहीं.

तुम्हाकडून पत्र येउन वर्तमान निवेदन होत नाही. तरी हली तुमचा मुकांम कोठे आहे ? तुम्हाकडील काय वर्तमान ते लिहून संतोषवीत जावे. साप्रत इंग्रेजाचा तुंम्ही तह ठरावीत अहा व अमचाही जाबसाल लागला आहे म्हणून येकतों. त्यांस साप्रत अम्हांस थोरले दवलतीचा लोभ राहिला नाही, तथापि बारभाईचा आम्हांस इतबार येत नाहीं, त्याअर्थी आंम्ही इकडेच राहू. तरी ज्यात अमची सोई ते तुह्मी करावे हे उचित असे. मागील गतवार्ता चितात न ठेवाव्या. अम्ही सुरतेजवळ राहिल्यानें अम्हांस दगदग नाही व अम्ही साप्रत कोण्याचे बऱ्या ऱ्हे वाईटात नाही. दवलतीचा अर्थ तरी पूर्वीं ईश्वरकृपेकरून मोठीच केली आहे. अता वृध्यापकाली कांही ईश्वराची शेवा करून तापीतीरी राहावे असी इछा आहे. यास्तव येथेच अमची सोई घडून येईल तो अर्थार्थ करावा. तिकडे तुम्ही जो मुलुख देवाल त्यापेक्षा इकडे आंम्हास काहीं कमी दिल्हा तरी अम्हीं राजी अहो, परंतु कोणाचे पेचांत राहाणे होणार नाहीं. सर्व तुह्मीं जाणतच अहा. रवाना छ * २१ मोहरंम. बहुत काय लिहिणे.

---

लेखांक [ १७ ] श्री * संवत् १८४० जेष्ट शुद्ध १२

[ १२ जून १७८३ ]

| श्रीमंत रघु नाथ राव |
|---|

राजश्री माहादजी सिंदे गोसावी यांसी

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ बाजीराव आसिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. तुह्मीं इंग्रेजासी सलुक केला. तेव्हां इंग्रजानी खर्चास द्यावयाचे बंद केले. अम्हांस तरी खर्चाची बहुत तंगचाई. तुम्हाकडून केसो अनंत[१८] येथे आले परंतु आजपर्यंत आपलेकडून खर्चास पोहोचले नाहीं व यादीवर करार मदारही करून पाठविले नाहीं. अम्हांस खर्चाचा बहुत वोढा सबब पुणेकरापासून आम्ही खर्चास घेउन व मातोश्री [ गोपिका ] बाईसाहेबाचे बहुत दिवस दर्शन नाहीं, हेही समजोन त्याजकडे गोदातीरी खासा स्वारी गेली. तुम्हांपासी असल्यास व गोदावरीतीरी असल्यास भेद नाहीं परंतु पुणेकर कारभारी याविसी खतरा बहुत होता. तो त्याणी शपत देउन व मध्येस्त मातबर देउन दूर केला, सबब नाशिकचे

---

(१८) केसो [ अथवा कुसाजी ] अनंत सुनेलकर या नांवाचा गृहस्थ पवाराकडे होता तो आबाजी रघुनाथ निगडीकराप्रमाणें शिंद्यांचे पदरीं आला असून या वेळीं दादा साहेबांकडे शिष्टाईस गेला असावा असें मानावयाचे कीं काय ? याला ‘ निस्बत चिटणीस ’ असें ही म्हटलें आहे.

सुमारे कुच केले. रेवातीरी रहावयाचा बेत बहुत होता परंतु चार महिने कर्जदार जाहलो. कर्जही सुरतेमध्ये आम्हांस कसे मिळेल ? हे तुम्हांस ठाउक आहे. फुलपाड्यास [ ? ] रहावें तरी चार महिन्यात निदानी एक लक्ष पाहिजेत व हाली कर्ज साठ सत्तरपरियंत आहे. पुण्याकडून पैसा मिळेना व केसो अनंत याजकडील [ प्रकार पहावा ] तरी अंमल बसउन रसदा घेउन देणार. तेव्हां येवजास ठिकाण नाहीं. चहूकडून खर्चाचा ताण मोठा पडला. तूर्त पुण्यांकडून हुंड्या आल्या व राजश्री फतेसिंगराव गायकवाड याजकडूनही कर्ज वारावयाबदल येवज देवविला याजमुळें थोडीशी सोई पडली. तूर्त गोदातीरी जातो. वरकड सविस्तर बोलणे ते केसो अनंत यासी ॰॰ जहालेच आहे. ते लिहितच असतील. भडोचेस ठेवावयास तोफा नव्हत्या सबब ५ तोफा केसो अनंताचे हवाली केल्या. गाडे व गोळे दिल्हे. दारू त्याणी परभारे खरिदी केली सबब दिल्ही नाहीं. अत:पर लौकरच मातुश्रीचे दर्शनास जातो. आपण हमेशा पत्र पाठउन संतोषवीत जावे. रवाना छ * ११ रजब. बहुत काय लिहिणे.

पो छ ९ साबान सुमा अर्बा समानैन मया अलफ.
उर्फ आषाढ शुद्ध १०
[ १० जुलै १७८३ ]

---

लेखांक [ १८ ]

श्री * संवत् १८५० माघ शुद्ध १५
[ १४ फरवरी १७९४ ]

नकल

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री
जीवाजी बलाल [ केरकर ] गोंसावी यास.

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार. सुमा अर्बा तिसेन मया अलफ. महादजी सिंदे याचें शरीरी ज्वराचा उपद्रव होउन माघ शुा त्रयोदसीस † देवज्ञा जाली. ईश्वर इछेंस उपाय नाही. तुम्हास इकडील [ ? ] बंदोबस्ताविसी राजश्री दौलतराव सिंदे लिहितील त्या प्रों तुम्ही तिकडील बंदोबस्त राखून खातरजमेचें काम काज करीत जाणें. जाणिजे छ * १२ रजब. आज्ञा प्रमांण.

---

† १२ फरवरी १७९४



# श्रीमंत पवार धारकर व देवासकर,

## यांचा असल पत्रव्यवहार.

### १८०२ ते १८५३ विक्रमी.

लेखांक [ १९ ]　　　　श्री[१९]　　　　* संवत् १८०२ चैत्र वद्य ६
[ ११ अप्रेल १७४५ ]

| |
|---|
| ☾ श्री ☼ |
| भवानीशंकर चर |
| णी तत्पर आनंद |
| राव सुत यशवंत |
| राव पवार नीरं |
| तर शके १७९२ |

राजश्री बाळाजी यशवंत [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो　यशवंतराउ पवार दंडवत. सुा खमस अर्बेन मया आलफ. राजश्री राघो हरी यास प्रा कोटे येथील कमाविस आपले तर्फेने सांगून पाठविले आहेत. तर तुम्ही व हे येकाविचारे राहू[ न ]आपल्या हिसियाचा रूा जो येईल तो मारनिलेचे पदरी घालने. तुम्ही आपले वर्तमान वरीचेवरी लिहित जाणे. छ * १९ रावल. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती. | मोर्तब शूद |

---

लेखांक [ २० ]　　　　श्री　* संवत् १८१० कार्तिक वद्य ६
[ १६ नवंबर १७५३ ]

| |
|---|
| ☾ श्री ☼ |
| भवानीशंकर चर |
| णी तत्पर आनंद |
| राव सुत यशवंत |
| राव पवार नीरं |
| तर शके १७९२ |

राजश्री बाळाजी बाबा [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　यशवंतराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत जाणे विशेष. राजश्री बाळाजीराम

---

( १९ ) संग्रहांत पवारांचीं २६ पत्रें सांपडतात. ऐतिहासिकदृष्ट्या तीं महत्वाचीं नाहींत. तथापि नमुन्यादाखल कांहीं पत्रें येथें दिलीं आहेत.

यास प्रा खेराबाद, बकाणी व चेचट येथील कमाविस सांगोन पाठविले आहे. त्यास या तीही महालची वाटणी जे आमचे तकसीमेची येईल ते मारनिलेचे स्वाधीन करणे. आणिक कोण्हाकडे न देणे. प्रा कोटे येथील जो यैवज आमचे तकसीमेचा होईल त्या वर कर्जदार वगैरे याच्या नेमणूका आहेत. यैशास तेही फडनीसी मारनिलेस सांगितली आहे. तर जो यैवज येईल तो मारनिलेचे विद्यमाने कर्जदाराचे नेमणूके [व] वराते प्रा दामा ~~ शाहीने देत जाणे. वेदमूर्ती राजश्री रामभट वैशंपायन यासि वरात दिल्ही आहे. तरी याचे चिरंजीव मारनिले आले आहेत. तरी याचा यैवज यास पावता होय ते करणे. रा छ * २० मोहरम. बहुत काय लिहिणे हे विनंती. | मोर्तब शूद |

पैा छ १५ रबिलाखर मास माघे वद्य २.
हडोती. फाल्गुण वद्य २ समत १८१०
सुमा अर्बा खमसेन मया आलफ.
[ ८ फरवरी १७५४ ]

---

लेखांक [ २१ ]

श्री * संवत् १८१० कार्तिक वद्य ८
[ १८ नवबंर १७५३ ]

| श्री भवानीशंकर चरणी तत्पर आनंदराव सुत यशवंतराव पवार नीरंतर शके १७९२ |

राजश्री बाळाजी बाबा [ गुलगुले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशेष. प्रा खैराबाद बकाणी हे नीमे महाल अलाहिदा[२०] आम्हाकडे आहेत. त्याची वाटणी अलाहिदा निघत आहेत. त्यास साल मारी खैराबाद बकाणी येथील कमाविस राजश्री संकराजी कृष्ण [ ? ] यास सांगोन पाठविले आहे, तर जो तेथील यैवज होईल तो मारनिलेचे पदरी घालणे. वरकड जो सस्थान कोटे येथील यैवज होईल तो राजश्री सोयराजी परशराम याजकडे देणे. जाणि ~~ जे छ * २२ मोहरम. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती. | मोर्तब शूद |

---

(२०) खेरावाद व बकाणी हे दोनी महाल होळकर व पवार या उभयतांकडे निमेनिम होते असें कळतें. [ भाग १ लेखांक २० व होळकरशाही खंड १ पान २ ]

लेखांक [ २२ ]

श्री * संवत् १८१० फाल्गुन शुद्ध १०

[ ४ मार्च १७५४ ]

| ☾ श्री ☼ |
|---|
| भवानीशंकर चर |
| णी तत्पर आनंद |
| राव सुत यशवंत |
| राव पवार नीरं |
| तर शके १७९२ |

राजश्री बाळाजी बाबा [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करीत गेले पाहिजे विशेष. राजश्री बाळाजीराम याजकडे आमचे तर्फेने कमाबिस आहे ते करार असे. कोण्ही भिडेस्तव कागद करून घेतले असले तर तेथे घेउन येतील [तरी] त्यास दखलगिरी न देणे. वराते दाखल जुने कर्जाची वरात केली आहे. ते [ व ] बाकी वसूल होईल त्यापैकी राजश्री बाळाजीराम देतील. सर्व गोष्टीने बाळाजीपंताचे साहित्य करून आमचा अमल हा आपला जाणून हर येकविसी साहित्य करणे. जाणिजे छ * ९ ☐ जाावल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

| मोर्तब |
|---|
| शुद |

---

लेखांक [ २३ ]

श्री * संवत् १८१२ वैशाख शुद्ध ८

[ १९ अप्रेल १७५५ ]

| ० श्री ० |
|---|
| सीवचरणी द्द |
| ड भाव तुको |
| जी सुत कृष्णा |
| जी पवार राव |

सिक्का लक्षांत येत नाहीं

राजश्री बाळाजी यशवंत [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो कृष्णाजी पवार दंडवत विनंती उपरी. यथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत गेले पाहिजे विशेष. पाा कोटे येथील आम्हाकडील हिसेयाची कमाविस राा भगवंत सामराज यासि पेशजी होती. ते त्याजकडून दूर करून हली राा कुसाजी हरी यासि सांगून परगणे मजकूरास पाठविले आहेत. तरी गोसावी यानी हरयेकविसी माारनिलेचे साईत करून आमल सुरली[ त ] चाले ते गोष्टी केली पाहिजे. पूर्ववतपासून स्नेह चालत आला आहे त्याप्रमाणे चालवीत गेले पाहिजे. आमचे हिसियाचा यैवज होईल तो याचे स्वाधीन केला पाहिजे. राा छ * ५ माहे जमादिलाखर. ।' बहुत काये लिहिणे कृपा असो ☐ दीजे हे विनंती.

| मोर्तब |
|---|
| सुद |

पेवस्ता चैत्र वद्य द्वादसी. हाडोती वैशाख वद्य १२

छ २५ माहे रजब.

[ ८ मे १७५५ ]

---

लेखांक [ २४ ]

श्रीजयती

| |
|---|
| श्री |
| भवानीशंकर चर |
| णी तत्पर आनंद |
| राव सुत यशवंत |
| राव पवार नीरं |
| तर शके १७९२ |

राजश्री बाळाजी यशवंत [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव पवार रामराम. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. पागेचे घोडे दांडग्यानी नेले. हे वर्तमान तुम्हास ठावकेच आहे. त्यास तलास करून घोडे आणउन पाा देणे. घोडियावसी तुम्हांस पेसजी सांगितले आहे. त्याजवरून तुम्ही तलास केला असेल. जरी शोध जाला नसिला तरी पुनरपि सोधे कर्तव्य तो करणे आणि घोडी येत ते करणे. जाणिजे छ १२ जाावल. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब सूद

---

लेखांक [ २५ ]

श्रीगजानन

| |
|---|
| ० श्री ० |
| सीवचरणि दृ |
| ड भाव तुको |
| जी सुत कृष्णा |
| जी पवार राव |

राजश्री लालाजी बाबा [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो कृष्णाजी पवार व सदासिवराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. संस्थान माारचा रुपया येत नाही याज करिता राजश्री पाटीलबाबानी[२१] आपणास रूबरू सांगितले आहे. त्यासी आता आपणाकडे राजश्री गोपाळरावजी पोले आहे. तर मागील बाकी व पुढील मामलत जाली आहे तो यैवज पंत माार[नि]लेचे पदरी ताकीद करून देवणे. पुर्वापासून तुमची आमची मामलत कांही दोन नाहीत. सर्व प्रारे भरवसा आपला आहे. मामलत दुसरे न जाणावी. रा छ १८ मोहरम. बहुत काय लिहिण हे विनंती. मोर्तब सुद

---

( २१ ) श्रीमंत महादजी शिंदे.

लेखांक [ २६ ]

श्री गजानन

| |
|---|
| ० श्री ० |
| सीवचरणि दृ |
| ढभाव तुको |
| जी सुत कृष्णा |
| जी पवार राव |

राजश्री लालाजी बाबा गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो कृष्णाजी पवार व सदासिवराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल ताा छ १७ माहे मोहरम जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. आपलेकडील बहुत दिवस पत्र येउन वर्तमान कळत नाहीं. तर यैसे न करावे. सदैव पत्री साकल्यार्थ लिहित जावे. यानंतर राजेश्री बगाजी गंगाधर हे दिलीकडे आहेत. त्याची मुले माणसे रो गंगाधर बगाजी [ याचें ] कुटुंबासुधा त्याजकडे पाठविले आहेत. तर आपल्यापासी पावलिया पुढे यास बंदोबस्त करून आपली माणसे पत्रें जागोजाग धागे धाग्याने देउन पावती करावी. कोठे कोण्हे गोष्टीचा अडथला न पडे ते करावे. सुखरूप त्याजपासी पावलियाचे उतर तुम्हास आले म्हणजे आपण आम्हा कडे पाठवितीलच हा भरोसा जाणून लिा असे. ॥ बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विनंती. मोर्तब सुद

लेखांक [ २७ ]

श्रीशंकर * संवत् १८५२ माघ वद्य १२

[ ८ मार्च १७९६ ]

| |
|---|
| ० श्री ० |
| भवानीशंकर च |
| रणी तत्पर खंडेरा |
| व सुत अनंदराव |
| पवार निरंतर |

सीधश्री नंदगांव[२२] महा सूभस्थानेक सर्व उपमा लाएक बिराजमान राजश्री महारावजी श्री उमेदसीघजी जोग्य. कीले धार सु राजश्री अनंदराव पवारजी केन रामराम बंचना. अपरंच. आठाका समाचार श्री जीरे कृपा सु भला छे. आप का सुख समीचार सदा लीखते रहणा. संतोष होसी. आंगू हकीकत ऐसा जो संस्थान मजकूर का काम काज आंगू राजश्री हरीराम पंडत [ लघाटे ] के तरफ था जस परमान हाल मसारनिले के तरफ सोप

(२२) महाराव कोटेकर हे वैष्णव सांप्रदायी असून कृष्णभक्त असल्यामुळें त्यांनीं आपल्या इष्टदेवतेचें मूळ ठिकाण नंदगांव बरसान्याचें स्मरण व्हावें यासाठीं कोट्यांस ‘ नंदगांव ’ व शेरगडास ‘ बरसाना ’ असें नांव दिलें त्यामुळें मराठी पत्रांत वरील प्रमाणें उल्लेख सांपडतो.

कर राजश्री बाळाजी संकर कू हुजूर बुलाया है. इस वास्ते संस्थान से बाळाजी को आदा पोहचा होवेगा उसकी रुजूबात हरी पंडतके चिंरजीवके विदमान से करकर मसार निले कू हुजूर भेज देणा. संस्थान मजकूर [का] कामकाज सरकार तरफ का आंगे परमान पंडत हरीराम के मारफात से लेणा. हामेसा कागदपत्र लीखते रहणा. मिती माघ वदी १३ त्रयोदसी समत १८५२. रा छ * २७ साबान सुमा सित तीसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे. मोर्तब सुद

---

लेखांक [ २८ ]                श्री                * संवत् १८५३ जेष्ट शुद्ध १२

[ १७ जून १७९६ ]

० श्री ०
भवानीशंकर च
रणी तत्पर खंडेरा
व सुत अनंदराव
पवार निरंतर

राजश्री राज जालमसिंगजी गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ अनंदराव पवार रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिा आसावे विशेष. साा कोटे येथे कादार याचे नावे पालखीची नेमणूक आहे परंतु पालखी करण्याची परवानगी दिली नव्हती. हली राजश्री हरीराम [ लघाटे ] यासि पालखीची परवानगी दिल्ही आहे. तर राजश्री लालाजीबाबा व आपण याबाच्या हवेलीस येक होउन पालखी ॥ द्यावी. पालखीचा रोजमुरा देत जाणे. नेमणूक यैवजी मजुरा पडेल. ॥ रा छ * ११ जिल्हेज. सुा सबा तिसेन मया व आलफ. ॥ बहुत काये लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद

बार

---



# श्रीमंत गायकवाड बडोदेकर

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८३० ते १८६९ विक्रमी.



लेखांक [ २९ ] श्री

श्री राजाराम छ
त्रपती अखिल प्रौढ प्रता
प पुरंदर सयाजीराव गा
यकवाड सेना खास खेल
समशेर बहादर

राजश्री[२३] गोसावी यांसि

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो· फतेसिंगराव गायेकवाड रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लखन करीत

---

( २३ ) पत्रांत नांवाची जागा रिकामी ठेविली असून सनसुद्धां दिला नसल्यामुळें वर्ष ठरवितां येत नाहीं. राघोबा दादाप्रमाणें गायकवाडांनीं फौजेची मागणी केली असावी असें म्हटलें तरी चालेल. किंतु ठोकळ मानानें त्याचा काळ १७७४ ते १७८० पावेतों धरला तर चुकीचें होणार नाहीं. तसेंच हें पत्र 'संग्रहांत' उपलब्ध होतें त्याअर्थी त्याचा कोटेकरांशीं म्हणजे बहुशः जालमसिंग झाला याच्याशीं संबंध असावा असें ओघानेंच निष्पन्न होतें. 'गुजराथ प्रांती झालावाड आहे. तिकडे राजाचे भाउबंद फार आहेत. पांच चार हजार स्वार पाहिजेतसे असल्यास येउन शामिल होतील. मर्जी असल्यास लिहून पाठवावे. इकडून परभारे लिहिली जातील' अशी शिष्टाई जालमसिंग झाल्याने महादजी शिंदे गुजराथेंत असतां चालविली होती [१७७४।७५] 'परंतु दूरची गोष्ट' फौज पुष्कळ 'ईश्वर इच्छेने घडणार ते घडेल' या कारणें शिंद्यांनीं मात्र मान्य केली नाहीं. [ १७७४।७५ ] तथापि तत्पक्षीय फतेहसिंगास ती हवी असावी. कोटेकरांनीं पत्करिलें तर इतके 'दूर' स्वसैन्य पाठविण्यापेक्षां 'झाला-वाडांतील भाउबंदांची गोष्ट' ते आपोआप बोलतील म्हणून संदिग्ध मागणी केली असावी असें वाटतें किंबहुना हा शिंद्यांचा मराठी कावा देखील असूं शकेल. त्यामानानें वरील पत्राचें वर्ष ठरविणें सोईस्कर होईल.

असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणाकडील पत्र येउन वर्तमान कळत नाही. तरी यैसे न करावे. निरंतर पत्री कुशलवृत लखन करावे, हे स्नेहात उचित आसे. यानंतर सरकारात तिकडील फौजेचे प्रयोजन आहे. यास्तव राजश्री लालाजी बलाल यासि पत्र लिहिले आहे. ते सविस्तर आपणास विदित करतील. ते ध्यानास आणोन मारनिले सांगतील त्याप्रमाणे फौजेची तजवीज करून पाठउन द्यावी. रा का×××यशवंत या कार्यास्तव रवाना केले असेत. ते सविस्तर निवेदन करतील. सारांश आम्ही आपल्यास लिहिले याचे [ आगत्य ] सर्व प्रकार धरून स्नेहास वृद्धी करा वी हे उचित आहे. सर्व आर्थ रा लालाजी बलाळ यास लिहिलेवरून कळो येईल. या कार्यास दिवसगत नसावी. ॥ रा छ * २ माहे रमजान. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विंनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ३० ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६९ वैशाख शुद्ध १३

[ २४ मे १८१२ ]

नकल

सिका.

राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो आनंदराव गायकवाड सेना खास खेल समशेर बहादर रामराम विनंती उपरी. तुम्ही शहर आमदाबाद येथून खरेदी कापड व रेसीम व किरमिज घेउन कोट्यास रवाना करणार व देशावराहून कापड शेहरी आणणार त्याचा निमें हांसिल माफी करावी म्हणोन सरकारांत विदित केले. त्यावरून तुमचे बदल खांतर सरकारातून निमें हासिल माफ[२४] करून नीमे हासिल मालास शिरस्ते प्रमाणें साल दरसाल देत जावे. येविसी प्रों मारचें दुभागाचे कादार याजवर पत्रें सादर केली आहे. रा छ * १२ माहे जमादिलावल सुमा सलास आशर मयातेन व आलफ. हे विंनंती. मोर्तब सुद

---

( २४ ) लालाजी गुलगुले यांचें वजन शिंदेशाहीच्या बाहेरही होतें असें स्पष्ट कळतें व त्याचे आगत्यासाठींच ही माफी झाली आहे.



# श्रीमंत मल्हारजी होळकर

## यांचा असल पत्रव्यवहार.

संवत् १७९९ तें १८२३ विक्रमी.

लेखांक [ ३१ ] श्री * संवत् १७९९ फाल्गुन बद्य २

[ १ मार्च १७४३ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी येशवंत [ गुलगुले ]

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नों मल्हारजी होळकर दंडवत. सुमा सलास आर्बैन मया अलफ. प्रा मा॥रचें पहिलें रुपयें आले होतें त्यापैकी राजश्री लक्ष्मणराव याचे कर्ज वारून आमचे दाहा हजार रुपये तुम्हाकडेस राहिले. पुढें जें हप्ते येतील ते वाटणीप्रमाणे रुपये आमचे कमाविसदाराचें हवाळें करावे यैसे असोन त्यास म्हणता की राजेश्री रामचंद्रबाबाचें पत्र येईल तेणेंप्रमाणें रुपये देउंन. तर तुम्ही काही नवे नव्हां ! पुरातन वाटणी [ तुमचे परिचयाची ] आहे तेणेप्रमाणे ज्याचे त्यास रुपये द्यावे. यैसे असोन कागदाचा उजूर करितां. तर हे गोष्ट उतम आहे यैसे नाही. तर दाहा हजार पहिले बाकीचे व हाली जे हप्ते आले असतील [ ते ] वाटणीप्रमाणे राजश्री कृष्णाजी गो [ विंद व ] कृष्णाजी हरी ~~ याजपासी देणे. [न द्यावे] यैसे तुमचे चिती असेल तरी सुखरूप आसो. कमाविसदारास उठउन लावणे. यैसीच तुम्हास आज्ञा[२५] असेल तरी

(२५) हें पत्र शिंदे होळकरांच्या दुहीचें द्योतक असून गुलगुले त्यास कारणीभूत झाले असावेत असा ग्रह बलावत असला तरी विचारांतीं तो भ्रमच वाटतो. कारण ' लक्ष्मणरायाचे कर्ज ' होळकरांस देखील मान्य असून तें फेडण्याविषयीं आक्षेप नाहीं. कटाक्ष केवळ फाजील रकम थोपविल्याबद्दल आहे. फेडीचा संबंध शिंद्यांशीं येत असल्यामुळें त्यांचे आज्ञेनुसार रकम थांबवून ठेवणें भाग पडलें

तैसे करणे. जाणिजे * छ १५ मोहरम. [1] हे विनंती.

मोर्तब
सुद

पैवस्ता छ २७ माहे सफर. चैत्र वद्य चतुर्दसी.

बदस्त जासूद दिा रा कृष्णाजीपंत

[ १२ अप्रेल १७४३ ]

---

लेखांक [ ३२ ] श्री * संवत १८०० जेष्ठ शुद्ध ४

[ १६ मे १७४३ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार

प्रा कोटे गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुमा अर्बा अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले. वर्तमान कळो आले. लिहिले की गुदस्ता तनख्वा दिल्हा होता त्याची बाकी राहिली आहे. त्यात पंधरा दिवस वसूल करावयास लागतील. साल मारचा तनखा करून देत होते, ते घेतली नाही म्हणून माहारावजी श्रमी आहेत. नगद देणार आहेत परंतु जमा होत नाही, यास्तव सेवटी तनखा घ्यावा लागेल म्हणोन लिहीले. [तरी] याचा सर्व विचार राजश्री राणोजी बाबा रु [शिंदे या]नी

---

अर्थात् गुलगुल्याकडे दोष देतां येत नाहीं [ भाग १ लेखांक ७ ] किंवा शिंद्यांकडेही तो जाऊं पाहात नाहीं. रकम निश्चित करून चिठी करण्यासंबंधीं जो थोडा अवकाश लागला त्या अवधींत हें पत्र येऊन थडकलें. वस्तुतः या पूर्वीच रामचंद्र बाबानें त्याचें निराकरण केलें होतें. [ २८ फरवरी १७४३ ] असलें जमाखर्ची वादळ अनेक वेळां उठलें असेल. पण त्या सर्वांचा संदर्भ दुहीशीं जोडणें प्रशस्त होणार नाहीं तथापि हें पत्र एका दुसऱ्या दृष्टीनें बरेंच मननीय वाटतें. वांटणीतत्वाविषयीं होलकरांचे जे विचार प्रगल्भ झाले होते त्यांचा बराच परिस्फोट होतो. या मितीपर्यंत परस्पर स्नेह नांदत असल्यामुळें 'वाटणीप्रमाणें ज्याचे त्यास द्यावें उजूर उत्तम नाहीं' असा तात्विक बोध केला असून 'कमाविसदारास उठवून लावणेची आज्ञा असेल तरी तैसे करणें' विषयीं संमति दर्शविली आहे. अर्थांत तिचा प्रतिरोध करण्याची प्रवृत्ति दर्शविली नाहीं. हें कांहीं अंशी खरें असलें तथापी हा केवळ औपचारिक विनोद होय. स्नेहाचें प्राबल्य राहिलें तों पावेतों असल्या वाक्प्रहारापलीकडे रुसवा गेला नाहीं. पण त्यांत स्थित्यंतर होऊन चुरस वाढली त्याबरोबर वांटणीतत्वाचें खरें वारें संचार करूं लागलें हें मात्र लक्षांत घेण्या सारखें आहे. [ लेखांक ७२ ]

लिहिला[२६] आहे त्याजवरून कळो येईल. त्या लिहिल्याप्रमाणे वर्तणूक करणे. जाणिजे छ * २ राखर. ꠱ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ३३ ]

श्री * संवत् १८०० मार्गशीष वद्य ४

[ २४ नवंबर १७४३ ]

श्री म्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बालाजी यशवंत

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर दंडवत. सुमा अर्बा अर्बेन मया अलफ. रा कृष्णाजी विस्वनाथ हे आमचे आहेत. यास सिपारस पत्र राजश्री महाराव दुरजन [साल] सिंग यास दिल्हे आहे. तर तुम्ही मारनिलेस नेउन याची भेट करून याचे साहित्य उतम प्रकारे करून याचा योग क्षेम ते स्थली चाले असे करणे. याचे अगत्य आम्हास बहुत प्रकारे आहे. तुम्ही याचे साहित्या न चुकणे. जाणिजे ꣸ छ * १८ सवाल. ꠱ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ३४ ]

श्री * संवत् १८०० पौष शुद्ध ३

[ ८ दिसंबर १७४३ ]

श्री म्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुमा

---

(२६) मकसूदाबादच्या स्वारींत शिंद्याप्रमाणें पिलाजी जाधव होते हें जसें स्पष्ट कळतें तसा बोध होळकरासंबंधीं होत नाहीं. [पुरंदरे १ लेखांक १५२] राणोजी शिंद्यांचे पत्रावर हवाला ठेविला आहे त्याअर्थीं शिंदेहोळकर बरोबर असावेत असें वाटतें. या पत्रावरून दुसरी गोष्ट लक्षांत घ्यावयाची ती ही कीं, मल्हारजीचा उल्लेख करतांना राणोजींनीं केवळ 'मल्हारबा' असें म्हटलें आहे [भाग १ लेखांक ७] पण होळकरांनीं शिंद्यांस 'राणोजीबाबा' असें कां म्हणावें? राणोजी शिंदे मल्हारजीहून वयस्क तर नव्हते ना? कारण होळकरांनीं 'जनकोबा' असें संबोधिलें आहे. [लेखांक ६४]

अर्बा अर्बेन मया अलफ. तुम्हाविसी राजश्री कृष्णाजी गोविंद व कृष्णाजी हरी याणी येउन कीतेक प्रकारे सांगितले. त्यास तुम्ही व हे येका मते राहावे हे उजित आहे. प्रा कोटे येथील साल गुदस्ताचा यैवज मारनिलेस देविला आहे. त्यास याचे तर्फेने तेथे रा आबाजी × × [रघु]नाथ [निगडीकर[२७]] आले आहेत तर जो बाकी पैकी रुपया वसूल होईल व पहिला जाला असेल तो आबाजीपंत याचे पदरी घालणे. हे व तुम्ही येके विचारे असत जाणे. तुम्हीं आपले सर्व प्रकारे समाधान असो देणे. जाणिजे छ * २ जिलकाद. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा माघ वद्य २. बराबर राजश्री × [आ]बाजीपंत

[२० जनवरी १७४४]

---

लेखांक [ ३५ ]

श्री * संवत् १८०१ आश्विन शुद्ध ३

[१७ सितंबर १७४५]

श्रीम्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखन करणे विशेष. पत्र पाठविले [ ते ] प्रविष्ट जालें. प्रा पाटण येथील मामलतीचे वृत तपसीलें लिहिलें [ तें ] कळो अलें. यैसियासि राजश्री चिमणांजी गोविंद व रामाजी जगंनाथ येथ येणार आहेत. ते आलिया उपरी मनास आणून आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. जाणिजे छ * २ रमजान. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

पैा छ १३ रमजान

[२८ सितंबर १७४५]

---

(२७) भाग १ लेखांक ७५ टीप १०२ पहा. आबाजी रघुनाथ, कृष्णाजी रघुनाथ व गोपाळराव रघुनाथ हे तिघे सखे भाऊ शिंदेशाहींत उदयास आले. या घराण्याचा स्वतंत्र पत्रव्यवहार पुढें येणार आहे.

लेखांक [ ३६ ]                श्री      * संवत् १८०१ कार्तिक वद्य ५

[ ३ नवंबर १७४५ ]

श्रीम्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो        मल्हारजी होळकर दंडवत. सुाा सित अर्बेन मया अलफ. तुम्हाकडील वर्तमान राजश्री मेघशाम दामोदर [ ? ] याणी सविस्तर विदित केले त्यावरोन ध्यानास आले. यैवज अद्यापि वसूल होउन न आला. अपूर्व आहे! तरी या उपरी निकट करून वसूल प्रा मारीचा रा माहारायाकडील लौकर वसूल करणे. ॥ त्या प्राते[२८] स्वारी लौकरीच होईल मग श्रमी होतील. तरी यैसे पष्ट समजोन वर्तणूक करवणे. छ * १९ सवाल ॥ हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ३७ ]                श्री      * संवत् १८०२ फाल्गुन शुद्ध ५

[ १४ फरवरी १७४६ ]

श्रीम्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत व राजश्री हरी बल्लाल

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये स्नो        मल्हारजी होळकर दंडवत. सुहूर सन सित अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविलें [तें] पावोंन वर्तमान निवेदन जाले. लिहिलें कीं 'सरकारचा लाखा रुपयाचा हवालासुधा दोन लक्ष रुपयांची तनखा पेसजी दिल्ही. त्यापैकी आज तागाईत पाउण लक्ष रुपये वसूल जाले. बाकीची तहसील होत आहे. यैसियासी लस्करचे अगमन यैकोन पांच लक्ष रुपयाचा मुलुक प्रा बरे व बडोद व मह्रू[२९] वगैरे यैसी तनखा द्यावीसी केली,' म्हणून लिहिले [ ते ] सर्व कळू आले. यैसियासी

---

(२८) या वेळीं मल्हारजी होळकर कोठें होते हें स्पष्ट कळत नाहीं. तथापि पुढील पत्रांत 'पावागड प्रांतीची बंदोबस्ती करून डोंगरपुर प्रांते आलो' असें म्हटलें आहे तेव्हां ते गुजराथेंत असावेत असें दिसतें.

(२९) बरे, बरोद व मह्रू हे तिन्ही महाल कोटा राज्यांत आहेत.

आम्ही प्रा सुटलाणे,[३०] तांडा,[३१] पावगड[३२] प्रांतीचा मुलुक [ सोडवून ] तेथील बंदोबस्ती करून सांप्रत डोंगरपुर[३३] प्रांते आलो. येथील तहरह जालियानंतरे उदेपुर[३४] प्रांते जाउन तेथील कार्यभाग उरकून हाडोतीकडे येतो. तिकडे लस्करचा रोख आलिया उपरी तुम्ही पुढे भेटीस येणें. मग जो विचार कर्तव्य तो केला जाईल. जाणिजे छ * सफर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा छ १८ सफर
[ २८ फरवरी १७४६ ]

---

लेखांक [ ३८ ]

श्री * संवत् १८०२ श्रावण शुद्ध २
[ ९ जुलै १७४६ ]

श्रीम्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बालाजी यशवंत व हरी बलाल
व आबाजी रघुनाथ कमाविसदार
पा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर दंडवत. सुा सबा अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविलें [ तें ] पावोन वृतांत कळू आला. 'मोपतराम याज बराबर सेरगडास दोन महिने जाउन राहिलो. यैवजा करिता तगादा केला परंतु [महाराव] विचारावर येउन वसूल देता दिसत नाही,' म्हणून पत्री लिहिले. यैष्यास तुम्ही तगादा

---

( ३० ) सुटलाणें हें स्थळ नकाशांत मिळत नाहीं पण तें पावागडापैकींच असलें पाहिजे.

( ३१ ) हा तांडा कोणता ? शिंदेशाहींत जिले अमझेऱ्यांत याच नांवाचा एक गांव असून तेथें गढी पण आहे. ती पूर्वी पावागडाखालीं मोडत असली पाहिजे किंवा या नांवाचें निराळें गांव तरी पावागडांत असलें पाहिजे.

( ३२ ) किले पावागड हा गुजराथेंतील सुप्रसिद्ध किला सर्वांच्या परिचयाचा असून तो पुढें शिंद्यांच्या वांटणीस आला. त्याचें हें मुख्य स्थान होतें.

( ३३ ) डोंगरपुर हें लहानसें संस्थान असून हीं उदेपूरची एक शाखा आहे व ती आजही अस्तित्वांत आहे. [ Aitchison Treaties vol iii page 21 ]

( ३४ ) मल्हारजी होळकर 'उदेपुरचा कार्यभाग उरकून' जेतपुरास शिंद्यांचे मोर्चे लागले असतां मागाहून शिंद्यास येऊन मिळाले. [ भाग १ लेखांक ५० ] अशा स्थितींत 'हाडोतीचा' गुंता उलगडून आले असतील असें वाटत नाहीं.

करणे. विचारावर येउन वसूल देतील तो घेणे. बुंधेलखंड प्रांताचा बंदोबस्त जालिया त्या प्रांते येउन त्याचेही पारपत्ये बरेवजेने केले जाईल. फिकीर नाही. जाणिजे छ १ * रजब. |' हे विनंती.




पैवस्ता छ २१ माहे रजब
श्रावण वद्य ८ गोकुलाष्टमी.
[ २९ जुलै १७४६ ]

---

लेखांक [ ३९ ] श्रीमोरया * संवत् १८०२ भाद्रपद शुद्ध १
[ ६ अगष्ट १७४६ ]




३५

राजश्री बाळाजी यशवंत व हरी बलाळ
व आबाजी रघुनाथ कमाविसदार
पा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर व जयाजी सिंदे

---

( ३५ ) उत्तर हिंदुस्थानची ' **मुतालकी** ' शिंद्यांकडे होती असें जें प्रतिपादन केलें आहे त्यासंबंधीं हें ' **मोरया, मोर्तब व सिक्का** ' प्रत्यंतर पहावें. [ भाग १ वंशावली पान ५ ] अशीं पत्रें जी ' संग्रही ' उपलब्ध झालीं तीं या भागांत दिलीं आहेत. [ लेखांक ४२, ५० ] मात्र असलीं पत्रें १७५२ पर्यंत मिळतात आणि तींही ज्या स्वारींत शिंदे व होळकर दोन्ही समागमें राहिले अशा संधीसच विशेषतः सांपडतात. यांत होळकराचें नांव जें दिसतें त्याला सानिध्य व 'समाइकत्व' कारणीभूत असून वयमानें अग्रमान प्राप्त झाला असावा असें निराळें सांगावयास नको. हा प्रघात जुना होता किंवा नवीन प्रचार पावला हें सांगवत नाहीं. ' मुतालकी ' संबंधीं बाजीराव पेशवे यांचें पत्र फार मार्मिक व अर्थप्रचुर आहे. स्वतःसंबंधीं दोघांचीं मनें कलुषित न होऊं देतां त्यांनीं आपलें हृद्गत प्रगट केलें आहे. त्यानुसार ' मुतालकी ' पुढें निरंतर शिंद्यांकडे राहिली असें क्षीरसागर व शकावलीकार यांनीं सिद्ध केलें तें निर्विवाद आहे. सख्यसंरक्षणार्थ शिंद्यांनीं सोबत्याची तोड काढली असावी असा प्रश्न करण्याची साहाजिक प्रवृत्ति होते. त्याविषयीं समाधानजनक संदर्भ जुळत नसला तरी त्या भावनेचें प्रतिबिंब वरील प्रघातांत उतरलें नसेल कशावरून ? ' मुतालकी ' शिंद्यांकडे निरंतर चालली हा सिद्धांत खरा ठरला आणि मोगल बादशाहाशीं केलेल्या तहांत शिंद्यांची प्रथम सही होती असें जें इतिहासकार ध्वनित करीत आहेत त्यांचें सूत्र मुतालकीशीं जुळत असलें तर हा प्रघात मात्र नवीन होता असें मांनिल्यावांचून गत्यंतर नाहीं. किंबहुना चुरस उत्पन्न करविणारीं जीं अनेक कारणें उद्भवलीं त्यांत याचाही समावेश करणें ओघानेंच प्राप्त होईल. हा युक्तिवाद निदान मला तूर्त तरी ग्राह्य वाटत नाहीं. कारण कीं याच 'मुतालकीचा' शोध न लागल्यामुळें इतिहासाचार्य राजवाडे यांची क्षुल्लक परवान्यांतील शब्दाविषयीं जशी दिशाभूल झाली, तसाच प्रकार या गोष्टींत संभवणीय आहे. [ भाग १ लेखांक ६ ] यासाठीं राणोजी शिंद्यांच्या वेळचें एखादें पत्र पुढें येईपर्यंत ठाम मत निश्चित करणें प्रशस्त होणार नाहीं. हा पुरावा मुतालकीच्या तत्वाविषयीं मात्र पुरेसा आहे. होळकरांचा संबंध कधीं व कितपत होता याचें स्पष्टीकरण पुढें कदाचित् संभवणीय आहे इतकेंच सुचवावयाचें होतें.

दंडवत. सुा सबा अर्बेन मया अलफ. पाा मजकूरची सरमजमू राजश्री सिवजी शंकर याजकडे पेसजी सनद आहे, त्यासी हली मशारनिलेकडेच मजमू करार केली असे. याच्या तर्फेने जो कोणी तेथे येईल त्याच्या हाते सरमजमूचे लिहिणीयाचे प्रयोजन घेउन वेतन पेसजीच्या सनदे प्राा पावणे. रोजा ꣻ विसी गुदस्ता चालत आले त्याप्रमाणे चालवणे. नवी दिकत न घेणे. जाणिजे छ * २९ ।' माहे रजब. बहुत काय लिहिणे हे विनंती. (लखन सिमा)

पैवता छ १९ माहे शाबान. भादवा वद्य ६

[२६ अगष्ट १७४६]

बार

---

लेखांक [४०] श्री * संवत् १८०२ मार्गशीर्ष शुद्ध ४

[५ नवंबर १७४६]

राजश्री बाळाजी यशवंत व हरी बलाल

व आबाजी रघुनाथ कमाविसदार

पाा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेाा मल्हारजी होळकर दंडवत विनंती. सुमा सबा अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले [तें] पावोन वृतांत कळू आला. राजश्री सोपतरामजी यासि व आम्हास राजश्री माहारावजीनी बहुत प्रकारे सांगून आपणाकडे पाठवावयाची सिद्दता केली. त्यासि रोख यैवज जमा होणे यास्तव इतके दिवस लागले. आपली पत्रें अली. ते नाथद्वारास राजश्री माहारावजीकडे पाठविली आहेत. उ[त्तर] आल्या सत्वरच येतो, म्हणून लिहिले [त्या] स त्याच्या मनास सर्व प्रकारे × × न असावे. निष्ठापूर्वक वर्तन × × ते गोष्टी उतमच त्याज × × सचोटी राखलिया स्नेह × × ईल राा सोपतराम × × समागमे घेउन येणे × × लिहिणे न लगे. [बहुत काय लिहि] णे ।' हे विनंती.

पैाा छ २ माहे जिलकाद

मार्गशीर्ष सुध ४ बुधवार.

[५ नवंबर १७४६]

---

लेखांक [ ४१ ]

श्री * संवत् १८०३ फाल्गुन शुद्ध ५

[ ३ फरवरी १७४७ ]

श्री म्हांळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

सीधश्री अमेसींघजी [!] जोग्य मलारराव होलकर केन बंचणो. अंगो परगने रायपुर [!] की साल मजकूर से मजमु गोपाळ त्र्यबक [!] ईनसे कही है. ईन के हाथ से मजमु का कामकाज लेकर इने को सालीना वेतन रुपया ४०० च्यारसो करार कीये सो पोहच्यावना. मीती फागन सुधी ५ सं. १८०३

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ४२ ]

श्री * संवत् १८०३ फाल्गुन शुद्ध ६

[ ४ फरवरी १७४७ ]

श्री
राजा शाहु
नरपति हर्ष नि
धान बाळाजी
बाजीराव प्र
धान

राजश्री बाळाजी यशवंत व हरी बलाळ
व आबाजी रघुनाथ कमाविसदार
कोटे प्रा गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर व जयाजी सिंदे दंडवत. सुा सबा अर्बेन मया अलफु. रा बाळाजो यशवंत यासी पालखीच्या[३६] सरंजामामुळे समाइक ऐवजी प्रा मजकूरपैकी रुपये १००० देविले असे [ते] साल दरसाल पावीत जाणे. 卍 जाणिजे छ * ५ सफर. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

लेखन
सिमा

बार

---

( ३६ ) बाळाजी गुलगुले यास पालखी तर या पूर्वीच मिळाली होती असें हें पत्रच सांगतें. नेमणूक 'समाइक ऐवजी' खर्ची टाकण्याविषयीं हें केवळ संमतिपत्र होय. पवार व होळकर यांनीं आपापले हस्तकांस पालख्या दिल्या आहेत [ लेखांक २८, ५०, ६० ].

लेखांक [ ४३ ]

श्री

* संवत् १८०४ जेष्ट वद्य १

[ १२ जून १७४७ ]

श्रीम्हांळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्यें स्नो मलारजी होळकर दंडवत. सुहूर सन समांन आर्बेन मया अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें [तें] प्रविस्ट जालें. कितेक तपसीले आर्थ लिहिला तो सर्व निवेदन जाला. कोट्याचे मामलतीचे वसूलास दिवसगत लागली. साल गुजरोंन गेले. या सालचा वसूल आणि पेसजीची बाकी यैसा बेमुबलग पैसा माहारायापासून घ्यावा लागतो, त्यास या उपरी निकट करून वसूलाची ताकीद माहारायास उतम प्रकारे करून यैवज सरकारात पोहचें तें करणें. तुम्ही त्यांचे स्थितीस पुरतें वाकफ न्हे आसोन अजीपर्यंत वसूल राहू दिधला हे आपूर्व [ असे ! ] या उपरी बहुत निकटीने वसूल घेणे. छ * १४ जमादिलाखर. हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखाक [ ४४ ]

श्री

* संवत् १८०५ चैत्र शुद्ध १५

[ २ अप्रेल १७४८ ]

श्री म्हांळसा कांत चरणी त त्पर खंडोर्जी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी येशवंत व रा कृष्णाजी हरी
व आबाजी रघुनाथ कमाविसदार
पा कोटे गो यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा समान अर्बेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले [ तें ] पावोन वृतांत कळू आला. रा माहाराव आपले आज्ञेसिवाय नाही, रुपयाच्या तरतूदेंत आहेत, म्हणून लिा. यैशास उतम आहे. रुपयाची वाट करून द्यावी. सर्व प्रकारे साधना करावी म्हणजे उतमच आहे. रुपऱ्याचा तगादा करून वाट करून घेणे. छ * १४ राखर. ।' हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ४५ ]

श्री * संवत् १८०५ कार्तिक शुद्ध ३

[ १४ अक्टूबर १७४८ ]

श्रीम्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री आबाजी रघुनाथ [ निगडीकर ]
कमाविसदार पा। कोटे गो। यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ मलारजी होळकर दंडवत. सु॥ तिसा अर्बैन मया अलफ. रा॥ बाळाजी यशवंत यासि रायपुरची मजूमीची सनद पेशजी आहे त्यासि वेतन गैरआदा सबब पा॥ मजकूर यैवजी तुम्हाकडे रुपये ५०० पांचसे देविले आसेत [ ते ] पावते करून कबज घेणे. सिवाये साल दरसाल रुपये च्यारसे प्रमाणे पावीत जाणे. उजुर न करणे. दि॥ साल मजकूरपासून च्यारसे दरसाल पावीत जाणे. जाणिजे छ * २ जिलकाद. ।' हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [ ४६ ]

श्री * संवत् १८०६ आषाढ शुद्ध ८

[ १ जुलै १७५० ]

श्री म्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्ने॥ मलारजी होळकर दंडवत. सु॥ इहिदे[३७] खमसीन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविलें ते पाउन वर्तमान कळू आले.

---

( ३७ ) पत्रानुसार १ जुलै १७५० ही तारीख येते खरी पण ती बरोबर वाटत नाहीं. हस्तदोषानें सुरसनाचा घोटाळा दिसतो. 'इहिदेच्या' जागी 'इसन्ने' हवें होतें. कारण सरळ आहे कीं या सुमारास 'होळकर व आम्हांस त्या प्रांतास श्रीमंत स्वामी यांणी रवाना केलें' असें जयाजी शिंदे स्पष्ट सांगतात. [ भाग १ लेखांक ८३ ] तेव्हां 'छावण्या मडसमसाबादेपासी झाल्या' असें संभवत नाहीं. 'समसाबादेस' छावणी 'जून १७५१' सालीं झाली होती खरी. [ भाग १ लेखांक ९० ] पत्रांतील स्थलनिर्देशावरून हें पत्र १७५१ चें ठरतें आणि जंत्रीनुसार तारीख २० जून १७५१ येते. म्हणजे जयाजी शिंद्यांच्या पत्रानंतर दोन दिवसांच्या अंतरानें हें पत्र लिहिलें गेलें असलें पाहिजे. तोच प्रकार लेखांक ४८ चे सना संबंधी आहे.

माहारायाकडील मजकूर लिहिला तों सर्व ध्यानास आला. तुम्ही वरचेवर तगादा करून वायदेबंदी प्रा यैवजाची निशा करून घेणें. मुदतीस यैवज न राहें तें करणें. इकडील वर्तमान तर 'प्रस्तुत छावण्या मउसमसाबादे[३८] पासी जाल्या आहेत. इकडील बंदोबस्त होउन बादज बरसात त्या प्रांतासी येणे होईल.' छ * ७ शाबान. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

(३८) 'अंतरवेंदींतील लढाई आटपून होळकर १७५१ च्या अक्टोबरांत झांसीस आले' असें विधान ज्या आधारावर राजवाड्यांनीं केलें आहे तें थोडें डळमळीत दिसतें. कारण कीं ती 'उडवार्ता असून सत्यमिथ्य कळत नाहीं' असें लेखकच स्पष्ट सांगतो. [खंड १ लेखांक ८ टीप ३८] कोणी प्रमाण लक्षांत असावें असें मानिलें तरी चिटोरात्मक कसोटीस मात्र तें उतरत नाहीं. मोगल बादशाहाकडून शिंदेहोळकरांनीं 'आपले गुंते उगवून' जून १७५१ च्या सुमारें 'उभयतां [नी] मह्रू, समसाबादेस छावणी केली' अक्टोबरांत 'श्रीगंगेस पूल बांधोन पार उतरले' आणि दिसंबरांत त्यांनीं 'पठाण रोहिले कोंडले' [भाग १ लेखांक ८६,९०,९३,९५] तेव्हां पठाणांशीं लढाई आटपली कधीं व झांसीस जाणें घडलें कसें ? पत्रान्वयेंच बोलावयाचें तर 'कूच' करण्याची ही केवळ हुलकावणी होती. [लेखांक ४८] वस्तुतः 'पठाणास तंबी पोहचवीत' असल्याचें स्वयम् मल्हारजी होळकर सांगतात. [लेखांक ४९] हा उलट पुरावा निर्णयात्मक नव्हे काय ? १७५१ या सालीं झांसीकडे जावयास होळकरांस फावलेंच नाहीं. त्यांचे ऐवजी नारोशंकर आले आणि बंदोबस्त करून परत जाऊन मिळाले असेंच जास्त संभवतें. [खंड ११ लेखांक ७५] असें गृहीत धरून चाललें तर राजवाड्यांची तारीख एक वर्ष पुढें ढकलावी लागते. तसें कलें असतां बाध तर येत नाहींच उलट पत्रांतील वर्णनाशीं तिचें सादृश्यच होईल. बुंदेलखंडांतील कुवर भुपालसिंगाची दुंडी, प्रिथीसिंगाचें निधन व सावंतसिंगाचें राजतिलकाचें वर्ष निश्चित् करण्यासाठीं आमचे जवळ साधन नसलें तरी शिंदे होळकरांचा जो संदर्भ दाखविला आहे त्यासंबंधीं निदान '१७५०' हें वर्ष ग्राह्य वाटत नाहीं. पत्रांत दिलेली परिस्थिति केवळ १७५१ ह्या वर्षींच सांपडते. अन्य कोणतेंही वर्ष धरलें असतां तें जुळत नाहीं. याला अतःप्रमाणाची खूण हवी असल्यास ती ह्याच पत्रांत आढळते. 'राजतिलक मार्गशीर्ष शुद्ध १० मीस' करून त्याच दिवशीं पत्र लिहिलें असें मानिलें तर **मार्गशीर्ष** शुद्ध १० मीस '**९ मोहरम**' १७५१ याच सालीं येतो. तें दुसरें दिवशीं लिहिलें गेलें असें राजवाड्यांनें ग्रहीत धरलें आहे तें बरोबर नाहीं. पत्रानुरोधें फार तर 'फरकाबादेहून' नारोशंकर आले असतील असें मानतां येईल. पण दिसंबर १७५० पर्यंत शिंदे होळकरांनीं जर चमेल नदीच पार केली नव्हती. [भाग १ लेखांक८४] किंबहुना विजयादशमीच्या सुमारें अवंतीमहेश्वर सोडलें असावें. [लेखांक ४८] अशा स्थितींत 'मागती सरदारांचीं पत्रें आली कीं पठाणांनी बल केलें, फौजेसह सत्वर येणें. त्यावरून दरमजल सरदाराकडे जात असो,' याचें रहस्य तरी काय असूं शकेल ?

लेखांक [ ४७ ] श्री * संवत् १८०६ कार्तिक शुद्ध ५

[ २४ अक्टूबर १७५० ]

श्रीम्हांळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत कमाविसदार

प्रा कोटे गोसावी यासि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा इहिदे खमसेन मया अलफ. रा हरबाजी मुरार याची घोडी तुम्ही मौजे भोवासीयातून नेली आहे याजबदल तुम्हास येक दोन पत्रेंही पाठविली व रूबरूही सांगितले. तुम्ही ही कबूल केले की घोडी देतो. अद्याप घोडी पंत मारास पावली नाही म्हणून विदित जाले. हे अपूर्व आहे! तर आतां पत्र दर्शनी घोडी पंत मजकूरा न्हे चे स्वाधीन करणे. फिरोन बोभाट येउ न देणे. ॥ रा छ * ४ जिल्हे [ज.] बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ४८ ] श्री * संवत् १८०६ कार्तिक वद्य ४

[ ६ नवंबर १७५० ]

श्री म्हांळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत

कमाविसदार पाा कोटे गो यांा

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा इहिदे खमसेन मया अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन वृतात कळू आला. माहारावजी यानी राजश्री बेणीराम भट याजला कितेक स्नेहवादे करून पाठविले आहे. [ते] भेटिले आसतील म्हणून लिहिले. यैसियासि भटजी आले. भेटी जाली. बिना माहारावजी यानी पैका झाडून दिलियावाचून स्नेह कैसा राहतो? पैका दिल्हीया उतम आहे. आम्हीही कूच करून येत आसो. ॥ छ * १७ जिल्हेज. बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ४९ ]

श्री * संवत् १८०७ कार्तिक वद्य ६

[ २८ अक्टूबर १७५१ ]

श्रीम्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत विनंती. सुा इसने खमसेन मया अलफु. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन वर्तमान कळू आले. माहारायाकडील मजकूर लिहिला की तरतूद यैवजाची करून प्रस्तुत श्री नाथद्वारा गेले आहेत. ते आली वाचून यैवज हातास येत नाहीत. ते आलिया निकाल करून घेतो म्हणून लिहिले. यैसियासि तुम्ही वरचेवर त्यासि तगादा करून यैवज वसूल येईल तो घेणे. इकडील 'कार्ये [ संपत आले ] पठाणास तंबी पोहचाउन सत्वरीच त्या प्रांतासी येतो. उपरांतिक सर्वांचे पारपत्य केले जाईल.' छ * १९ जिल्हेज. ||' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ५० ]

श्री * संवत् १८०९ अधिक आषाड शुद्ध १२

[ १२ जून १८५२ ]

श्री
राजा शाहु
नरपति हर्ष नि
धान बाळाजी
बाजीराव प्र
धान

दस्तक 'सरकार' राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी सिंदे. कमाविसदारान चौकीदारान व रहादारान व बाजे लोकान व जकाते माहाय व नदी नावाडीयान वगैरे. सुा सलास खमसेन मया व अलफ. राजश्री हरी दामोदर कुटुंबसह वर्तमान श्री [काशी] चे यात्रेस जात असेत. यांज बाा पालक्या २ घोडी ५०० डोल्या १०० मनुष्ये २००० वगैरे भार[ बर ]दारी असे. याजला राहा दरम्यान कोणी मुजाहिम न होता सुखरूप जाउ देणे व जेथे वस्तीस राहतील तेथे जागा देउन रखवाली करणे. हासिलाचा तगादा न करणे. ताकीद असे. जाणिजे छ * १० शाबान.

लेखन
सिमा

---

लेखांक [ ५१ ]　　　श्रीरामजी　　* संवत् १८०९ आषाढ शुद्ध ९
[ ८ जुलै १८५२ ]

श्री महारावजी　　　　श्री 'राव[३९]' मलाररावजी [ होळकर ]
सुबादार श्री राव जीयाजी [ शिंदे ]

ली. पचोली रामकिसन आगा सिरकार श्रीजी की तरफ सु मामलती चुकी. आगली बाकी खरनी सुधा कीसु. स[ मत् ]१८०९ का साल म देना रुपया ६,०५,८९७ अक रू. छ लाख पांच हजार आठसे सतानव सु इ माफक देना. ती का बोरो

२५८९७ भादवा सु १५　　　　२००००० फागन सुदी १५
२००००० असाड सुदी १५

संवत १८१० का साल म दिन्हा रुपया ४२५०००

३००००० हाल खरनी का　　　　पाछला लख रस देना १२५०००

सद्र माफक देना.

---

(३९) राजेरजवाडे यांच्याशीं झालेले अनेक 'करार' संग्रहांत असून ते क्रमशः पुढें पाहावयास मिळतील. बहुतेक असल असून थोड्या नकलाही आहेत. त्यासर्वांशीं सांप्रत कर्तव्य नाहीं. पानिपतीय किंवा तत्पूर्वकालीन करार जे या भागांत आले आहेत त्यापुरताच विचार केला तर त्यांत शिंदे व होळकर या उभयतांचींच नांवें आढळतात आणि दोघासही 'राव' असें राजसूचक संबोधन वापरलें आहे. [ लेखांक ५२, ६६ ] इतर राजांचे करार उपलब्ध होईपावेतों केवळ कोटेकरांचे करारानें काम भागणार नाहीं असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. होळकरांविषयीं साधनें अनुकूल नसलीं तरी शिंद्यासंबंधीं बरींच सिक्केमोहरीं पत्रें प्रत्यक्ष पाहिलीं आहेत. त्यांवरून वरील शंकेचें निरसन करतां येतें. 'अवाली व मवाली पनाह आलीखानदान राव जयाजी [ जनकोजी व दत्ताजी ] सिंदिया' असें नवाब गाजीउद्दीन खान बहादुर व आसफजहां निजामुलमुल्क यांनीं अनेक पत्रीं स्पष्ट संबोधिलें आहे. [ ३ जून १७५२ व १७५८ ] या बाह्य प्रमाणानें कदाचित् [चिकित्सात्मक] जिज्ञासा तृप्त न झाली व स्वराज्य सत्तेचें सूत्रधार श्रीमंत पेशवे यांचेच प्रत्यंतर हवें असेल तर [ तें पदरचे न देतां ] नुकतेच प्रसिद्ध झालेले पुरंदरे दप्तर पाहाण्यास सुचवीत आहे. [भाग १ लेखांक ३९६] यांत प्रत्यक्ष बाळाजी पेशव्यांचें प्रमाण मिळतें. अर्थात् कोटेकर, नवाब गाजीउद्दीनखां, आसफजहां व पेशवे या भिन्नभिन्न व्यक्तींच्या मुखांतून निघणारें हें अर्थप्रचुर पालुपद स्वयंसिद्ध आहे. राव हा शब्द शुद्ध राजाच्या समानार्थी आहे. अर्थात् निवाडापत्रासारख्या कायद्याच्या कागदपत्रांत जनतेकडून संबोधण्यांत आलेलीं 'श्रीमंत' 'सरकार' 'महाराज' व 'दरबार' इत्यादि गौरवयुक्त विशेषणें, [ भाग १ लेखांक १०७ ] शिंदे स्वतःस 'सरकार' असें लेखीत असल्याचे पुरावे, [ भाग १ लेखांक ५, ६, २९, ३२, ३८, १६४, १८२ ] व मोगल बादशहाकडून या संबंधात पुढील तिसऱ्या भागांत पडणारा प्रकाश [ चिंतोकृष्ण १ जून १७५२ ] इत्यादि ठळक गोष्टी लक्षांत घेतां शिंदे हे 'रावराजा' हूनही 'अधिक' होते असें इतिहासभक्तांच्या सहज प्रत्ययास येईल.

२१२००० फागन सुदी १५ २१३००० असाड सुदी १५

इ माफक करार ठहरो सु निंसा करनी. मुलक की कोली लिख दीनी

मुलक म फौजे फौजफाटो नकले नही. फौज का उजाड होई नही. मुलक आबादान करावा. उपरला लीखा माफक रुपया की नीसा करासी. असाढ सुदी ९ सा १८०९ मुा [ जयाजी ] आपा साहीब का लसकर.

---

लेखांक [ ५२ ] श्री * संवत् १८०९ आषाढ शुद्ध १२

[ १२ जुलै १७५२ ]

नकल कौल[४०] 'सरकार' राजश्री मलारराव होळकर व राजश्री जयाजीराव सिंदे ताा तालुका महाराव श्री दुर्जनसालजी. आंगे सरकार का रुपया पाछली बाकी वा समत १८०८ वा समत १८०९ की साल की खंडणी का रुपया राजपर नीकसा जी मध्ये रामकीसन पंचोली व तुलसीराम व खंडेराव [?] हुजूर आये. सरकार का रुपीया नीकसा जी मध्ये तुर्त देणा ठहऱ्या. जी की बीदी.

---

(४०) शिंदे होळकर स्वतंत्र 'तहरह' करीत असत असें मल्हारजी होळकर स्पष्ट सांगतात. [ लेखांक ३७ ] 'श्रीछत्रसालजी वा श्रीपटेल [ दत्ताजी ] साहेब के वचन कथन करारदाद छो' असें ४ जुलै १७६५ च्या करारावरून कळतें [ लेखांक १० टीप ११ ] किंबहुना असले 'करार मदार' शिंदे होळकरांनीं केल्याची साक्ष भाऊसाहेबच देतात. [ लेखांक ११ ] आणि त्यांपैकीं तीन 'करार' प्रत्यक्ष पाहावयास मिळतात. अर्थात् हा वाद प्रस्थापित करण्याचें प्रयोजन राहात नाहीं. वरील करार असल नसून नकला आहेत हें खरें. शिंदे [होळकरांनीं] आपले 'स्वतंत्र' किंवा 'मुतालकी सिक्केमोर्तब' वापरलें आहे हें जरी स्पष्ट सांगतां येत नसलें तरी ही बाब वगळण्याची सवड ठेवूनही असें मानल्यासिवाय गत्यंतर नाहीं कीं, मोगलाशीं झालेल्या 'अहदनाम्याची' व बुंदेल्याशीं झालेल्या 'कौलनाम्याची' भाषा व या कराराची शब्दयोजना अगदीं भिन्न असून परस्परांत बरेंच अंतर आहे. [ राजवाडे खंड १ लेखांक १ रोजनिशी ३ भाग १ ] 'अहदनाम्याचे व कौलनाम्याचे' नकलेंत पेशव्यांचें नांव स्पष्ट आहे तें यांत मुळींच नाहीं. मुतालकी सिक्कामोर्तब कदाचित् वापरलें असेल तर पेशव्यांचा संबंध येऊं शकेल. एरवीं तसा संदर्भ जुळवितां येत नाहीं. कारण ज्या करारांत शिंदेहोळकरांनीं स्वतःचें सिक्के वापरले नाहींत तेथें 'सिक्का श्रीमंत पंत प्रधान स्वामीचा, अथवा 'सिक्का मुतालकी' असा नकलांत स्पष्ट निर्देश केला आहे. तसा संकेत वरील नकलेंत नाहीं. अर्थात् असल करारांत तो नसलाच पाहिजे. संग्रहांतील नकलांत अक्षर कोठें बदललें आहे, सिक्का कोठें लागलेला आहे व तो सिक्का खारी अथवा अन्य आहे असला सूक्ष्म भेद दाखविण्याची जेथें काळजी घेतली आहे त्यासंबंधीं संकोच का वाटावा ? [भाग १ लेखांक १९१, २४३, २५७, २५९, २८०, २८१] अस्तु. ही तात्विक दृष्टि पुढें मागें खरी वा अन्यथा 'निघो तहरह पेशव्याच्या नांवानें, संमतीनें, आज्ञेवरून करावा लागे' असा सर्वसाधारण सिद्धांत जो राजवाडे ठरवूं पाहातात तो मात्र त्यांनीं दिलेल्या अहदनाम्याच्या एका नकलेवरून सिद्ध होऊं शकत नाहीं असें ओघानेंच म्हणावें लागतें. [ ऐप्र खंड १ पान ५०. ]

| संमत १८०९ के साल मध्ये. | | संबत १८१० के साल. | |
|---|---|---|---|
| २०५८९७ | पंचोली अखेरामजीने वायदा कीया जी मध्ये बाकी रही सो भादवा सुद १५ कु देणा. | २१२००० | फागुन सुध १५ पुर्णिमा दो लाख बारा हजार. |
| २००००० | फालगुन सुद १५ दो लाख. | २१३००० | आसाढ सुध १५ दो लाख तेरा हजार. |
| २००००० | आसाढ सुध १५ दो लाख. | | |
| ६०५८९७ | साहा लाख पांच हजार आठ से सत्यानव देना. | ४२५००० | चार लाख पचीस हजार. |

इ माफक करार कर वायदा ठह्या. सो वायदा माफक रुपया झाडा कर देना. सरकार का कौल छे. कोई बात की तसदी मुल्क को लागे नहीं. करार रुपया देना ठह्या जी मे तफावत करना नही. म्हाके तरफ सु राज ने रुपया दीया पाछे तफावत नही. बे बसवास मुलुक की आबादानी करना. म्हाका कौल छे. मीती आषाढ सुध १२ समत १८०९.

---

लेखांक [ ५३ ] श्री * संवत् १८११ फाल्गुन वद्य ४

[ २ मार्च १७५५ ]

श्री म्हाळसा कांत चरणी त त्पर खंडोजी सुत मल्हारजी हो ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुहूरसन खमस खमसेन मयां अलफ. नेता प्रो वस्ती का पाटण याने हुजूर येउन विदित केलें कीं फुलेबस जिलखोर यानी माझे बायकोवर तुफान घेतले कीं डाखीणपना[४१] करतीस याजकरिता बाहेर [चिन्ह] काढून दिधलें. त्यावरून हें पत्र लिहिले आहे. तरी यांचा करीना

---

( ४१ ) तत्कालीन समाजस्थिति व लोकांच्या भोळ्या समजुती अवगत होण्यासाठीं हें पत्र उपयोगी आहे. 'डाकिण' म्हणजे चेटुक करणारी स्त्री किंवा लाव. हा आरोप केवळ स्त्रीयांपुरतांच आढळतो. असल्या स्त्रीयांस जात गोताची मर्यादा लागत नसली तरी त्या बहुधा कनिष्ट जातीमधूनच जास्त दिसून येतात.

मनास आणून वाजबी धर्मतान्याये खरेखुरें असेल त्याप्रमाणे विल्हेस लावणे. जाणिजे छ * १८ जमादिलावल. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्त
बसुद

पो छ १ जाखर मि. चैत्र सुा ३
[ १५ मार्च १७५५ ]

---

लेखांक [ ५४ ] श्री * संवत् १८१३ जेष्ठ वद्य २
[ १४ जून १७५६ ]

श्रीम्हांळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा सबां खमसेन मयां अलफु. पत्र पाठविले [तें] पावोंन लेखनार्थ कळो आला. देवीदान गुंडलेकर याजविसी लिहिलें, त्यांवरून राजश्री चिमणाजी गोविंद यासी लिहिलें आहे. त्यास जें कामकाज करणें तें तुम्हीं व ते यैसे येकाविचारें राहून करीत जाणें. कोण्हेंविषई द्वैत[४२] न दाखवणे. पूर्वीपासून जैसें चालत आले आहे त्याप्रमाणेच वर्तनूक करीत जाणें. ।' रा छ * १५ रमजान. बहुत काय लिहिणे.

मोर्त
बसुद

---

लेखांक [ ५५ ] श्री * संवत् १८१३ जेष्ठ वद्य २
[ १४ जून १७५६ ]

श्रीम्हांळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री चिमणाजी गोविंद
कमाविसदार पाा पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा सबां खमसेन मंया अलफु. राजश्री जनकोजी सिंदे याजकडून रा बाळाजी यशवंत

---

( ४२ ) कुंभेरीच्या वेढ्याच्या प्रसंगी शिंदेहोळकरांची 'चित्तशुद्धता गेली' असें भाऊबखरकार जें सांगतो त्याविषयीं विवेचन करावयाचें होतें [पान ६, ४५] पण याच कुंभेरी प्रकरणाबद्दल कांहीं महत्वाचीं पत्रें पुढील तिसऱ्या भागांत येणार असल्यानें तूर्त विवरण करीत नाहीं.

पा मजकूरी आहेत. त्यास पूर्ववत मामलत चालत आली आहे तेणे प्रमाणे तुम्ही व ते येका विचारें राहून मामलत करीत जावी. लटका हर्षामर्ष वस[वाढ] वावा यात जीव नाही. काडीमात्र द्वैत न दाखवणे. पूर्ववतप्रमाणे येका विचारें रहाणे. देवीदान मौजे गुडलेकर याजकडे समाईक बाकी येणे आहे. त्यास तो पळोन गेला. ते समई उभयेता कमाविसदारानी त्याचे घरास कडी दिधली म्हणून हजूर विदित जाले. त्यावरून हली लिहिले असे. तरी उभयेता कमाविसदारां नी त्याचे घरास कडी दिधली, त्या प्रमाणेच तुम्ही व बाळाजी यशवंत येके विचारे राहून त्याजकडील निर्गम करावयाचा तो करणे. प्रा मजकूरची आबादी येके विचारे राहून करीत जाणे. येविसी फिरोन ल्याहावे येसे न करणे. जाणिजे छ * १५ रमजान. बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ५६ ]　　　श्री　　　* संवत् १८१३ आषाढ वद्य २

[ १२ जुलै १७५६ ]

श्रीम्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री आबाजी रघुनाथ
कमाविसदार पा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा सबा खमसेन मया अलफ. पा मजकूरचा हिसा मामलतीचा रा यशवंतराव पवार याजकडील त्याची कमाविस राजश्री धनसेठ करजे याजकडे आहे. तेथे रा यशवंतराव पवार याज कडील वरातदार येतील त्यास कांही तुम्ही देत न जाणे. सेठ मारनिलेकडील कमाविसदार रा मलार सिवदेव तेथे आहेत त्याचे पदरी हिशाचा यैवज येई प्रा घालीत जाणे. सेटजीचे कर्ज पवार मारनिलेकडे आहे ते फिटे तोपर्यन्त वरातदारास अगर हर कोणास पैसा न देणे. कमाविसदार मार यास हिसियाचा यैवज देत जाणे. जाणिजे छ * १४ सवाल. बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ५७ ] श्री * संवत् १८१५ श्रावण वद्य १२

[ ३० अगस्ट १७५८ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री आबाजी रघुनाथ
कमावीसदार प्रा कोटे गोसांवी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा तिसा खमसेन मया अलफ. अखारामाची पत्रे येतात की यैबजाचा निकाल करारा प्रा करून देतो [पण] यैवज अद्याप 'सरकारात' पावत नाही. तर निकड करून यैबज घेणे. 'राजश्री जनकोजी सिंदे याच्या आमच्या भेटी जाल्या. परस्परे सारश्य होउन कोणेविसी संशये[४३] राहिला नाही. त्यास तुम्ही व राजश्री बाळाजी यशवंत पूर्ववत प्रा येकचित्त राहोन सरकारचे कामकाज करीत जाणे आणि येकंदर हिसेब तीन साला त्यांजकडे यैबज काये, तुम्हाकडे काये, फाजील यैवज कोणाकडे निघतो [तें] सविस्तरे लिहिणे. साराश उभयेता [ एकविचारें ] राहून न्ये हुजूर नालिस येउ न देणे. त्याचा आपला समाइक कारभार चालत आल्या प्रा चालवणे.' जाणिजे छ * २५ जिल्हेज. बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

( ४३ ) 'शिंदे होळकर यांची चित्तशुद्धता नव्हती. हर यत्नें शिंद्याचे चित्तांतील किलाफ काढण्यासाठीं होळकरांनीं गंगोबा तात्या [चंद्रचूडास] पाठविले. परंतु शिंद्यांनीं तोड केली कीं, वडील दत्ताजी शिंदे प्रसंगीं नाहींत. त्यांचे पश्चात् भेटावयास पुरवत नाहीं, तेव्हां अधिक उणें ध्यानांत न आणितां लष्करानजीक मुकाम केला. मान महत्व न पाहता होळकर डेरियास चालले तेव्हां जनकोजी शिंदे अडवे जाऊन भेटले. नंतर आठ पंधरा दिवस राहून चित्तांतील किलाफ तोडिला' असें जें वर्णन भाऊ बखरकार देतो तें खरें ठरू पाहतें. [४५, ४६] होळकर यांची भेट होणार असें जनकोजींस १० अगष्ट १७५८ ला माहित होतें. [भाग १ लेखांक १९०] त्याप्रमाणें 'परस्परे सारश्य होऊन संशय राहिला नाहीं' असें मल्हारजी होळकरच सांगतात. अर्थात् २० दिवसांपूर्वी भेटीची वार्ता लागली त्यास कारण असलें पाहिजें व तें बखरकाराप्रमाणें चंद्रचूडाची शिष्टाई झटली तर वावगें नाहीं. दोघांमधील २४ कोसाचें अंतर व २० दिवसांचा अवधी यांची सांगड घातली असतां भेटीसंबंधीं खल चालू असून भेटीस शिंदे तत्पर नव्हते म्हणून त्यांनीं चंद्रचूडास 'वाटे लाविले' असेल तर त्यांत नवल नाहीं. किंबहुना 'सुभेदार भेटावयास येतात अव्हेर न करावा' असें सांगूनच चंद्रचुडानें निरोप घेतला असावा व त्याचे संकेतानुसार 'लष्करानजीक दोन कोसांवर येऊन डेरियास चालले तेव्हां शिंदे आडवे जाऊन भेटले' असले पाहिजेत. इतकेंच नव्हे तर बखरकाराप्रमाणें आठ पंधरा दिवस राहून परस्पर संशयनिवृत्ति झाली असावी असें म्हटलें तर बाध येणार नाहीं.

लेखांक [ ५८ ] श्री * संवत् १८१५ आश्विन शुद्ध ११

[ १३ अक्टुबर १७५८ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री चिमणाजी गोविंद

कादार पा पाटण गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा तिसा खमसेन मया अलफ. राजश्री गोपाळ त्र्यंबक याची आसामी प्राा कोटे येथे सरकारातून होती [ ती ] दूर करून सन खमस खमसेनचे साली पाा पाटण यैवजी करार करून सनद सादर केली आहे. त्याप्रमाणे दर साल वेतन रुपये ४०० च्यारसे पावते करावे. तेथे दिकत करिता, सालचे साली यैवज पावत नाही म्हणून कळले. यैसि यासी सरकारातून सनद आसता दिकत करावयासि प्रयोजन काय ! हे गोष्टी उतम नाही. हाली हे पत्र सादर केले आसे. तर सनदेच्या पैवस्तीपासोन माारनिलेस आसामीपैकी यैवज पावला आसल तो वजा करून बाकी यैवज देणे. पुढे दर साल पेशजीचे सनदे प्राा यैवज पावता करून कबज घेत जाणे. जाणिजे छ * १० ।' सफर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार

---

लेखांक [ ५९ ] श्री * संवत् १८१५ आश्विन वद्य ४

[ २० अक्टुबर १७५८ ]

श्रीम्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री चिमणाजी गोविंद

कादार पा पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा तिसा खमसेन मया अलफ. देवीदान पाटील मोजे गुडले पाा मजकूर येथील मजकूर हुजूर होउन पाटील माारास कोल दिल्हा आहे. त्यास त्याचा मजकूर तुम्ही व राजश्री बाळाजी येशवंत येक विचारे करून त्याची स्थापना करावयाची तैसी करणे व पाा मजकूरी लेणि [?] याचा करिता तो सांप्रत न करणे. तूर्त चालत आल्या प्राा चालो देणे. पुढे

राजश्री जनकोजी शिंदे यासी भेटी[४४] जालियावर ते गोष्टीचा फरशा होईल. केवल आपल्या मते देवीदान पाटील याचा मजकूर न करणे. उभयेता मिळून स्थापना करणे. याजला आम्हीही सांगणे ते सांगितले आहे. सारांश उभयेतानाही त्याची स्थापना करावी. जाणिजे छ * १७ सफर. ी हे विनंती.




---

लेखांक [ ६० ] श्री * संवत् १८१५ आश्विन वद्य ९

[ २५ अक्टुबर १७५८ ]

नकल असल सनद बरहुक्म

राजश्री बाळाजी यशवंत व आबाजी रघुनाथ

कमाविसदार प्रा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित मल्हारजी होळकर दंडवत. सुा तिसा खमसेन मया अलफ. आबाजी रघुनाथ याजकडील पालखीची[४५] नेमणूक रुपये सासे पेसजी चालत आले. हली पंत मशारनिलेने रदबदल केली त्यामुळे जाजती रुपये ३०० तीनसे येकुन रुपये नवसे समाइक चालवणे. जाणिजे छ * २२ सफर. बहुत काये लिहिणे.

पैाा छ ४ माहे रबिलौवल

कार्तिक सुध ६ संवत १८१५.

[ ६ नवंबर १७५८ ]

---

( ४४ ) 'परस्परे सारस्य होऊन कोणेविशी संशय राहिला नाहीं' असें जर होतें तर मग शिंद्यांच्या भेटीची अवश्यकता आता कोणती होती ? बरोबर सूत्र लागत नाहीं. बखरकाराच्या वर्णनाप्रमाणें 'संशय' किंतु सर्वस्वी गेला नसावा कीं काय ?

( ४५ ) आबाजी रघुनाथ निगडीकर यास पालखी तर यापूर्वीच मिळाली होती. पण यावेळीं जी वाढ झाली तिचा संबंध शिंदेहोळकरांच्या सारस्याशीं तर नसेल ? द्वैत मिटविण्याबद्दल आबाजीचा कल असावा असें वाटतें. कारण चिमणाजी गोविंद यांचे गुमास्ते गोविंद सखाजी व रामाजी जगन्नाथ यांचे विरुद्धच केवळ कांगाळीं ऐकूं येते [ भाग १ लेखांक १२५ तें १२७, १२९, १३१ १३२ व १३५ ]

लेखांक [ ६१ ] श्री * संवत् १८१५ फाल्गुन शुद्ध ११

[ ९ मार्च १७५९ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर खंडोजी सुत
मल्हारजी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन अर्थ विदित जाला. जेपूरचा सल्लख जाला किवा काये [ तो ] वृतांत [ तसेंच ] कोणे स्थली मुकाम [ आहे ] हे सविस्तरे लिहिले पाहिजे म्हणून लिा. येशास दीड मास जाला आपल्याकडून होउन दिल्हे नाही. राजश्री राय केशोराम येक दोन वेळा गेले की निश्चये कार्यभाग करून येतो. तेही आले. परंतु [ भाषणांत ] जीव नाही. मातबर ठाणी ते खाली करून देत नाही. निखालसता नाही. राजश्री केशोराये गेले ते जेपुरी राहून जेगोपाल मुंशीस पाठविले परंतु [ तोही ] खरा कारभार नाही. प्रस्तुत कस्बे फागीस मुकाम आहे. येथून जेपुर तेरा कोस आहे. सल्लखे करोन अथवा बिघाडे करून कार्ये करून घेतले जाईल. चिंता नाही. ।' खावंदाच्या पुण्ये ꣼ करून श्री। येश देईल. चिता नाही. छ * ९ रजब. हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ६२ ] श्री * संवत् १८१६ कार्तिक शुद्ध ११

[ १ नवंबर १७५९ ]

श्री म्हाळसा
कांत चरणि त
त्पर खंडोजी सुत
मल्हार जी हो
ळकर

राजश्री बाळाजी यशवंत गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो मलारजी होळकर दंडवत. सुहूर सन सितेन मया अलफ. पत्र पाठविले ते पावले. सिरीरी आरोग्य नाही. प्रस्तुत काही आरोग्य आहे. त्यास दो चौ दिवसात थोडिशी शेत्क आलिया शेवेसी येईन म्हणून

लिहीले. यैसियासी आम्ही त्याच प्रांतास[४६] येत असो. ले भेट होईल ।' जाणिजे. छ *
१० रबिलावल. बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [ ६३ ]    श्री    * संवत् १८१६ फाल्गुन वद्य १२

[ १४ मार्च १७६० ]

नकल

राजश्री वर्तमान भावी कादार
पा पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर व जनकोजी सिंदे दंडवत. सुा सितेन मया व अलफ. वो राजश्री झीतूराम पुरोहित यानी बकाणाचे[४७] मुकामी येउन विदित केले की राव छेत्रसाल यानी आपले वकील पुरोहित केदारजी यासी जमीन काा मजकूरी बीघे सुमार ५१ येकावन दिल्हे. त्याप्रमाणे चालत आली आलीकड सरकारचा आमल जाल्यापासोन बंद आहे. [ती] आपण चालवावी म्हणजे त्याज वर कालक्षेप करून. त्याजवरून हे ब्राम्हण थोर विद्यापात्र याचे चालविले श्रेयस्कर

---

( ४६ ) १७५९ या सालाचा स्वयम् शिंदे, रामाजी अनंत दाभोलकर किंवा चिंतो कृष्ण यां पैकीं कोणाचाही पत्रव्यवहार ' संग्रहांत ' उपलब्ध होत नसून त्याचें कारणही कळत नाहीं. अर्थात् अबदालीशीं सामना करण्याविषयीं होळकरांशीं पूर्वसंकेत ठरला होता किंवा नाहीं हें सांगणें कठिण आहे. 'अबदाली भारी फौजेनिसी लाहोरास येउन जहानखान वगैरे सर[हिं]देवर आले. दंगा व्हावयासी जाले' या खबरा गोविंदपंत बुंदेल्याप्रमाणें अक्टुबर अखेर मल्हारजी होळकरांसही लागल्या आसाव्यात असें ग्रहीत धरलें तर हें पत्र मात्र महत्वाचें ठरतें आणि अबदाली विरुद्ध शिंद्यांला मदत करण्याचा विचार या मितीपर्यंत तरी होळकरांचा झाला नव्हता असें स्पष्ट कळतें. किंबहुना [ जयपूरचें कार्य करून ] 'मल्हारबा पंधरा दिवसांत येतील' ही बातमी होळकरांकडून कळली असेल तर होळकरांनीं स्वसंकेत बदलला असें स्पष्ट होतें. [राजवाडे खंड १ लेखांक १३९, १४१, १४३].

( ४७ ) हें पत्र मुळींच महत्वाचें नाहीं पण त्यांतील स्थलनिर्देश मात्र महत्वाचा आहे. बडाउचे घाटी दत्ताजी शिंदे यांचा पराभव झाल्यानंतर जनकोजी शिंदे हे कोट पुतळीस आले तेथें होळकरांची भेट झाली व त्यानंतर ते दोघे एकत्र राहिले असें दाखविणारें हें एक पत्र होय [ भाग १ लेखांक २२० ] या पत्रांत 'बयाणा' अथवा 'बकाणा' हें स्पष्ट समजत नाहीं तरी बयाणाच असणें जास्त संभवतें.

जाणून सदरहूप्रमाणे का मजकूरी जमीन बीघे येकावन करार करून दिल्हे आसेत. तर लिहिल्याप्रमाण येकावन बीघे पुरोहित जीतूराम याजकड आपल्या आमलापूर्वी चालत आल्याप्रमाणे चालवणे. प्रती वर्षी नवीन पत्राचा अक्षेप न करणे. या पत्राची नकल घेउन आसल पत्र र्‍होतीस भोगवटियासी परतोन देणे. जाणिजे छ * २५ रजब. बहुत काय लिहिणे.

---

लेखांक [ ६४ ] श्री * संवत् १८१८ चैत्र वद्य २

[ २१ अप्रेल १७६१ ]



[४८]

राजश्री लालाजी बलाल [ गुल्गुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा इहिदे सितेन मया अलफ. तुम्ही पत्र चैत्र शुद्ध † त्रयोदशीचे पाा ते वद्य १ पावोन ‡ लेखनार्थ अवगत जाला. 'राजसिंग घोडचढा जेथलीहून सेरपुरास गेला. सुरतराम सुभराम पोता दोन तीनशा स्वारानशी [मुकंद] दरा उतरोन रामपुऱ्याचे सुमारे गेला' म्हणोन विस्तार पूर्वक लिा. येसियास 'ग्वाल्हेर, झासी प्रांतीचा बंदोबस्त करून रामपुऱ्या[४९]कडे जावे, यास्तव पोहरी[५०] पुढे सात आठ कोसावर येउन मुकाम केला. तो वर्तमान आले की राजश्री जनकोजी सिंदे बिजेपुरास[५१] आले. ते दो मजलीने लष्करात येणार, याज करिता दोन मुकाम पारथली [?] करून राजश्री जनकोबाची भेट जाली म्हणजे दरमजल रामपुऱ्याचे सुमारे येतो. हारामखोराचे उत्तम प्रकारे पारपत्य होउन येईल. आणखी ही ज्यानी जैसी नेकी केली ते आचरणानुरुप फल पावतील. चिंता नाही.' वरचेवर पत्र

---

† १७ अप्रेल १७६१. ‡ २० अप्रेल १७६१.

(४८) पानिपतच्या धांदलींत मल्हारजीचें सिक्कामोर्तब गेलें असावें कारण या पत्रानंतर नवीन सिक्कामोर्तब सर्वत्र वापरलें आहे. [लेखांक ६५ तें ७३]

(४९) हा बहुधा रामपुरा [ भानपुरा ] असावा असें वाटतें. वांटणीपासून हे दोनी महाल होळकरशाहींत आहेत.

(५०) भाग १ लेखांक २२३ टीप २२७ पहा पोहरी हें स्थान शिवपुरीचे पश्चिमेस दहा कोसांवर असून हल्लीं तें मालोजी नरसिंगराव शितोळे देशमुख पुणेंकर यांचे जाहागीरीचें मुख्य स्थान आहे.

(५१) बिजेपुर हा मोठा कसबा असून तो कुंवारी नदीचे दक्षिण किनाऱ्यावर आहे. हा किल्ला पोहरीचे उत्तरेस वीस कोसांवर आहे. हल्लीं हें गांव तेहसीलचें मुख्य ठिकाण आहे.

पाठउन वर्तमान [मात्र] लिहित जाणे. जाणिजे छ * १५ रमजान. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पैवस्ता छ २१ माहे मजकूर.
[ २७ अप्रेल १७६१ ]

---

लेखांक [ ६५ ]

श्री * संवत् १८१८ भाद्रपद शुद्ध ७
[ ५ सितंबर १७६१ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर खं
डोजी सुत मल्हा
रजी होळकर

राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा इसने सितेन मया आलफ. तुम्ही पत्र पा ते पावोन लेखनार्थ अवगत जाला. माधोसिंगा कडील मार वगैरे बातमी विस्तारे करून लिा ते सर्व कळले. यैसियासी तुमच्या लिा वरून अखेरामजीस ताकीदपत्र पाठविले, ते त्यास प्रा करून कराराप्रमाणे यैवज वसूलात ये ते गोष्ट करणे. नेणत्रीयासी खर्चास वराते पा यैवज वसूल करून पावता करणे. यैवजाची सुस्ती येकंदर न करणे. येथेही फौजेचे समजाविसीची ‸ गुंता उरकला. पुढील योजना आरंभिली. देसीहून[५२] नव्या फौजा आणविल्या त्या विजाया

---

( ५२ ) It was in 1761 that the prince of Amber *assembled all his clans* to force the Haras to acknowledge themselves tributaries. The invasion of the Abdalli, which humbled the Mahrattas and put a stop to their pretensions to universal sovereignty, left the Rajputs to themselves. *Madho Singh*, in his march to Harouti, *assaulted Ooniara* and thence he *proceeded to Lakhari* which he took *driving out the* crestfallen *Southrons*. Emboldened *he crossed* the *Chumbal* at *Pally Ghat*. The *chieftain of Sultanpur* was *taken by surprise*. *The victors*, [ flushed with this fresh success, ] proceeded through the heart of Kotah until they *reached Butwarro, where five thousand Haras were drawn up to oppose them. The numerical odds were fearful against Kotah*. Mulhar Rao *Holkar was encamped in the vicinity but so crestfallen* since the fatal day of Panipat *that he feared to side with either*. Young *Zalim galloped to* the *Mahratta* and *implored him*, if he would not fight, *to* move round and *plunder* the *Jeipoor camp: a hint which needed no repetition*. [ Tod Rajas vol. ii p. 416—17 ]

दशमीपर्यंत येउन पोहचतील. तदनंतर कर्तव्यार्थ केला जाईल. तिकडील वर्तमान सर्वदा

---

अबदालीच्या स्वारीमुळें मराठ्यांचा विमोड होऊन भारतीय साम्राज्याविषयीं त्यांचा हेवा विरमळून राजपूत मोकळे झाले. त्यासरशीं सन १७६१ चे सालीं हाडोती हाताखालीं घालण्यासाठीं माधवसिंगानें उणियारा उजाड करून लाखेरींतून दाक्षिणात्यांस हाकलून दिलें. पाली घाटावर चंमल नदी पार करून सुलतानपुरच्या हाड्यांस ठार करून तो कोटा राज्यामधून बटवाऱ्या समीप आला. या ठिकाणीं कोटे-कराशीं युद्ध होऊन जालिमसिंगानें जयपुरकराचा पराभव केला. या संधीस मल्हारजी होळकर शेजारी होता पण पानिपतच्या पराजयामुळें तो इतका गांगरलेला होता कीं कोणत्याही पक्षास सहाय्य करण्याचें धैर्य त्यास झालें नाहीं. जालिमसिंगानें येऊन लुटीची लालसा दाखविली त्यास मात्र तो भाळला ' असें जें वर्णन टॉड देतो त्याविषयीं थोडें विवेचन करणें अगत्याचें आहे. लढाईचा मितिमास दिला असतां तर बरें झालें असतें. कारण त्या संधीस होळकर सन्निध होते व जालमसिंगास भरधाव जाऊन लुटीची कल्पना सुचविण्याची सवड निदान संभाव्यता होती किंवा नव्हती याचा निर्णय तरी लागला असता. अस्तु. उणियारा, लाखेरी, पाली व सुलतानपुर या मार्गानें माधवसिंग बटवाऱ्यास आला आणि तेथें लढाई झाली असें दर्शवून त्यांत होळकरांची दुर्बलता दाखविण्याचा झोक आहे. इतकेंच नव्हे तर शत्रुमित्र या नात्यानें होळकरांच्या लेखीं हाडा व कछवाह हीं दोनी सारखींच होतीं असेंही तो सुचवीत आहे.

पानिपताहून ' मल्हारजी होळकर दाहा हजार फौजेनसी चमेल उतरून ग्वाल्हेरीस ' **१३ फरवरीला** आले. [ पुरंदरे १ लेखांक ३९७ ] परत येणाऱ्या सैन्याची पोटगी व वस्त्रप्रावरणादि साहित्याची सोय लावून पेशवे ' येईपावेतो ग्वाल्हेर झासी इतक्या [ टप्या ] तच राहणें ' त्यांस भाग होतें. [ गंगाधर यशवंत चंद्रचूड २३ फरवरी १७६१ ] तसेंच ' ग्वाल्हेर किलियास गोहद [ ही ] फटकळ जागा ' जाणून तेथील ' जमीदार याची गोहद घेणे, झांसीस सैन्य पाठविणें व [ कुंभेरीकर ] जाटाशीं स्नेह करून [ त्याच्या मध्यस्थीनें ] गाजिउद्दीनखां व खुद अबदाली यांच्याशीं तहरह करून ' तात्पुरता वेळ मारून नेण्याची जवाबदारी व ' येखत्यारी ' होळकरांवर असल्यामुळें त्यांस केवळ कोटेकर किंवा जयपुरकर यांचा समाचार घेण्याचेंच काम नव्हतें. [ पुरंदरे १ लेखांक ३९९, ४०२, ४०५, ४०८, ४११,४१५,४१६,४१८,४१९. इतिसंग्रह ऐचर्चा लेखांक १ ] वरील सर्व गोष्टीस अनुकूल असें धोरण स्वीकारून होळकरांनीं आपला मार्ग व मुक्काम ठरविला असला पाहिजे यांत शंका नाहीं. त्याप्रमाणें ते ' **२१ अप्रेलला पोहरी** नजीक येउन [ तदनंतर छबड्यावरून ] **१५ मेला गागुरणीस** ' आले. [इतिसंग्रह ऐचर्चा लेखांक १,३] यांपैकीं पोहरी कोटाराज्याशेजारी मुळींच येत नाहीं. बाकीचे दोन मुकाम कोट्यासमीप होते असें म्हटलें तर चालेल आणि हा काळ **२३ अप्रेल** पासून **१५ मे** पर्यंतचा येतो. या संधीस बटवाऱ्याची लढाई झाली असेल तर होळकर निकट होते असें कदाचित् म्हणतां येईल पण ते घोड्याच्या टप्या इतकें जवळ होते असें कदापि सांगतां येणार नाहीं. कारण बटवाऱ्यापासून **पोहरी ३० [ छबडा २७ व ] गागुरणी ४० कोस** लांब पडते. अर्थात लढाई सोडून भरधांव येऊन जालिमसिंगास लुटीची लालुच दाखविण्याची सवड शक्य नव्हती. ती टॉडचीच कपोलकल्पना ठरते. ' करोड रुपये घेउन माधवसिंगास स्वार पाठउन अबदालीनें बोलाविले ' त्यामुळें तो ' घाबरा होउन बूंदीस यावे. मी सर्व रजपूत मिळउन येतो ' अशीं वरपांगी ' पत्रें ' पेशव्यांस पाठवीत होता. [ पुरंदरे १ लेखांक ४०२ ] ही त्याची थाप असून त्या निमित्तानें त्यानें चाल केली असें धरून चाललें

पत्र पाठउन लिहित जाणे. जाणिजे छ * ५ सफर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैवस्ता छ १३ माहे मजकूर
भा सुध पुर्णिमा
[ १३ सितंबर १७६१ ]

---

तर या 'वर्तनूकेचा प्रकार' होळकरांस २० व पेशव्यांस २८ फरवरीला गुलगुल्यानें कळविला होता. त्यावर 'साबाजी पाटील सिंदे फौजसुधा ग्वाल्हेरीहून मुकुंदबारीचे सुमारें बढोयाहून तिकडे चालले. [ त्रिंबक दत्ताजी १२ अप्रेल १७६१ ] गोपाळराव गोविंद [ बर्वे ] वीस पंचवीस हजार फौजेनसी खेचीचे पारिपत्यास राहिले. हें वर्तमान येकून माधवसिंग आपले जागी दबले. पांच सात हजार आले [ ते ] सहजात जातात. अमल बसतो ' असें कळतें. [ गोपालराव गोविंद बर्वे २३ अप्रेल १७६१ ] आणि त्यानंतर '**कोटेकराशीं सुभेदार साहेबाचें वचन कछुव्याच्या लढाईत सामिल होउन चाकरीची शर्त केली**' असें तुकोजी होळकर सांगतात. [ लेखांक ७४ ] अर्थात् ही जी चाल माधवसिंगानें केली त्याची अटकळ बांधूनच उभयपक्षांची वचनक्रिया झाली होती हें जसें स्पष्ट आहे तसेंच 'कोटेकरांनीं सामिल होउन चाकरीची शर्त केली' हें देखील उघड होतें. [ लेखांक ११, ७४ ] तेव्हां जालिमसिंगास होळकरांकडे भरधांव जाऊन लुटीची सूचना करण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. ही शुद्ध कादंबरी आहे असें म्हणण्याचें दुसरें सबळ कारण असें आहे कीं, होळकराशीं जर जालिमसिंगाची भेट झाली असती तर पोहरीनंतर बटवाऱ्याकडे न वळतां सरळ गागुरणीस जाण्याचें त्यांस कांहींच कारण नव्हतें. [इतिसंग्रह ऐचर्चा लेखांक १,३] पत्राधारें बोलावयाचें तर १५ फरवरीपासून जी 'धुंद माधवसिंगानें मांडली' ती १५ अप्रेलचे सुमारें 'दबली' असा ध्वनी ऐकूं येतो. तेव्हां जालिमसिंगास सूचना करण्याचें किंवा होळकरांस लुटीस जाण्याचें कांहींच कारण नव्हतें आणि त्यावेळीं होळकर समीप होते असें सिद्ध होत नाहीं. वस्तुतः 'छावणीसाठीं इंदुरास' जात असतां मार्गात होळकरांचे केवळ कांहीं तळ कोटाराज्या समीप पडले त्याविषयीं पराचा कावळा केला आहे तो निराधार असून परस्पर सहाय्य करण्यासंबंधीं उभयतांचे ' करार ' झाले होते [ पुरंदरे १ लेखांक ४१८, ४२० ] आणि वचनानुसार ' सामिल होउन चाकरीची शर्त केली ' त्या कामगिरीप्रीत्यर्थ ' अखेरामास गांव व हत्ती मिळाला ' होता. [ लेखांक ७० भाग १ लेखांक २२६ ] साबाजी सिंदे, खानाजी जाधव व सुलतानजी लांबहाते हे तिघे कोटेकरास मदत करीत होते किंबहुना जयपुरकरांस रेटून अगष्टच्या पूर्वी त्यांनीं ' नेणवे ' गांठलें असें स्पष्ट होतें. [ भाग १ लेखांक २६३ तें २६६ ] उभयपक्षांचें सैनिक बलाबल पाहाता टॉडच्या कथनानुसार जर पांच हजार कोटेकरांशीं '**पांच सात हजार** [कछुवे युद्धास] **आले**' असें कळतें तर the numerical odds were *fearful* against Kotah हें कल्पनामय वर्णन वाचकांचे सहज ध्यानीं येईल. तसेंच लाखेरींतून हाकलून दिलेल्या मराठा सैन्याची संख्या टॉडनें जी वगळली आहे ती लक्षांत घेतां दोनी पक्ष समान असून त्यांपैकीं कोटेकरांकडे मराठ्यांचा ओढा होता हें स्पष्ट आहे. ' कोटेकरांनी चाकरीची शर्त केली ' ती ' लढाई ' बटवाऱ्याची असो वा नसो पण त्यांनीं मराठ्यांशीं ' सामिल होउन ' केली येवढें मात्र निश्चित होतें.

लेखांक [ ६६ ]　　　　श्री　　* संवत १८१८ आषाढ वद्य १०

[ १६ जुलै १७६२ ]

सीका　　　　पत्र बमोजिब नकल

माहारावजी श्री छत्रसालजी का मुतसदीया सु सुबादारजी श्री राव मलारजी [होळकर] वा सुबादारजी श्री राव जनकोजी [सिंदे] की तरफ सु करार दाद ठहरो. इ माफक साल दरसाल चल्या जाइज्यो. इमे तफावत करो मती. ती को बोवरो

२००००० संमत १८१७ का साल ताई का बाकी नीकला त्यामे देणा.　　　　३००००० संमत १८१८ का साल की खंडणी का रुपया.

ती की कीस्त

२००००० हाल देणा रुपया
ताा [ तपसील ]
५०००० लसकर मे नकद वा हुंडी
१५०००० नंदगांव सु प्रधरा रोज में पोहचावणा
२०००००

१००००० आसोज सुदी १५ को देणा रुपया
२००००० माहा सुदी १५ को
३००००० येकुन रुपया

संमत १८१८ का साल मे भरणा रुपये　　　　५०००००

संमत १८१९ का साल सु करार. सालदर साल इ माफक दीया जाइजो. बेवरो. [तीको]

२००००० पाछली बाकी मा देणा रूपिया ३००००० सालकी खंडणी मा देणा रूपिया

तपसील.

सालु मा देणा २५००००　　　　उन्हालु मा देणा २५००००

५०००००

पांच लाख रुा

इकरार माफक चाला जाइजो. इ सीवाय कीसी बात की खेचल न होसी. या मे थे अंतर न करोगा तो म्हा बी न करांगा. मीती आसाढ बदी * १० समत १८१८. जाणिजे छ २४ जमादिलाखर.[५३] [।] मोर्तब

(५३) नकलकाराचा हा हस्तदोष दिसतो. कारण या वर्षी आषाढांत जंत्रीनुसार 'जमाखर' नसून जिल्हेज होता आणि त्याच मानानें तारीख ठरविली आहे.

लेखांक [ ६७ ]  श्री  * संवत् १८१८ फाल्गुन वद्य ६
[ १६ मार्च १७६२ ]




सिक्का फाटला आहे.

राजश्री खानाजी जाधव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनआर्थ अवगत जाला. हिंदुस्थान प्रांताचा माधोसिंगाकडील व जाटाकडील व सुजायतदौले वगैरे कितेक मजकूर विस्तारपूर्वक लिहिला तो कळू आला. यैसियास आम्ही श्रीच्या दर्शनाकरिता जेजोरीस दरमजल आलो. श्रीचे दर[श]न जाले. श्रीमंत राजश्री दादासाहेब व श्रीमंत राजश्री माधवराव यांची रवानगी सेनासह कर्नाट[क] प्रांती करून आपण इकडील बंदोबस्ताकरिता माघारे फिरून आले. आज येथे येणार. आपली त्याची भेट होउन जो मनसबा कर्तव्य तो करून थोडकीयाच दिवसात त्या प्रांती येत असो. तुम्ही [मात्र] तिकडील वर्तमान वरचेवर तपसीले लिहून पाठवीत जाणे. राजश्री केदारजी सिंदे व राजश्री महादजी [शिंदे] व राजश्री नारो शंकर फौजसुधा त्या प्रांती आले आहेत. त्यास सर्व हृदभाव लिहून अजमेर वगैरे उपराला बंदोबस्त होईल तेथवर करणे. आमचाही थोड्या दिवसात इकडील कामकाजाचा गुंता उरकोन जलदीने त्या प्रांती येत असो. ज्याने हारामखोरी केली आसेल त्याच्या आचरणानुरूप फल पावतील. रात्र दिवस सावध राहून अखेरामाच्या विचारे तिकडील मनसुबा उपयोगी पडेल तो करणे. पे दरपे वर्तमान लिहित जाणे. रा छ * १९ माहे साबान. बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [ ६८ ]  श्री  * संवत् १८१९ चैत्र शुद्ध ३
[ २८ मार्च १७६२ ]

पुा राजश्री खानाजी जाधव गोसावी यांसि

विनंती उपरी. रावराजे [बूंदीकर] चौथ देउन सलूख करू म्हणतात. त्यास त्याजकडे आमचा जिनस गला वगैरे जागा जागा गेला आहे व हाली नेणव्यात तीन च्यार लक्षाचा जिनस तोफ दारू वगैरे जखीरा याची वाट करून घेणे. नेणव्यात त्याजला दरकार काये आहे ? निदान नेणवे जागा देउन या प्रसंगावर नजर देउन सलुख

करावा. नाही तर लाभ काये ? चौथ घेतल्या दावा गुदरत नाही. यास्तव त्याजवर दबाव आसो द्यावा. मोठा माधवसिंगाचा आश्रा त्यास आहे. मूळच[54] खारिस्त केल्या डाहाळ्या सहजात पडतील. राजश्री नारोपंत पहिले फौजसह आले [ ते ] रवाना केले. श्रीमंत राजश्री दादासाहेब व आम्ही भारी सरजामाने आती सत्वर येतो. सर्व तुमचे मनोदयान रुप होउन येईल. तुम्ही व राजश्री सुलतानबा [ लांबहाते ] येकविचारे कोटेकरास हाती घेउन उचितार्थ तो करणे. सर्वदा पत्र पाठउन संतोषवीत जाणे. जाणिजे छ * १ रमजान. ।' हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ६९ ] श्री * संवत् १८१९ चैत्र शुद्ध ३

[ २८ मार्च १७६२ ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर खंडोजी सुत मल्हारजी होळकर

राजश्री खानाजी जाधव गोसावी यास.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष. आपणाकडोन पत्र येउन वर्तमान कळत नाही. तर यैसे न करणे. सर्वदा तपसीलवार वर्तमान माधोसिंगाकडील व सुजायेतदौलाकडील व दिलीकडील नजीबखानाचे व आजमेरचे वगैरे सविस्तरे लिहान पाठवीत जाणे. आम्हाकडील वर्तमान ' तर प्रस्तुत मुक्काम जेजूरी श्री संनिध आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेब येथे आले होते. त्याची भेटी जाली. येक मुकाम करून पुणियास गेले. आम्हीही पुणियास जाउन कामकाजाचा गुंता उरकोन मातबर सरंजामानसी ॡ थोडकीयाच दिवसात त्या प्रांतात येत असो. राजश्री नारोशंकर सेनासहवर्तमान त्या प्रांती आलेच आहेत. त्यासही पत्र लिहून माधोसिंगाचे पारपत्याचा मनसत्र होईल तेथवर करणे. माधोसिंगाचे पारपत्य जालिया उमेदसिंग वगैरे किरकोळ सहजातच पादाक्रांत होतील. ।' आम्हीही श्रीमंत [ दादासाहेब ] आदि करून भारी सरंजामाने जल्द येतो. ज्यानी जसी लबाडी केली त्याप्रमाणें नतिजा पावतील. चिंता न करणे.' राा छ * १ रमजान. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

( ५४ ) ही मूळ मल्हारजी होळकरांची नीत्युक्ति कीं थोरले बाजीराव पेशवे ह्यांच्या राजनीतीची पुनरुक्ति समजावी ? [ लेखांक ६९

लेखांक [ ७० ] श्री * संवत् १८२० मार्गशीर्ष वद्य ११
[ १९ दिसंबर १७६४ ]




राजश्री लालाजी बलाळ कादार
प्रा पाटण निा सिंदे गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुमा खमस सितेन मया अलफ. ' राय अखेराम कोटेकर यासि पेशजी ढीपरी[५५] प्रगणियाचा गांव समाइक सरकारातून पेशजी दिल्हा होता. तेथे आमल होउन भोगवटा न जाला म्हणून रायेजीनी हुजूर विनंती केली. त्यावरून पेशजी गांव दिल्हा होता त्याचे मुबदला मौजे निमोदा प्रा मजकूर हा गांव समाइक करून दिल्हा आहे. त्यास तुम्ही मोजे मार येथील दरोबस्त आमल मार ꣷ निलेकडे चालवणे. तुम्ही दखलगीर न करणें. जाणिजे छ * २५ जमादिलावल. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [ ७१ ] श्री * संवत् १८२२ वैशाख वद्य ९
[ १२ मे १७६५ ]




राजश्री लालाजी बलाळ
कादार संस्थान कोटे निा सिंदे गो.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुमा खमस सितोन मया अलफ. ' कोटेकराकडून आपला यैवज येणे त्याजविसी समक्ष अखेरामजीस ताकीद केली होती. त्यास अखेराम गेलियावरी त्याची [जी] अवस्था[५६] जाली ती

---

( ५५ ) ढीपरी हें गांव खातोलीचे पश्चिमेस ४ कोसांवर चंबल नदीच्या पूर्व किनाऱ्यावर आहे.

( ५६ ) अखेराम पंचोली हा कोटेकर यांचा कारभारी असून त्यांच्या वतीनें तो १७४८ पासून राजकारणांत मराठ्यांकडे प्रामुख्यानें वावरत होता. त्याची कारकीर्द अनेक दृष्टीनें प्रसंशनीय होती व मराठ्यांपेक्षां ती महारावजीसच ज्यास्त हितावह झाली. मैत्री जोडून भाईचारा करून सलगी वाढविल्यामुळेंच कोट्याची खंडणी कमी झाली आणि राज्य नामशेष होण्याची संधी आली असतां तें गंडांतर टळलें. त्याचें श्रेय ओघानेंच या पंचोलीस द्यावें लागतें. अशा कर्तत्ववान पुरुषाची 'अवस्था' काय व कशामुळें झाली हें सांगवत नाहीं. अपघात झाला असें म्हणावें तर ' अखेराम मृत्य पावले, येविसी काही चिंतात न आणावे' असें एका पत्रीं म्हटलें आहे. [ महादजी शिंदे २७ मार्च १७६५ ] असो पुढें मागें त्याचा उलगडा होईल अशी आशा वाटते.

कळली. यैवजाविसी राजास हुजूरीहून ताकीद अगोधर लिहिली होती आणि हलीही राज्यास पत्र पा आसे. तरी तुम्ही व रा आबाजी रघुनाथ [ निगडीकर ] मिलोन यैवाजाविसी कोटेकर राज्यास निकड करून यैवज वसूलात आणणे. जर करिता इतकियावरी कालहरण केली[या] रुपये व्याजसुधा यैवज घेउ, या प्रा तुम्हीही सांगणें.' ꣹ जाणिजे छ * २२ जिलकाद. ।' बहुत काय लिहिणें.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ७२ ] श्री * संवत् १८२२ श्रावण शुद्ध १३
[ ३० जुलै १७६५ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर खं
डोजी सुत मल्हा
रजी होलकर

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मलारजी होळकर दंडवत. सुा सित सितेन मया व अलफ. ' कोट्याचे मारा करिता दोन तीन पत्रे तुम्हास पाठविली. उत्तर येत नाही. तूर्त सरकारची कासीद जोडी आली. ती पंधरा लक्षात मामलत चुकली. तूर्त साडे सहा घ्यावे. त्याचे वसूलास तुम्ही काही स्वार जमीयेत घेऊन आला आहा. त्यास मामलत केली ते समाइक केली आणि यैवज झाडून आम्ही घेउ म्हणता, आमचे कमाविसदारास दखलगिरी देत नाही. पैसा आमचाही त्याजकडून येणें आहे. त्याचा आमचा हिसेब होईल, तूर्त यैवज न देउ, यैसी नाना प्रकारे तुम्ही भाषणें करिता. वरकडास तो आकाशा संनिध, यैसे मानून बोलतात. अस्तु. परंतु तुम्ही सर्व जाणता. बाळाजी येशवंत याजपासोन वाकिफगारी येसोन यैसी भाषणें योग्य नाहीं. कोटे केवळ पर अमल नव्हे. आमचा खास ' जागीर'[५७] त्या प्रा हिसेरसीद आजपावेतो चालत आले आसता तुम्ही कर्ते' शहाणपणाचा अहंभाव धरून मनमानेसी वर्तनूक करिता. चिंता नाहीं. आमचा पैसा खावंदास अगर सोबत्यासी[५८] कोणास सुटणार नाहीं. या प्रा सर्वानी चालविले आणि आम्हीहीं कोणे प्रकारे आंतर केले नाही. पुढें ही समजून घेउ परंतु तुम्ही खामखा पैसा देणार नाही यैसे विचारे वर्तता, हे गोष्टी [ मात्र ] कामास येणार नाही. येविसी पुरती दूरंदेसी करून उचित ते करणे. हाली कोटेकरासीही पत्रे

---

( ५७ ) भाग १ लेखांक ३८ टीप ६९ पहा.
( ५८ ) शिंदे तथा पवार. लेखांक ३१ टीप २५ पहा.

पाठविली आहेत. त्याजला आपले घर राखणे तर यैवज आमचा आवलेश पावता करतील. तुम्हास पुढे होऊन हिशेबच आमचा करणे तर उतम आहे. लाहोर, जैपुर वगैरे हिसेब तयार आहेत. वाटणी प्रा पैसा निघेल तो द्यावा. आमचा फाजिल यैवज निघेल तो घेउन. यासीही चिंता बाळगीत नाही. ज्याचे ऋणानबंधामुळे गेगुदर होउ[न] परस्परे स्नेहसांरक्षण जाले ते त्याचे त्याज बा गेले. अतःपर तुम्ही अथवा पर कोणास बेजा वर्तनूक करणे ते बहुत विचारून करावी. जाणिजे छ * ११ सफर. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ७३ ]

श्री * संवत् १८२३ चैत्र अधिक वद्य १४

[ ८ अप्रेल १७६६ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर खं
डोजी सुत मल्हा
रजी होलकर

राजश्री लालाजी बालाजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारजी होळकर दंडवत. सुहूर सन सित सितेन मया व आलफ. राजश्री रामराये देवजी का कोटे येथे राहत आहेत. त्याजकडे कांही कझा नसता तुम्ही उदेचंदाचे कर्जाचे निमित्य ठेउन राजश्री अवचि[त]राव गणेश याचा शह पोहचाउन भोपतरायाचे घरी नेउन बलात्कारे रुा १५० दीडसे घेतले. म्हणून पंत मारनिलेने लिहून पाठविले. त्यावरून तुम्हास लिहिले आसे. यैसियासी 'तुम्ही आमचे देशस्थ तेथे असोन रांगडिया लोकात परकियाचे कर्जाचा निमित्ये ठेउन पंत मारनिलेपासोन बेआबे करून रुपये घ्यावयासि प्रयोजन काये? अशा गोष्टी हिंदुस्थानी लोकापासूनही न घडाव्या त्या तुम्ही आचेरता! त्यावरून तुम्हास काये म्हणावे'! तरी अतःपर पत्र पावताच पंत मारनिलेपासोन गैरवाजबी रुपये जबरदस्ती करून घेतले आहेत ते माघारे देवणे. येविसीचा पुन्हा बोभाट न ये ते करावे. पंत मारनिले आपले आहेत. त्याचे हरयेकविसी उचित पदार्थे साहित्य करीत जावे. जाणिजे ।' छ * २७ सवाल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पौा छ × माहे चैत्र सुध ९ संमत १८२२.
सुा सित सितेन. मुकाम कोटे
[ १८ अप्रेल १७६६ ]



# श्रीमंत तुकोजीराव होळकर.

## यांचा असल पत्रव्यवहार.

१८१९ त १८५१ विक्रमी.

लेखांक [ ७४ ] श्री[५९] *संवत् १८१९ चैत्र शुद्ध ८
[ २ अप्रेल १७६२ ]

श्री म्हाळसा
कांत चरनी
तत्पर खंडोजी
सुत मालोजी
होळकर

राजश्री खानाजी जाधवराउ सेनापती गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असावे विशेष. [फार] दिवासानंतर

---

( ५९ ) या पत्रांत तारीख व महिना आहे पण वर्ष दिलें नाहीं. 'महादजी सिंदे देसी चार मास हाडोती भित्यर्थच राहिले' ते १० अप्रेल १७६२ रोजीं 'सावेरीहून उजनीस आले' असें ग्रहीत धरून त्या अनुरोधानें वर्ष ठरविलें आहे. [ भाग १ लेखांक २२७,२२८ ] 'माधवसिंगासी व कोटेकरांशी वैशमता पडली म्हणोन खानाजी जाधव व सुलतानजी लांबहाते यास फौजसह ठेविले' असा जो उल्लेख आला आहे त्याचा या पत्रांतील 'हाड्याचे सहाय व्हावे म्हणून तुम्ही व सुलतानजी मामा राहिला' या वाक्याशीं संदर्भही जुळतो. [ भाग १ लेखांक २६६, २६७ ] मात्र सिक्कामोर्तबानें या विधानास किंचित् अडचण येते. मल्हारजी होळकर जिवंत असतां त्यांचे नातु मालोजी यांचें सिक्कामोर्तब प्रचलित असून तें तुकोजीनें वापरलें आहे असें मानावें लागतें. हा प्रकार विचित्र वाटतो खरा पण त्यास निरुपाय आहे. कारण अखेराम १७६५ सालीं वारला असून त्याच्या हयातींत हें पत्र लिहिलें आहे असें स्पष्ट आहे. [ लेखांक ७१ ] पत्र १७६२ तें १७६४ यांपैकीं कोणत्या तरी सालाचें मानलें तरी तें 'सुभेदार साहेब' [ म्हणजे मल्हारजी होळकर ] जिवंत असतां लिहिलें आहे हें निर्विवाद आहे. त्यामुळें हें सिक्कामोर्तब वरील अनुमानास विघातक नसून मल्हारजीच्या समक्ष मालोजीचा सिक्का चालू होता असें सिद्ध होतें. यासाठीं पत्रांतील आशयाला अनुलक्षून तारीख ठरविली आहे. पुत्रनिधनानंतर मल्हारजी होळकरांनीं आपल्या समक्ष नातवाचा सिक्का चालवून अहिल्याबाईस कारभार सोंपविला असेंच म्हणावें लागतें. [ चंद्रचूड १ लेखांक ६५, ६९ ]

मेहेरबानगी करून पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ आवगत जाला. 'कोटेकरासी राजश्री सुभेदार[६०] साहेबाचे वचन कछुव्याच्या लडाईत सामिल होउन चाकरीची शर्थ[६१] केली. याचा मुलुक मारिला. अभेसिंगाचा अपवाद ठेविला. तर यानी त्यास ठेविले नाही. सुरतरामाचा घेत्र दे[व] आसेल त्यासी समजावे. संमध यासी काय! शद्व लागल' म्हणून कितिक मजकूर वडीलपणे राय अखेरामजीनी सांगितले आसल, त्यावरून लिहिला, तो सर्व कळू आला. यैसियांसि ' आपण आर्थ लिहिला तो अवघा खराच. कोटेकर आपले तीर्थरूपाचे वचन अन्यथा भाव नसावा यात संदेह नाही. आभेसिंगाने तीन वर्षे हरामखोरी केली. आज़मेरी कडे मारवाडात रायजीस समक्ष याच्या बंदोबस्ताकरिता सांगितले परंतु हैगई केली. मेवाडातून जीरापुर[६२] माचलपुराकडे[६३] आलो को × × × पाठविली ते समई रायजीसी × × रल्या मनसुब्यात गर्क होते कि × × × नाथ न राहिले. तथापि × × × स्नेह जाणून हाडोतीचा मुलुक टाकून खेचीवाड्यात आलो. दाहा वीस गांव मारले. बलभद्रसिंग [खींची] येउन भेटला. निखालसता दाखउन राठोड मजकूरात [स] जागा न द्यावी हा करार केला. सुरजेहून[६४] झासीकडेस जावयास शाहाडोरीयास[६५] आलो. तेथे बोभाट माळव्यातील कमाविसदाराचे शतशः येउ लागले. अभेसिंग हाडोती, रिछवा[६६] व रलायता[६७]

---

( ६० ) श्रीमंत मल्हारजी होळकर.

( ६१ ) लेखांक १०, ६५ टीप ९, ५२ पहा. शिंदेहोळकरांचे ' कोटेकरासी [ जे ] करार जाले ' त्याचें स्वरूप या पत्रावरून कळतें. पानिपतावर जरी कोटेकर आले नाहींत तरी जयपुरकरां विरुद्ध बाजू संभाळण्याची जबाबदारी त्यांनीं पतकरली होती ती पार पाडली हें स्पष्ट होतें. आत्म संरक्षणार्थ का होईना पण कछव्याचा व्यूह ढासळण्यासाठीं ती मराठ्यांस हवी होती आणि शेवटीं तीच हितकर झाली असें उघड आहे. आणि यामुळेंच बहुधा भाऊसाहेबासारख्या मानी स्वभावास ते करार मानवले असावेत असें वाटतें.

( ६२ ) जिरापुर हा मोठा कस्बा असून तो खिलचीपुरचे नैऋत्येस ९ कोसांवर आहे.

( ६३ ) माचलपुर हा मोठा गांव खिलचीपुरच्या नैऋत्येस ९ कोसांवर आहे.

( ६४ ) सिरोंजचा हा अपभ्रंश आहे. गून्याच्या ईशान्येस २५ कोसांचे अंतरावर हें स्थान असून सांप्रत तें नवाब टोंक याजकडे आहे. अमीरखान पेंढारी याजला जो मुलूख मिळाला त्यांत होळकरांचा हा सबंध परगना [ छबडा व पिंढाव्यासह ] त्याजकडे गेला.

( ६५ ) शहाडोरा हें गांव गून्याचे पूर्वेस ८ कोसांवर शिंदेशाहींत आहे.

( ६६ ) रिछवा हें गांव झालरापाटणचे अग्नेय दिशेस ५ कोसांवर आहे.

( ६७ ) हें गांव कोट्याचे ईशान्य दिशेस १५ कोसांवर काळी सिंध नदीच्या कांठीं आहे.

वगैरे जागा राहून झाले हाडे वगैरे सामिल करून घेउन जीरापूर, माचलपुर, रायपूर[६८] पिढावे पंच × × [महाल] × संदोर वगैरे परगणियाचे गाव आहे तेथें × राचा वल्ला करू लागला. हे रूबरूच व खरीफ रबी देखील क × × [मा]ल चंपट [नुक]सान केले. हे वृत जगजाहीर श्रवणात आले असत्र. आम्ही [ही] लिहिले होते. झासीकडील मातबर काम निदान जाणून टाकून माघारे हाडोतीत आलो. रिछ्याात अभेसिंगाची मातुश्री वगैरे कुटुंबाची दोन च्यार माणसे होती. तेथे स्वारी पाठविली. बायका तर आधले दिवसी गेल्या. गांव मारला त्यामुळे राठोडाचे [व] झाल्याचे दाहा पांच खेडी खराबीत आली. तदनंतर गड[६९] गागुर्णहून सवाईरामाकडून व सुकेतीहून अभेसिंगाच्या सलूखाचा संदर्भ आला. हाडोतीत त्याचा थारा नाही म्हणून आपल्यास भास सबब इतका विस्तार लिहिणे पडला. द्यानथराय महता व राजश्री आबाजी रघुनाथ [ निगडीकर ] आले होते. ते आटा दिवसाचा करार करून कोटियास गेले. अभैसिंगाचा बंदोबस्त वगैरे कार्य करून पंधरा वीस दिवस होत आले. अद्यापि येतच आहेत! लष्करात ताकीद निक्षूण कोरडी वैरण मात्र येती. चंदी रोजमुरे वगैरे दो.लक्षाच्या खर्चाखाली आलो. अस्तुः महता सुरतरामाचा मजकूर लिहिला, त्यास रायजीनी × × नावाचे लाखा रूपयाचे खत दिल्हे × × श्री सोबादारजी के रूपये दे व + × म्हणून बजिन्स खताची नकल × [ पाट ] विल्ही आहे. ध्यानास येईल. हाडयाचे सहा[ य ] व्हावे म्हणून तुम्ही व राजेश्री सुलतानजी मामा [ लांबहाते ] राहिला. आपण तर आजपर्यंत द्लिीवरीस[७०] आहां. राजश्री महादजी सीं[दे] × देसी च्यार महिने हाडोतीच्या प्रित्यर्थच राहिले आणि पुढेही त्यासी आतराय कोणे गोष्टीचा होणार. ' साहूकारी हवाल्याचा रुपया न मागावा की काय ? कोटेकर साहूकाराने साठी हजाराची हुंडी दिल्ही ते खोटी निघाली. तपसील लिहिता उदंडच आहे. ' निरोप घेउन आपण माघारे आलेत. उतम आहे. याच मार्गे याल. [ तर ] भेटी होईल. राजश्री सुभेदार साहेबापासी जाबसाल काय कराल म्हणून लेख त्यास जाबसाल करणार आपणच आहां. वडीलपणे बोलणे ते बोलाल आणि तीर्थरूप शद्ध ठेविणे तर ठेवितील. शब्द ठेवाया योग्य

---

( ६८ ) रायपुर पिंढावें झालरापाटणचे दक्षिणेस ६ कोसांवर आहे. नवाब टोंक याजकडील पिराव्यासच पूर्वी पिंढावें म्हणत असत असें वाटतें. जिरापुर माचलपुर प्रमाणेंच रायपुर पिंढावें असा प्रयोग होत असून दोनी महाल अगदी जवळ आहेत.

( ६९ ) गढ गागुर्ण झालरापाटणचे उत्तरेस हा किल्ला कालीसिंध नदीच्या पूर्व किनाऱ्याव २॥ कोसांवर आहे.

( ७० ) कोटेकरांचा कार्यभाग उरकल्यानंतर 'दक्षिण प्रांतीं मोगलानीं दंगा केल्यामुळें साबाजी शिंदे' [चंडचूड वगैरे मंडळी] देशी रवाना झाली, व खानाजी जाधव 'दिल्लीस' गेले हें तर आतां स्पष्ट होतें पण खानाजी जाधवाच्या स्वारीचा वृतांत मात्र कळत नाहीं.

कर्म [केले] नाही. हे आपल्या ध्यानात आसलिया फिकीर नाही. अभेसिंगाच्या बंदोबस्ता करिता माहारावजीनी सिवसिंग राठोड पाठविले आहेत. त्याचे कामदारही आलेत. त्याचे परस्परे भाषण होते. दर्शना [नं]तर सर्व आवगत होईल. राजश्री सोमाजी लाभाते[७१] [?] ही येथे आहेत. रा छ * ६ रमजान. बहुत काय लिहिणे ।' हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ७५ ]

श्री

* [७ अप्रेल १७६८]

पुरवणी

रा[मजी]

नकल करारनामा का लीखा की

यादृदास्ती संस्थान कोटा महारावजी श्रीगुमानसिंवजी की सीरकार का मुत्सदी यासु सुबादारजी श्री तकुजी [ होळकर ] की मामलती को करार ठाहरो इ[स्तकबिल] सं[मत] १८१८ तस से १८२५ साल. ८ को ठहरा रु[पये] लाख ११,००,००० तीकी

तपसील:—

७,८९,००० के ता.

३,११,००० सखेत[७२] वा बकाइनी की गढी न लागवा सु नुकसान सीरकार को हुंवो, घोडा मंनखी[७३] की ती का नजराणा का ठहरा अर सखेत वा बकाइनी की गढी मेलो म्हाको आग माफक की अमल म्हाका रहसी. [ गढी ] म्हकी म्हाके हवाले करावनी.

११,००,०००

७,३४००० नगद देना आ डेरा सु कूच करा पाछ रोज पंधरा मे.

३,६६,००० बाकी अगोत्री सावन सुदी १५ देना.

११,००,०००

मी[ती] चैत्र वदी *५ संवत १८२५.

---

( ७१ ) हा सोमाजी लांबहाते सुलतानजीचा कोण ?

७२ ) सुकेत गढी.

७३ ) मानसे.

लेखांक [ ७६ ] श्री

[ १७ अप्रेल १७६९ ]

नकल करारनामा का कागद की.

सीधेश्री सर्व वोपमा विराजमान महारावजी श्री गुमानसीघजी जोगी लीखीतं श्री राव [७४] तुकोजी होलकर वा राव महादजी सिंदे केन श्री बंचजो. अप्रंच. प्रांत कोटा की मामलती को करार इस्तकबील संवत १८१८ ला. अठारासो पचीस का साल ताई मामलत ठहराई. सामलात रूपीया २०,५०,००० साडे बीस लाख ती म पाईमाली[७५] का रूपया मुजरा दीया. रूपीया ४,९२,६६० ती की बीकती.

१,९०,००० हुलकरा क
१,९०,००० सीदे
१,१२,६६० पुवार
―――――
४,९२,६६०.

चारी लाख बाणव हजार छ सो साठी. बाकी रूपया १५,५७,३४० अंके पंधरा लाख सतावन हजार तीनस चालीस ती म वाटनी बीगती

६,००,००० हुलकर
६,००,००० सीदे
३,५७,३४० पुवार
―――――
१५,५७,३४०

जुमला पंधरा लाख सतावत हजार तीनसो चालीस मारफती भट नतानंदजी वा व्यास गोपाळरामजी का ठहरी सो हिसे माफक जा का जाको पोहचावना. आगे करार माफकी दरसाल का रूपीया पोहचावते जाणा. मीती चैत्र सुदी १२ संवत १८२६. जाणिजे चंद्र * नवमा माहे जिल्हेज सूरसन तीसा सीतइ मया अलफ. सके १६९१ वीरोधी नाम संवत्सरे.

―――――

( ७४ ) लेखांक ५१ टीप ३९ पहा. शिंद्याप्रमाणेंच होळकरांनीं ' राव ' हें विशेषण बहुधा प्रत्येक हिंदी पत्रांत वापरलें आहे. [ लेखांक ७७, ८०, ८१, ८५, ९५ ]

( ७५ ) ' लस्कर जाता येता उपसर्ग लागतच आहे ' ही अनुभवोक्ति आज ही प्रत्ययास येते [ भाग १ लेखांक २६ ] यासाठीं मराठे व त्यांच्या सैन्यांच्या नांवानें खडे फोडून डांगोरा पिटणारांस मराठ्यांनीं दिलेली ही भरपाई लक्षांत ठेवण्यासारखी आहे. [ लेखांक ७७ ]

लेखांक [ ७७ ] श्रीरामजी

*[ ९ जनवरी १७७० ]

नकल

सीधश्री सर्व वोपमा वीराजमान महारावजी श्री गुमानसीघजी जोग श्री राव तुकोजी होल्कर वा राव महादजी सींदे केन श्री बांचजो. अठा का समाचार भला छे. राज का भला चाहिजे. अपरंच. राज की तरफ सामलात लागात संमत १८२५ अठारे से पचीस का साल ताई सुकेत का डेरा ठहराव कीयो ह उस माफक रु. सामलात पोहचाई देना और राज के मुल्क मे फौज आई ती सु नुकसान हुवो जी वास्ते भटजी श्री नितानंदजी वा रा[ज] जाल्मसिंघजी ने रदबदली कीई सो राज के इकलास पर नजर राखी पाईमाली का रु. २,५०,१०० अढाई लाख देणा ठहराया है. सो संवत १८२६ अठारा से छबीस का साल के खरनी[७६] मे सामलात मुजरा देवेंगे वसर्त कुल जाडा पाछला. मि[ती] पोस सुदी *१३ सं[मत] १८२६. मोर्तब सुद.

बार

---

लेखांक [ ७८ ] श्री[७७] * संवत १८२७ पौष शुद्ध १०

[ १५ जनवरी १७७२ ]

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यासि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा इसने सबेन मया व अल्फ. तुम्ही पत्र वेदमूर्ती राजश्री खुशालीराम भट पाटणकर याजबरोबर पाठविले ते पावले. लिहिले वृत कळो आले. यैसियासि सदैव आलिया व र्तिका समवेत पत्र पाठउन आपल्याकडील वर्तमान लिहित जाणे. रा छ * ९ माहे सवाल. ।" बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

( ७६ ) खंडणी.

( ७७ ) अहिल्याबाई होळकर यांच्या पत्रांवर केवळ मोर्तब वापरलें आहे. संग्रहांतील कोणत्याही पत्रावर त्यांचा सिक्का सांपडत नाहीं.

लेखांक [ ७९ ] श्री * संवत १८३० भाद्रपद शुद्ध ८

[ १३ सितंबर १७७४ ]




दस्तक सरकार राजश्री तुकोजी होळकर ता कमाविसदारान व राहदारान ठाणेदारान व जमीदारान व जकाते बाजे लोक माानिहाय सुाा खमस सबेन मया व आलफ. राजश्री नारो गोपाळ निाा सिंदे हे कोट्यास जात आहेत. याजबरोबर बाळ बरदारी उंटे घोडी आहेत. त्यास मार्गी कोण्ही मुजाहिम न होता आपलाली हाद पार करून नदीनाला उतरून देणे. ॥ जाणिजे छ ६ रजब.




---

लेखांक [ ८० ] श्रीरामजी

*[ १७ अक्टुबर १७७५ ]

सीधींश्री राजश्री राज जालमसिंघजी जोग्य श्री राव तुकोजी होळकर केन्य बंच्या. अठाका समाचार भला छे राज का भला चाहिये. अपरंच. मुन्सी हिम्मतसिंघ का बेटा बहादरसिंघ दिली मे पातसा[हा]जी के पास हुजूर सु वकील[७८] छे. विसके तनखा की सनद पहिले आभाजी रघुनाथ [ निगडीकर ] के नाम संस्थान मजकूर पर कर दीनी छी. सो ऐवज मसारनिले कुं पोंहचा नहीं ओर मुकासदार मजकूर की मामलत निकाल हाल पंडत नरहर मुरार कुं कही छे. तिंसु नई वरात मसारनिले के तनखा की पंडत मजकूर के नाम हजूर सु लिख खंदाई[७९] छे. विस बमोजिब ऐवज सिताबी से मुनसी हींम्तासिंघ के हवाले कर दोगा. इस बात कुं ढील हरगिज न करावोगा. मसारनिले सिरकार के काम पर हाजीरत पे है. विसके तनखा का ऐवज जल्दी से पहिले वसूल कर दिवावोगे. मिती आसोज बदी *९ संमत १८३१.

( ७८ ) माळव्याच्या वांटणीपासून शिंदे, होळकर [ व पवार ] हे आपापले स्वतंत्र वकील परदरबारीं ठेवीत असत असा पूर्वपानिपतीय पुरावा उपलब्ध आहे, इतकेंच नव्हें तर या वकिलांचें अस्तित्व पेशव्यांसही ज्ञात व मान्य असून त्यांच्या मध्यस्तीनें अनेक राजकारणें पार पडलीं आहेत [ राजवाडे १ लेखांक ६१, २०५ भाग १ लेखांक १, २, ३, ७१ ] तसेंच पर दरबारचे वकीलही शिंदेहोळकरांकडे राहत असत. [ भाग १ लेखांक ७१ ] खुद्द दिलीच्या बादशाहाकडे होळकरांचा ह्या वकील राहत होता त्याचें हें प्रत्यंतर आहे.

( ७९ ) खंदाई म्हणजे पाठविली.

लेखांक [ ८१ ] श्रीरामजी

* [ २२ अक्टुबर १७७५ ]




सीधीश्री राजश्री राज जालमसिंघजी जोग्य श्री राव तुकोजी होलकर केन बंच्या. अठाका समाचार भला छे. राज का भला चाहिये. अपरंच. राजश्री पटेलबाबा[८०] सुं सीरकार का रुपया लेणा छां. वीसकी तनखा रुपये ७८,००० अठातर हजार की राज पर कराय दीई थी. वीसके वसूल करबा बेई पंडत राजाराम कु उहां खिनाया[८१] छे. सो वायदे की मुदत होय चुकी और ऐवज अब ताई न दीया. या बात काम की नहीं. इस बात मे राज की सालसी वा दुरूस्ताई कुं दूसण छे, तिसूं लिखा छां. जो अबार देखत कागद सीरकार के ऐवज की निसां सिताब पंडत मजकूर की कराय दीजो. ढील ढाल हरगीज न कीजो. मिती असोज बदी *१३ संमत १८३१.

ौ राजश्री राज जालमसींघजी जोग्य.

---

लेखांक [ ८२ ] श्री * संवत् १८३३ अधिक भाद्रपद शुद्ध ११

[ २५ अगष्ट १७७६ ]

राजश्री नरहर मुरार

कार संस्थान कोटे गो यांसि

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा सबा सबैन मया व आलफ. राजश्री आत्माराम महिपतराव संस्थान मजकूरी पांच सात महिने जालमसिंगापासी होते. यास्तव त्यानी मशारनिलेस तीनसे रूपये देविले तो यैवज पावला नाही म्हणोन हुजूर विदित जाले. त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही येविषई जालमसिंगासी बोलून मशारनिलेस यैवज देविला असेल त्याप्रमाणे पावता होय ते करणे. ौ जाणिजे छ १० रजब. बहुत काय लिहिणे.




---

( ८० ) श्रीमंत महादजी शिंदे.

( ८१ ) खिनाया म्हणजे पाठविला.

लेखांक [ ८३ ] श्री * संवत् १८३६ आषाढ शुद्ध ७

[ २० जून १७७९ ]

चिरंजीव राजश्री बापूजी[८२] होळकर या प्रति तुकोजी होळकर आशिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. संस्थान बूंदी येथील मामलत साल मजकूरी राजश्री गोविंद बलाळ व विठलराव गोपाळ याजकडे सांगून सनदा पेशजी सादर जाल्या आहेत. संस्थान मारी याजकडील आमलाची सुरूवात जाली पाहिजे यास्तव हे पत्र लिहिले असे. तरी मामलेदार मारनिले कार्य लागल्यास तुम्हास लिहितील त्याआन्वये त्याचा उपराला करून आमलाचा बंदोबस्त करून देणे. येविषईचा बोभाट पुन्हा इकडे न ये ते करणे. १" रा छ * ५ जाखर. सुा समानेन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे आशिर्वाद. मोर्तब सुद

---

लेखांक [ ८४ ] श्री * संवत् १८३६ आषाढ वद्य ५

[ ४ जुलै १७७९ ]

नकल

राजश्री मल्हार गोविंद

कमाविसदार संस्थान बूंदी गो.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुा समानेन मया व आलफ. चिरंजीव राजश्री तुकाबानी संस्थान मजकूर येथील मामलत तुम्हाकडून दूर करून साल मजकूरापासून राजश्री गोविंद बलाळ याजकडे सागितली आसे. तरी तुम्ही तेथील दखल न करिता ठाणे दास्तान जकिऱ्या सुधा पंत मारनिलेचे तर्फेने राजश्री लालाजी बलाळ सा मजकूरी आहेत त्यांचे जिमेस करून पावलियाची क[ब]ज घेणे. वात्रगी दिकत न करणे. जाणिजे छ * १९ जाखर. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद.

---

( ८२ ) 'चिरंजीवे' या विशेषनावरून हा तूकोजी होळकरांच्या पहिल्या घरच्या वडील बंधुचा मुलगा म्हणजे पुतण्या असावा असें वाटतें.

लेखांक [ ८५ ]                श्रीरामजी[८३]

[ ९ जुलै १७७९ ]




सीधश्री सरब वोपमा लायक रावराजा श्री बिसनसीधजी जोय      सुबेदार राजश्री राव तुकोजी होलकर केन श्री बंच्या. इहां का समाचार भला हे. आपका भला चाहिजे. आप्रंच. संस्थान बूंदी की मामलत सरकार के त्रफ की मल्हारराव गोविंद के तरफ सुदुर कर राजश्री गोविंदराव बलाल कु सनद कर दीवी और आप के नामे कागद लीख दीया था. जीस प्रमाणे आज ताई अमल वाहां पंडत मसारनुले का हुवा न्ही. पंडत केसो मोरेसर पेली वाहां हे. जीसका पक्षपात कर मामलत मे बखेडा करवाया. सो या बात आपकु जोग न्ही. जीसु लीखी हे. सो जीस दीन सो सनद वाहां पोहची होगी जीस दीन सु आमल सनद माफीक पंडत गोविन्दराव बलाल के तरफ देणा और केसो मोरेसर कु रजा देणी. वाहां राखणा न्ही. फेर इस बात का बोभाट आवेगा तो सीबंदी खर्चा तथा बखेडा के सबब लावणी मे कमती आवेगी. जिसका रुपया आपकु देणा आवेगा और इखलास मे कसर पडेगी जो करावोगा न्ही. कागद पोहचते गोविंदराव बलाल कु आमल सनद माफीक दीवावोगे. † मीती आषाढ वद्य १० संमत १८३६.

† राजश्री रावराजा श्री बिसनसिंघजी जोग्य.

---

लेखांक [ ८६ ]                श्री[८४]          * संवत १८३६ माघ शुद्ध १०

[ १५ फरवरी १७८० ]




राजश्री गोविंद बलाळ
कमाविसदार सा। बूंदी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो।      तुकोजी होळकर दंडवत. सुा। समा-

---

( ८३ ) याच अर्थाचें व मितीचें पत्र 'सीधश्री सरबवोपमा राजश्री धाभाई सुखरामजी जोग्य' यांचे नांवें आहे.

( ८४ ) याच अर्थाचें व तारखेचें दुसरें पत्र 'लालाजी बलाल गुलगुले' यांचे नांवें आहे.

नीन मया व आलफ. राजश्री यशवंतराव गंगाधर [चंद्रचूड] याजकडे संस्थान मार पो मोजे बढाणा व मौजे गंभीरा हे दोन गांव सरकारातून आहेत तेथे रावरा × [जे] कटकट करून आमलास खलेल करणार म्हणोन हुजूर विदित जाले. त्यावरून हे पत्र सादर केले असे. तरी येविषई रावराजे यासी [नी] गांवास उपद्रव दिल्हा आ.. आमलात खलेल केल्यास परिछिन्न कार्यास येणार नाही, या आन्वये निक्षून हाटकून देहाये मारी त्याजकडील काडी इतका उपसर्ग न लागे ते ㅉ करणे आणि तुम्ही गांवचा उपराला राखून तेथील कोणे विषईचा बोभाट न ये ते करणे.।' जाणिजे छ ९, सफर. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ८७ ]　　　श्री　　　* संवत १८३७ भाद्रपद शुद्ध १४

[ १२ सितंबर १७८० ]

श्री झाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजि सुत तुकोजी होळकर

राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　तुकोजी होळकर रामराम विनंती उपर. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणे विशेष. संस्थान कोटे येथील मामलती चा तूर्त करार राजश्री चादसिंग हाडे व दया[नाथ]भटजी चे वियमाने जाला आहे. त्या प्राा तूर्त रुपये २,००,००० दोन लाख राजश्री नरहर मुरहार कमाविसदार संस्थान मजकूर याजकडे देवविले आसेत. तरी पावते करून कबज घेणे.।' रा छ १२ रमजान सुमा इहिदे समानीन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [ ८८ ]　　　श्री　　　* संवत् १८३८ भाद्रपद शुद्ध १४

[ १ सितंबर १७८१ ]

राजश्री मल्हारराव गोविंद गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो　　अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा

इसने समानेन मया व आलफ. संस्थान बूंदी येथील मामलत पेशजी प्रमाणे राजश्री गोविंद बलाळ याजकडे बहाल राहून रसदेचा यैवज ठेराउन निकाल करून घेतला आसता प्रस्तुत तुम्ही तेथील मामलत चिरंजीव राजश्री तुकबाकडून देशींहून करून घेतली म्हणोन हुजूर विदित जाले. यैसियांसि येक वेळ जाबसाल निर्गमात आला असता तेथील मामलत केल्याने ठीक नाही. येविषई चिरंजीवास परभारे ल्याहावयाचे ते लिहून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही मामलतीचे बखेड्यात येकरूप न पडणे. महाली जाउन खटखट आरंभिल्यास परिछिन्न उपयोगी पडणार नाही. ।' जाणिजे छ * १२ रमजान. बहुंत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ८९ ] श्री संवत् १८३८ आश्विन शुद्ध ८

[ २५ सितंबर १७८१ ]

राजश्री केशो मोरेश्वर निा मल्हारराव गोविंद गो यांस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा इसने समानेन मया व आलफ. संस्थान बूंदी व पा पाटण येथील मामलत पूर्ववत प्रमाणें राजश्री बाळाराव गोविंद याजकडे बहाल राखून रसदेचा यैवज आवल सालीच वराता करून घेतला. हे वर्तमान देसी चिरंजिवास लिहिले असता मल्हारराव गोविंद यानी आपला परीणाम न विचारिता संस्थान बूंदी येथील मामलत करून सनदा तुम्हाकडे पाठविल्या. त्यानी लेकुरपण केले परंतु तुम्ही त्याचे वडिलाचे हातचे शहाणे करते माणूस, आसे आसोन काही आदी पश्चात न पाहता, महाली जाउन बखेडा आरंभिला आहे म्हणोन हुंजूर विदित जाहले. हे वर्तमान येताच पागा पाठउन तुम्हास आणावे आसे होते परंतु केवळ मल्हारराव गोविंद याचे चालीवर अथवा तुमच्या वर्तणूकीवर आसा प्रकार घडल्याने त्याचे वडिलाचे स्वरूप राहात नाही, या आर्थी येक वेळ सुचवावे, डोळे न उघडल्यास मग करणे ते केल्यास चिंता नाही. यास्तव हे पत्र सादर केले असे. तरी अथःपर पत्र पावताच येक क्षणभर महाली न राहता उठोन जाणे. पुन्हा तेथे राहून बखेडा आरंभिल्याचा बोभाट आल्यास तुमची सिथ्त [स्थित] राहणार नाही. [ हे ] पष्ट समजोन फिरोन बोभाट न ये ते करणे. जाणिजे * छ ६ सवाल. बहुत काये लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ९० ]  श्री[८५]  * संवत १८३८ आश्विन वद्य ३
[ ५ अक्टुबर १७८१ ]

सिक्का  नकल

राजश्री बाळाजी गोविंद गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो  तुकोजी होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशेष. संस्थान बूंदी येथील मामलत राजश्री मल्हार गोविंद याजकडे व पो पाटण येथील मामलत राजश्री चिमणाजी गोविंद याजकडे साल मजकूरी सांगून पेशजी [सनदा] अलाहिदा सादर जाल्या आहेत. त्याप्रमाणे सवस्था-[न]चा व प्रा मजकूरचा अमल त्याजकडे द्यावा. ते न करिता महाली तुम्हाकडील लालाजी बलाळ आहेत ते नाना प्रकारच्या दिकती घेउन ठाणी याजकडे देत नाहीत म्हणोन सरकारात वर्तमान कळले. यैसियासि सरकार सनदे प्रा तुह्मी आपल्याकडील कारकूनास सांगून ठाणी याचे हवाले करावी. ते न करिता उग्याच लटिक्या कल्पना घेउन ठाण्या विसी खलेल करावी हे चांगले की काय! याजकरिता हेली पत्र तुम्हास लिहिले आसे. तरी तुम्ही लालाजी बलाळ यासि निक्षून लिहून सरकार सनदे आन्वये ठाणीज्यात [ व ] जकीरा मारनिलकडे देउन कब्रज द्यावी. साल मजकूरचा वसूल तुम्हाकडे दाही महालचा वसूल आला असल तो जमीदाराच्या रूजूवातीने याचा याजकडे देणे. रा छ * १६ सवाल. सुमा इसने समानीन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब

---

लेखांक [ ९१ ]  श्री  * संवत १८३८ कार्तिक शुद्ध ६
[ २२ अक्टुबर १७८१ ]

राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो  अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा इसने समानीन मया अलफ. संस्थान बूंदी येथील मामलतीच्या सनदा रा मल्हाराव गोविंद याणी घेउन केशो मोरेश्वर याजकडे पाठविल्या आहेत. याजकरिता त्यानी संस्थान मारी जाउन बखेडा आरंभिला आहे. पा पाटण येथेही चिमणाजी गोविंद याजकडील कारकून गोविंद देवजी मामलती निमित्य बखेडा करितात म्हणोन हुजूर विदित जाले. ऐसियासि येविषई उभयेता मशारनिलेस व तुम्हास आगोधर पत्रे

---

( ८५ ) याच अर्थाचे दुसरें पत्र 'लालाजी [गुलगुलें]' बलाल यांचे नांवें आहे.

पाठविली आहेत आणि हली रा मुरार विठल कारकून याजला पाठउन उभयतास पत्रे आलाहिदा देउन हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही व मशारनिले मिलोन उमेतासी निक्षूण बोलून मामलतीत बखेडा होउ न देता बंदोबस्त राहून साल मारची वहिवट रा गोविंद बलाल याजकडे होय ते करणे. इत:पर त्याचे समजल्यात न आल्यास पागा पाठउन बंदोबस्त करणे तो केला जाईल. जाणिजे छ * ४ जिलकाद बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ९२ ] श्री[८६] * संवत् १८३८ कार्तिक शुद्ध ६

[ २२ अक्टूबर १७८१ ]

नकल

राजश्री गोविंद देवजी

नि॥ चिमणाजी गोविंद गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ अहिल्याबाई होळकर दंडवत. सुा॥ इसने समानेन मया व अलफ. तुह्मी पे॥ पाटण येथील मामलतीविसी महाली जाउन बखेडा आरंभिला आहे म्हणोन हुजूर विदित जाले. यैसियासी येविषई तुम्हास अगोधर एक दोन वेळा लिहिले असोन मागती तुम्ही लोभाविष्ट होउन महाली बखेडा आरंभिला आहे. अशा रीतीने तुमची सालसीनता पाहून परिणाम लागेल की काय ? याचा विचार न करिता लटक्या दुराग्रहात पडून खटखट करावी हे गोष्ट चांगली नाही. यास्तव हाली सरकारातून राजश्री मुरार विठल कारकून पाठउन हे पत्र सादर केले आसे. तर तुम्ही अत:पर महाली मामलतीविसी येकरूप बखेडा न करणे. साल मजकूरचे रसदेचा यैवज रा गोविंद बलाळ याजपासोन अगोधरच घेतला आहे. तेव्हां मामलतीची वहिवट तेच करतील. पुढे अखेर साल जाल्यावर आज्ञा कर्तव्य ते केली जाईल. तूर्त खलेल न करणे. केल्यास सदरी परिछिन्न उपयोगी पडणार नाही. येविषईचा सविस्तर अर्थ मा॥रनिले सांगतील त्याजप्रमाणे वर्तणूक करणे. जाणिजे * छ ४ जिलकाद. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

( ८६ ) याच अर्थाचें एक पत्र 'केशो मोरेश्वर नि॥ मल्हारराव गोविंद' यांचे नांवें आहे.

लेखांक [ ९३ ] श्री[८७] * संवत् १८३९ चैत्र वद्य ९

[ ६ अप्रेल १७८२ ]




राजश्री मलारराव गोविंद कामदार संस्थान बूंदी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत. सुमा इसने समानीन मया व अलफ. संस्थान मारी आमल दरोबस्त तुमचा जाला. करवल व देई दोन ठाणी मात्र ठेविली आहेत. सिबंदीखर्च व तगाई रयेतीस दिल्ही आहे. याचा जाबसाल वाजबी अन्वये करून घेऊन दोन्ही ठाणी स्वाधीन करावी. परंतु मलारराव याजकडून सिबंदीचा वगैरे जाबसाल सुरलित निर्गमात येत नाही. येविषई सरकारची ताकीद असावी म्हणोन राजश्री लालाजी बलाळ यानी सरकारात लिहिले. त्याजवरून तुम्हास हे पत्र सादर केले आसे. तरी तुम्ही मशारनिलेसी गैरवाजबी न्हे जाबसाल न करिता संस्थान मारी बाकी आसेल ते जमीदाराचे विा वाजबी रुजू करून घेउन महाली सनद दाखल जाली त्या तारखेपावेतो नेमणूक बाा सिबंदी वगैरे सिरस्ते प्रो खर्च हिसेरसीद हिसेबी होईल, त्यात साल मजकूरची वासलात वजा करून बाकी देणे निघेल ते व महाली रयेतीस तगाई त्यानी दिल्ही आसेल ते येकूण दोन्ही कलमाचा वाजबी येवज माजूर मामलेदाराचा देणे. ठांणी त्यानी ठेविली आहेत ते तुम्हाकडे देण्या विषई सरकारांतून त्यास लिहिले आहे. तेही द्यावयास दिकत करणार नाहीत. जाणिजे छ * २२ रविलाखर. ॥ बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ९४ ] श्री * संवत १८३९ आषाढ वद्य ५

[ २९ जुलै १७८२ ]

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा सलास समानेन मया व अलफ. राजश्री बापुजी महादेव याजकडे पो करवर पैकी

---

(८७) याच मितीचीं व मजकुराचीं पत्रें 'लालाजी बलाळ [गुलगुले आणि] नरहर मुरार कार कोटे' यांच्या नांवें आहेत.

गांव येणे प्रमाणे बिा

१ मौजे मालीहेडा.

१ मौजे रेठोदा.

१ मौजे गुरजना.

३

येकूण तीन गांव पहिल्यापासोन चालत आले आहेत. हली तेथे किसनसिंग बावल्याचे पुत्राने आमलात खलेल केली आहे म्हणोन हुजूर विदित जाले. यैसियास मशारनिलेस गांव इनाम तांबापत्र करून दिल्हे. याची भिस्त सर्व त्या गावावरच आहे. यास्तव हे पत्र सादर केले असे. तरी तुम्ही किसनसिंग बावळयाचे पुत्रास जोर पोचाउन मशारनिलेकडील आमल गावात करून देउन पुन्हा खलेल न पडे ते करणे. ॥ जाणिजे छ * १७ साबान. ॥ बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ९५ ] श्रीरामजी.

*[ २३ नंवबर १७८२ ]

सीधश्री राजेश्री राज जालमसिंघजी जोग्य श्री राव तुकोजी होलकर केन बांचजो. इही के समाचार भले है. वहां के भले चाहीजे. अप्रंच. प्र. पाटण की मामलत राजश्री चिमणाजी गोविन्द साबिक दस्तूर कही सनदा लीखाय दी है. अब सुणाबा मे आई जो कमायसदार माजुल अमल देने मे हीला हरकत फैल फीतुर करता है. सो यो बात जोग्य न्ही. हमने उनकु सनद कर दी थी जद ये मुदत के इस मामलत पर थे परंतु सनद देखता ही अमल दीयो. सो यो बात सनद की है. सनद मुजब अमल मे लावना जोग्य है. जीसु लीखा छां. जो कमायसदार माजुले है. जी भांत समजे उ भात समझाय राजश्री गोविन्दराव देवाजी की मदत कर पाटण मे अमल दखल कराय दीजो और फैल फीतुर कीसी तरफ सु होवे तो न मानजो. तुमकु अपना ही हीतु नीखालस जाण इस काम वास्ते लिखा है. सो लिखे मुजब आमल मे लावोगा. कागद समाचार हमेस लीखता रहोगा. मीती कातक बदी * ३ समत १८३८.

लेखांक [ ९६ ]　　　　श्री　　　　* संवत १८४१ आषाढ शुद्ध १५

[ ३ जुलै १७८४ ]

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा खमस समानेन मया व अलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ अवगत जाला. मौजे पागा पाा निमथोर म्हैसोदे व मौजे रतनपुरा ताा भानपुरा पाा रामपुरा येथील काकडाचा[८८] कजिया पेशजी होता. त्याची पंचाईत होउन पेशजी फडशा जाला असोन मागती कजिया उपस्थित जाला आहे. येविषई मामलेदारास ताकीद जाली पाहिजे म्हणोन लिहिले. यैसियासी येविषई राा आबाजी विष्णू [?] मामलेदार पाा मार याजला अलाहिदा पत्र पाठविले आहे. वाजबी जाबसाल मनांस आणून ज्याचा गैरवाजबी कजिया असल त्याजला ताकीद करतील. तुम्हीही भीड मुरवत न धरिता आपले गांवकरी यास निक्षून ताकीद करून लढा न राहे ते करणे. ॥ जाणिजे छ * १४ साबान. ॥ बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

पैाा छ २२ माहे साबान.

[ ११ जुलै १७८४ ]

---

लेखांक [ ९७ ]　　　　श्री　　　　* संवत् १८४१ मार्गशीर्ष वद्य २

[ १७ दिसंबर १७८५ ]

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा सित समानीन मया व आलफ. मौजे आमझरी पाा मसोदे व मौजे सानडा पाो संधारा हे दोन्ही गांव शेजारी आहेत. दोहींचे काकडावर डोंगर आहे. तेथे पहिल्यापासू[न] हरदु गांवची गुरे चरत असता सांप्रत आमझरीकरानी आपले परी तुम्हास सांगितल्यामुळे तुम्ही संधारे परगणियाचे गांवची गुरे डोंगरात चरावायासी गेली होती ते बलात्कारे वेढून नेउन गुराखी याची पांघुरणे व वस्तभाव दरोबस्त नेली म्हणोन

---

( ८८ ) या संबंधींच दुसरें पत्र 'आबाजी विष्णु कार रामपुरा' यांचें नावें असून त्यांत 'पूर्वी पंचाईत होउन वाजबीचे रीतीनें फडशा जाला असोन मागती कजिया उपस्थित केला असल्यास ताकीद करून पुन्हा लढा न राहे ते करणें' असा आशय जास्त आहे. अस्तु. या व अशाच प्रकारच्या शिवेच्या तंट्यासंबंधीं पुढें महादजी शिंदे यांचीं पत्रें येणार आहेत त्यावेळीं उभय पक्षांची मनोवृत्ति कळून येईल.

हुजूर विदित जाले. त्यावरून हे पत्र तुम्हास सादर केले आसे. तरी अत:पर तुम्ही लटकी दिकत न करिता आमझरीवाले याच्या सांगितल्यावर संधारे परगणियाचे गांवची गुरे, ढोरे व गुराखी याची वस्तभाव नेली आसेल ती सुतळीच्या तोड्या सुधा ज्याची त्यास देणे. हे न घडल्यास मसोदे परगणियापैकी हरयेक गांवची गुरे आणून मुबदला केला जाईल. जाणिजे छ * १४ सफर. [1] बहुत काय लिहिणे.




पो पौष शुद्ध १२

[ ११ जनवरी १७८६ ]

---

लेखांक [ ९८ ] श्री * संवत् १८४५ आषाढ शुद्ध १

[ ४ जुलै १७८८ ]




राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत. सुमा तिसा समानीन मया व आलफ. राजश्री रामराव पुंडलीक यानी पाा म्हसोदे येथील मामलत मख्त्याने साल गुाा तुम्हाकडून केली. दरम्यान पेंढारी यानी दंगा करून तमाम महालीची धूळधानी केली. महाल खराबीत आणिला. हे वर्तमान त्यानी तुम्हास समजाविले असता महालची पायमाली मजरा न देता मख्त्या बाा यैवज भरून मागता म्हणोन येथे विदित जाले. यैसियास येविषईचा मजकूर तर इजारियाच्या मामलती सर्वत्र मामलेदार करितात त्याजाला महालची आफत अस्मानी, राजी बिराजी दंगा दुंगा जालियासी न्याये मनास आणोन मजरा द्यावे लागते, असा मार्ग [असता] म्हसोदे महाल कांही कोट्यापासून दूर नाही अथवा महाली पेंढारी याच दंगा जाला नसता मामलेदार लटका रड सांगतील असी गोष्टही नाही. पंत मारनिले केवल आज्ञान, त्याजला मामलतीची समज नसता चौघे रांगड्यानी फसविले. ते पूर्वीपासून सरकारचे पदरचे. त्याचा आगत्यवाद सरकारात याजकरिता हे पत्र सादर केले असे. तरी अत:पर तुम्ही मारनिलेस पाा मजकूर बाा मख्त्याचे यैवजा करिता तागादा न करिता कचा आकार समजून त्यात महाल मजकूरचा खर्च वाजवी मजरा

देउन राहिला यैवज भरून घेणे. जाणिजे छ * २९ रमजान. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

पोा छ २२ माहे शवाल. आषाढ वद्य ९
[ २६ जुलै १७८८ ]

---

लेखांक [ ९९ ] श्री * संवत् १८४५ पौष वद्य १२
[ २२ जनवरी १७८९ ]

सिका नकल

राजश्री राज नानालालजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकुजी होळकर रामराम विनंती उपरी. तुम्ही मेवाड प्रांती सरकार[त] विनंती केली की आम्ही सरकार लक्षाची आहो. यास्तव संवस्थान शहाबाज [द] बमय किला व प्रो हे जागा सरकारातून आम्हाकडे कृपा करून करार करून दिल्हे पाहिजे. त्यावरून तुम्ही सरकार लक्षाचे जाणून संवस्थान मार बमय किला व महाल तुम्हाकडेस करार सरकारातून देउन हे सनद सा[द]र केली आसे. तरी संवस्थान मार बमय किला व माहाल येथे तुम्ही आपला आमल करून साल दरसाल तेथील वसूल घेत जाणे. छ २५ * राखर सुमा तिसा समानीन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब.

---

लेखांक [१००] श्री * संवत् १८४६ भाद्रपद वद्य ३
[ ७ सितंबर १७८९ ]

नकल

राजश्री चिमणाजी गोविंद

कादार पा पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत. सुा तिसेन मया व आलफ. पाा मजकूरचा आमल समाइक आहे तो वाटून घेणे यास्तव तीन हिसे करून त्यात तनखा, रकबा व गांव लाउन यादी राजश्री महादजी बाबा सिंदे याजकडून सरकारात आली. तिची माहीत[गिरी] तुमची [आहे] सबब यादीची नकल तुम्हाकडे

मुजरद जासूद जोडी समागमे रवाना करून दिल्ही. [जो हिस्सा] घेणे [असेल] तो लिहून पाठवणे म्हणोन पत्र सरकारातून तुम्हास सादर जाले आहे व हाली राजश्री लालाजी बलाळ कमादार निा सिंदे तेथे आले आहेत. सरकारचा हिसा घेणे त्याचा ठराव जाला पो याज करिता हे पत्र सादर केले आसे. तरी पेशजी लिहिले आन्वये यादीचे मनन करून समजोन जो हिसा सरकारात घ्यावयाचा तो घेणे आणि हुजूर लिहून पाठवणे. सरकारातूनही त्या प्रो लिहिले जाइल. जाणिजे छ * १६ जिल्हेज. बहुत काय लिहिणे. मोर्तब सुद.

---

लेखांक [१०१] श्री * संवत् १८४६ कार्तिक वद्य १०

[ १२ नवंबर १७८९ ]




राजश्री चिमणाजी गोविंद

कमादार पो पाटण गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत. सुमा तिसेन मया व आलफ. पा मजकूरचे वाटणीची[८९] याद अगोधर राजश्री महादजीबाबा सिंदे याजकडील मामलेदारानी केली. तिची माहितगारी तुमची याजकरिता सरकारातून ते याद तुम्हाकडे जासूद जोडी समागमे पाठविली. तुम्ही तेथून याद दूसरी करून पाठविली.

---

( ८९ ) उभयता कमाविसदारांनीं वांटणी करून घेतली त्या विषयीं चिमणाजी गोविंदाचें पत्र येणे प्रमाणें आहे.

श्री [ २७ नवंबर १७८९ ]

श्रीमंत राजश्री सुभेदार साहेब साहेबाचे सेवेसी.

आज्ञाधारक चिमणाजी गोविंद कृतानेक अशिर्वाद विज्ञापना. येथील कुशल ता छ ९ माहे रावल पावेतो मुकाम पाटण साहेबाचे तेजप्रतापे यथास्थित जाणून स्वकीये वैभवादि लेखन आज्ञा करणार धणी समर्थ आहेत. विशेष. सरकारचे आज्ञापत्र राजश्री लालाजी बळाळ कमाविसदार निा सिंदे याज समागमे सादर जाले की प्रगणे पाटणचे वाटणीची याद पेसजी पाठविली आहे ती मनन करून समजून जो हिसा सरकारात घ्यावयाचा तो घेणे आणि हुजूर लिहून पाठविणे म्हणोन आज्ञा. [आली] त्यास पूर्वी जासूद जोडी समागमे वाटणीची याद सरकारातून पाठविली यैसियासी आज्ञे प्रो याद बरहुकूम वाटण्या जाल्या बितपसील

हिसे दोन देह सुमार २५ १ हिसा येक सरकारात मौजे भया वगैरे देहे

१ हिसा येक श्रीमंत राजश्री पंत प्रधान सुमार दाखली सुधा १२.

ते ही याद महादजी बाबा यानी पाहून उतर केले की आमच्या कमाविसदारानी याद केली आहे, तिजपैकी येक हिसा चितास येईल तो आपण घ्यावा. राहिले दोन हिसे ते इकडील मामलेदार घेतील अथवा आपलेकडील मामलेदारानी याद ? करून पाठविली आहे हेच करार करावी असे असल्यास दोन हिसे आम्हाकडील मामलेदार अगोधर घेतील. येक हिसा राहिला तो आपल्याकडील कमाविसदारानी घ्यावा. याप्रमाणे बोलणे जाले. त्याजवरून तुमचे यादीची नकल तुम्हाकडे पाठउन हे पत्र सादर केले आसे. तरी दोन्ही पर्याय मनन करून तुम्ही याद करून पाठविली हेच करार करावी असे असल्यास सिंदे याजकडील मामलेदार आगोधर दोन हिसे घेतील. येक हिसा राहिला तो सरकारचा तुम्ही घ्यावा. हे करावयाचे नसल्यास सिंदे याजकडे [ ोन] याद आली आहे तिजपैकी येक हिसा तुम्ही अगोधर घेउन दोन हिसे राहिले ते सिंदे याजकडील मामलेदार घेतील. दोन्ही प्रकार लिहिले आहेत [ते] समजून ज्यात सरकारचा दोष तुम्हा कडे न ये ते करणे. ।' जाणिजे छ * २३ सफर. बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [१०२] श्री * संवत् १८४९ कार्तिक वद्य ६

[ ५ नवंबर १७९२ ]

श्री
झाळसाकां
त चरणी तत्प
र मल्हारजि सु
त तुकोजी हो
ळकर

राजश्री पागे व सिलेदार नीा सरकार गोसावी यांस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर रामराम. सुमा

---

स्वामी याजकडे मौजे बळकवासा वगैरे देहे
सुमार १३.
१ हिसा येक श्रीमंत राजश्री माहादजी
बाबा सिंदे याजकडे मोजे आर्णिटा वगैरे ———
देहे सुमार १२. १

——— ———
२ ३

येणे प्रा हिसे तीन पो मोजे बलकवासा व मोजे आरणीवा [टा] वगैरे येकुण देहे पंचवीसाच्या यादी दोन सिंदे याजकडील कमाविसदार लालाजी बलाळ यानी घेतल्या. मोजे भया वगैरे दाखली सुधा देह १२ याची याद येक सरकार हिशाची आम्ही घेतली. ॥ श्रुत होय हे विज्ञाप्ती.

सलास तिसेन मयां व आलफ. पाा रतनपूर वगैरे महालचे गांव राजश्री लालाजी बलाल याज कडील कारकून माहीत करतील तेथे जाता येता उपसर्ग लागू न देता रखवाली करीत जाणे. बोभाट आलिया परिछिन्न उपयोगी पडणार नाही. जाणिजे छ * १९ ज्या ।' रावल. बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [१०३] श्री * संवत् १८५० माघ वद्य ५
[२० फरवरी १७९४]

सिका नकल

राजश्री जिवाजी बलाल [ केरकर ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो तुकोजी होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. 'महादजी शिंदे यास ज्वराची भावना होउन देवी [व] मानवी उपाव केले ते लागू न होता माघ शुा १३ स देवआज्ञा जाली' म्हणोन वर्तमान आले. 'त्याजवरून चित्तास परम खेद जाला. भगवतसत्तेस उपाव नाही. त्याचे ठिकाणी राजश्री दौलतराव शिंदे आहेत. ज्यात बंदोबस्त तेच घडेल. दोन्ही दौलती येक आणि श्रीमंताचा पुण्यप्रताप आहे त्यापेक्षी कोण्हेविषई अवज्याघड पडावे ऐसे नाही. तुम्हीं त्या [प्रां]ती फौज सुद्धा आंहा हे वर्तमान ऐकोन राजे रजवाडे इत्यादि गलबल करूं लागल्यास त्याजवर जबर [ जरब ] राहून बंदोबस्त राहिला पाहिजे, यांस्तव हे पत्र लिहिले असे. तरी तुम्हीं घडल्या[९०] गोष्टीमुळे आपले चितांस संवषई न आणितां आपले ठिकाणी मजबूदीनें कायेमी राखून दिल्ही अकबराबाद वगैरे प्रांतातील बंदोबस्तास आंतर न पडे ते करून वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जाणे. राजे रजवाडे यांजवर दबाव पोहचवावा याजकरितां आमचीही तयारी होत आहे. चिरंजीवाची रवानगी जल्द च घडेल. तें व तुम्ही येकविचारे तिकडींल बंदोबस्त राखणे. दोन्ही दौलती येक. कोणेविषई दूसरा आर्थ मनात न आणणे. ज्यांत तिकडील उपराळा तेच घडल्यात येईल.' रा छ * १९ रजेब. सुमा अर्बा तिसेन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विंनती. मोर्तब.

---

(९०) हा संकेत लाखेरीच्या युद्धाविषयीं दिसतो, कारण त्यांत गोपाळराव रघुनाथ [निगडीकर] व केरकर या 'कारकूनाकडून सिकस्त होउन बदलौकीक जाला तो दूर व्हावा म्हणोन [होळकर] इरेस पडले' होते.

लेखांक [ १०४ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५१ भाद्रपद शुद्ध २

[ २९ अगस्ट १७९४ ]




राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर दंडवत. सुा खमस तिसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन लेखनार्थ अवगत जाला. 'काा निमथूर व काा भानपुरा येथील सिवेचा कजिया[९१] बहुत दिवस आहे. आलीकडे रामपुरेकर मामलेदारानी त्या कटकटीमुळें काा मार वगैरे पांच च्यार गांवची गुरे, ढोरे वगैरे वस्तभाव घेउन जाउन तलाव फोडून नुकसानी केली, येविषई ताकीद होउन आपसात कलह न वाढावा असे जाले पाहिजे ' म्हणोन विस्तारे करून लिहिले. येसि यासि ' हरदू गांवची कजिये जमीन बहुत कालाची पडली आहे. ते पक्षी ती जमीन निवाडा होय तोपर्यंत निमथूरकर अथवा भानपुरेकर उभयेपक्षीही वाहू नये आसे आसोन गुदस्ता निमथूरकरानी राजश्री गोपाळराव रघुनाथ [निगडीकर] याच्या आश्रयाने त्या जमिनीत ज्वारी व आल पेरली. हे सरकारात परस्परे श्रुत जाले व तुम्हासही समजलेच आसेल. तथापि तुम्ही गांवकरी यानी आपले परी समजाविल्यामुळें ती गोष्टी लोपून रामपुरेकर मामलेदाराकडे अपराध दर्शउन लिहिले. त्यास कांही निमित्ता विना कटकट व्हावयाची नाही. कजियास मूळ कोणीकडून कसे जाले याचा विचार तुम्ही कांहीच न केला. अस्तु. इतःपर ते कजिये जमीन निर्णये होय तोपावेतो दुतर्फा परिछिन्न वाहू नये. या प्राा सरकारातून रामपुरेकर मामलेदारास निक्षूण ताकीद जाली आहे व तुम्हीही निमथूरकरास स्पष्ट ताकीद करणे म्हणजे कलहास मूळ व्हावयाचे नाही. हली गुरे वगैरे वस्तभाव नेली असेल त्याच्या चौकसीविषई येथून जासूद जोडी रवाना करून त्याहावयाचे ते लिहिले आहे. गुरे ढोरे मामलेदारानी नेली आसे आसल्यास सरकारी जासूद त्याजला ताकीद करून देवितील. तुम्ही आपल्याकडील कोणी भला माणूस तेथे पाठवणे. किमपि गुंता पडणार नाही.' जाणिजे छ * ३ सफर. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

( ९१ ) या संबंधींच अहिल्याबाईचीं पत्रें 'लालाजी बलाळ [गुलगुले] व कृष्णाजी सदाशिव निाा कार रामपुरा' यांच्या नांवें आहेत.

लेखांक [ १०५ ] श्री ।" म्हाळसाकांत. * संवत् १८५१ भाद्रपद वद्य ३

[ १२ सितंबर १७९४ ]

राजश्री लालजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेो अहिल्याबाई होळकर दंडवत. सुमा खमस तिसेन मया व अलफ. सुकालराय कानूगो परगणे कोठडी पिढावे याचा पुत्र भवानीसिंग याजला सगाई परगणे नराणा[१२] येथील कानगो दौलतराम याचे कन्येसी केली होती. त्याजला जामिन कोटेकर पंचोली मोहनराम व गोपाळराम व सयाचंद हे त्रिवर्ग होउन सवा दोनसे रुपये सगाइ बा ठरले. त्यापैकी त्रिवर्ग जामिनानी नख्त सवासे रुपये घेउन बाकी शंभर रुपये लग्न जालियावर घ्यावे येसा करार मदार असता कानगो मार भाउपण्याचे लव्ध्या करिता महेश्वरी राहिल्यामुळे पाठी मागे त्रिवर्ग जामिनानी व नवरीचे भावाने याजला न पुसता परभारा तोडन[र]मल रतनगडखेडीवाला याजला नवरी दिल्ही. येविषई सरकारातून ताकीद जाली पाहिजे म्हणोन कानगो मार याने हुजूर विनंती केली. त्याजवरून नरहर मुरहार कार याजला पत्र अलाहिदा लिहून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तर त्रिवर्ग जामिनानी सुकालराये कानगो याचे पुत्रास यैवज घेउन सगाई केली ती याजला न पुसता रतनगढखेडीवाला तोडनमल याजला कसी दिल्ही व त्याने काय समजून केली ! येविसीची मार तुम्ही उभयता राज जालमसिंग यासी बोलून त्रिवर्ग जामिनानी व तोडनमल यानी गैररीत केली त्यापक्षी त्याजला सिक्षा करून हरदू जणाकडून भवानसिंग कानगो यासी सगाइ केली ती कायम करून जामिनाकडून अथवा तोडनमलाकडून याची लग्नसिधी करून देवणे. म्हणजे कानगो मजकूराकडे शंभर रुपये राहिले आहे त्याचाही निकाल करून देतील. असे जाणून पुन्हा येविसी बोभाट न ये तो अर्थ करणे. ।" जाणिजे छ * १७ सफर. ।" बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ १०६ ] श्री * संवत् १८५१ कार्तिक शुद्ध ९

[ १ नवंबर १७९४ ]

राजश्री राज जालमसिंग गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेो हरकूबाई[१३] होळकर आशिर्वाद

---

( १२ ) हा नराणा बहुधा किशनगड राज्यापैकीं असावा.

( १३ ) हरकुबाईनें सिक्का वापरला आहे खरा पण अक्षरें बरोबर उमजत नाहींत. [लेखांक १०७, १०८] केवळ '× × × त चरणी हरकूबाई होळकर' अशीं अक्षरें स्पष्ट उमटली आहेत.

विनंती उपर. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. तुम्ही येक दोन पत्र पाठविली ते उत्तम समई प्रविष्ट होउन संतोष जाला. आसेच निरंतर पत्री संतोषवीत जावे. यानंतर पत्री लिहिले की साचा जाबसाल आपण मनावर धरून केला त्यासंबंधे वेध बव्याचा पडला. आधी कादार दोन तीन जाले याजपासोन [ बटा ] मजरा घेतला [ असा ] आमचे कागदोपत्री दाखला आहे म्हणोन विस्तारपूर्वक लिहिले ते कळले व सिंद्याचे सरकारची झडतीचा दाखला लिहिला. त्यास आम्ही कच्ची वाकफगीरी सरकारात करू. निशा पाती आम्ही आपल्याकडून करून देविली. त्यानी झडत्या करून द्याव्या. ऐसी परवानगी जाली. इतकियात कोणी गैरवाका समजाविला की तुम्ही बटा लिहून देता परंतु आपले दफ्तरी पाहून देता की काये ? त्याजवरोन सरकारात संदेह येउन झडती महकूफ करून कागदपत्र काढिले. कागदोपत्री कोठे सिलसिला निघाला नाही. या कामाचे प्रयत्नास काडी मात्र आळस जाला नाही. तोडीचे समई संदेह घालणाराने घातला. कागदोपत्रीच्या दाखल्यास उपाये काये ! येविसीचे कच्चे वृत राजश्री राघो गंगाधर व सेक हबिबुलानी सांगता ध्यानास येईल. तपोनिधी आजे बावा मानभाव आमचे गुरु यासी मोजे डाबी प्रा बूंदी हा गांव आम्ही ' उदक ' दिल्हा. गांवचा सिलसिला तुम्हास वाखबगीरी तुम्हास पुर्तपणे आहे. हली गांवास उपसर्ग बूंदीहून होतो म्हणोन गांवचा बोभाट आला आहे. यावरोन आमचे मनात आले की वरवर पुढे गांवास साचा उपद्रव न लागावा. आम्ही तपोनिधीस पत्र उदकी करून दिल्हे आहे त्याप्रमाणे श्री रावराजाजीचे पत्र करून द्यावे म्हणजे गांव बाबाकडे निर्वेद जाला. हे करणे आपल्याकडे म्हणोन विस्तारपूर्वक लिहिले आसे व उभयेता मारनिलेस सांगोन उदक पत्राच्या नकला व श्रीमंत सूभेदार याचे पत्र बावानी करून घेतली त्याच्या नकला तुम्हास पहावयास पाठविले आसेत. तर हे पत्र पाहून सा बूंदी याचे उदकपत्र करून द्यावी. दुसरे राखी[९४] श्रावन शुद्ध १५ पाठवावी ते बनले नाही. हली उभयेता व बाबाजी खिसमतगार बराबर.

१ राखी १ सोन्याचे साकळी सुधा जडावाचे नग ७.
१ पागोटे जेणाबादी.
१ सेला जेणाबादी.
२ महमूदी जामवर.
१ धोत्र जोडा धुवट.

६

(९४) राणावतजी व भाकरोतनजी या दोन राजपूत स्त्रियांचा शिंद्यांशीं जसा 'राखी बांधण्या'चा व्यवहार होता तद्वच महाराष्ट्रीय हरकूबाईची ही राखी चिंतनीय आहे [भाग १ लेखांक १७९, २२३]

येणे प्रा पाठविले आहे. घेउन उत्तर पाठवावे. रवाना छ * ७ राखर. सुा खमस तिसैन मया व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती. ऻ

सिका

---

लेखांक [ १०७ ] श्री * संवत् १८५१ मार्गशीर्ष वद्य १०

[ १७ दिसंबर १७९४ ]

राजश्री सेक हबीबुला मुा कोटे गोसावी यांसि.

स्नो हरकूबाई होळकर आशिर्वाद. सुा खमस तिसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. लिहिला मजकूर ध्यानास आला. पत्री लिहिले की आपले पत्र राजश्री राज जालमसिंगजीस दिल्हे. वाचून बहुत संतोष जाले. त्याचे उत्तर पाठविले ते आम्हास पावले. येथूनही आम्ही पत्र लिहिले आहे त्याजवरून कळेल. तपोनिधी आतांबाविसी तुम्हास पेशजी समक्षे मोजे डाबीचे जाबसालाकरिता सांगितले आहे. त्यास आतोबाही तुम्हाकडे पाठविले आहेत. त्यास बोलल्याप्रमाणे त्याचा बंदोबस्त राजाकडून करून द्यावे. भरवसा जाणोन लिहिले आहे. रा छ * २३ जमादिलावल. बहुत काय लिहिणे. ऻ

सिका

---

लेखांक [ १०८ ] श्री * संवत् १८५१ मार्गशीर्ष वद्य १०

[ १७ दिसंबर १७९४ ]

राजश्री राज जालमसिंगजी व माधोसिंग झाले

सा कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो हरकूबाई होळकर आशिर्वाद उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित आसिले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र छ १ ९ माहे जावलेचे पाठविले ते छ १ २२ जमादिलावली पावले. लिहिला आन्वये ध्यानास आला. पत्री लिहिले की राजश्री राघो गंगाधर व सेक हबीब येथे आले. त्याने आपले ममतेचा व अभिमानपुरस्कर साहित्य केले त्याचा मजकूर सांगितला. त्यास पहिलेपासोन साहित्य व कृपा करीत आला त्याच अन्वये केले. त्यात आपणास विहित आहे. येथे सर्व आपले आज्ञेचा विचार आहे. दूसरा अर्थ न जा[णा]वे म्हणोन कितेक

प्रकारे लिहिले. त्यास मामलेतेविसी कांही चिंता न करणे. चिरंजीवासही देसी पत्र लिहिले आहे. त्यास जाबसाल होउन येईल. तुम्हाकडील हलकारे जोडी आम्हापासी आली. ते लस्करात चिरंजीवाकडे रवाना केली आहे. येथील वर्तमान तूर्त नवल विशेष लिहावा असे नाही. रा छ * २३ जमादिलावल. सुा खमस तिसेन मया व आलफ. बहुत काय लिहिणे ।' हे आशिर्वाद. ऱ्हे

सिका.

---

लेखांक [ १०९ ] श्री ।' म्हाळसाकांत. * संवत् १८५२ वैशाख शुद्ध ६.

[ २४ अप्रेल १७९५ ]

राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. संस्थान कोटे येथील सरकारचे मामलतीचा यैवज येणे, त्याचे जाबसालाविषई तुमचे तर्फेने राजश्री बापुजी आनंदराव बोलले. त्याची उत्तरे मशारनिलेसी बोलून रवानगी केली असता आद्याप जाबसाल निर्गमात येत नाही. यास्तव हली हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही दिवस गत न लाविता मामलतीचे यैवजाचा निर्गम सत्वर करून देणे. लांबणीवर टाकिल्यावर तुम्हासच भारी पडेल. याचा पुरता विचार करून लांबणीवर न टाकिता जल्द निकाल होय ते करणे. येविषई सविस्तरे मारनिलेस लिहिले आहे त्या अन्वये बोलतील. रा छ * ४ सवाल. सुमा खमस तिसेन मया व आलफ. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पो छ २० माहे सवाल सन मजकूर
वैशाख वद्य ७ संमत १८५१.
[ १० मे १७९५ ]

---

लेखांक [ ११० ] श्री ।' म्हाळसाकांत. * संवत् १८५२ वैशाख वद्य ६.

[ १० मे १७९५ ]

राजश्री जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. तुम्ही रा बाबुजी आनंदराव यासि मामलतसंबंधी बोलता त्याचे [वृत] मशारनिलेनी सरकारात लिहिले. त्यास यैवज बहुत येणे.

आजचे उद्यावर टाकून दिवस काढिता हे चांगले नाही. चिरंजीव राजश्री तुकबाची पत्रे यैवजाविषई निकडीची येतात. त्याजला अडचण याजमुळें सरकारातून रा पदमसी राजसी सावकार याजकडील चौ। लक्षाची वरात करून वसूलास रा जिवाजी सखाराम याची रवानगी पागा सुधा केली. तूर्त त्याचे कारकून रा भिकाजी मल्हार तेथे आले आहेत. याजमुळें तुमचे मनांत संशये आला असल. त्यास संशयाचे कारण नाही. वरातीचे यैवजाची तोड काढून सावकाराची निशा जाली म्हणजे मारनिलेस बोलाउन घेतले जाईल. तुम्हाकडील निखालसतेचे भाव रा बापुजी आनंदराव बोलतात [ व ] लिहितात तसे निदर्शनास आल्यानंतर सरकारातूनही दूसरा अर्थ मागे जाला नाही व पुढे घडणार नाही. सचोटीस जपत गेल्याने तुम्हासच उपयोगी पडल. सविस्तरे मारनिले बोलतील. ॥ रा छ * २० सवाल. सुमा खमस तिसेन मया व अलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पो छ १ माहे जिलकाद. जेष्ट सुा २

[ २० मे १७९५ ]

---

लेखांक [ १११ ]

श्री

राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशष. राजश्री आत्माराम महिपतराव याजला तुम्ही तीनसे रूपये देविले होते ते पावले नाही म्हणोन यैकिले. ऐसियासि मशार निले पांच सात महिने तुम्हापासी होते. यास्तव तुम्हीही त्याजला उपयोगाचे माणूस जाणून तीनशाची चिठी करून दिल्ही असता चिठीचा यैवज न पावला. हे आपूर्व आहे! हली हे पत्र लिहिले असे तरी ज्याजकडून यैवज देविला असे त्याजला ताकीद करून मशारनिलेस यैवज पावता होय ते करणे. ॥ जाणिजे छ * १० रजब. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ११२ ]

श्री

राजश्री राज जालमसिंग गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर विनंती

उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहिणे विशेष. पेशजी येक दोन पत्री कमाविसदारानी लिहिले की तुम्हाकडोन कारभारी[९५] समागमे घेउन येत आसो. त्यास अद्याप येतच आहेत ? याजकरिता हे पत्र लिहिले आहे. तरी तुम्हाकडून तुमचा कारभारी कमाविंसदारासमागमे देउन रवाना करावे. हुजूर आलिया सर्वार्थ ध्याना [त] आणोन बंदोबस्त करून देणे तो देविला जाईल. ।' रा छ * ९ रजब. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ११३ ] श्री

राजश्री राज जालमसिंग गोसावी यांसि.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्ये स्नो अहिल्याबाई होळकर विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. वो राजश्री ब्रजानंद भट तुम्हाकडून संस्थान कोटे येथील मामलतीच्या कामाकरिता येथे आले होते. त्यास मामलतीचा ठराव करून गोड गोष्टी बोलोन गेले. त्याप्रमाणे अद्याप संस्थानच्या येवजाचा निकाल राजश्री नरहर मुरार मामलेदार याजकडे करून देत नाहीत म्हणोन हुजूर विदित जाले. येसियासि भटजी मारासी येथून गेल्यास चार महिने होत आले परंतु अद्याप येवजाचा निकाल मामलेदाराकडे करीत नाही. हे गोष्ट उपयोगी नसे. त्यास हली हे पत्र लिहिले असे. तर भटजी मा ज्याप्रमाणे संस्थानच्या मामलतीचा करार करून गेले त्याप्रमाणे येवज मामलेदाराकडे पावता करणे. आणखी कितेक मार राजश्री शंकराजी मुरार याजला तपसील सांगितला आहे ते तुम्हास लिहितील त्या वरून कळो येईल. ।' रा छ * १९ जाखर. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ ११४ ] श्री

राजश्री राज जालमसिंग संस्थान कोटे गो यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो अहिल्याबाई होळकर विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहिणे विशेष. संस्थात मारकडून पहिल्या

---

( ९५ ) श्रीमंत तुकोजी होळकर यांचें याच मितीचें व मजकूराचें दुसरें पत्र 'राज जालमसिंग' याच्या नांवें आहे.

हस्तियाचा येवज येणे त्याची निशा राजश्री शंकराजी मुरार यानी करून दिल्ही. या उपरी दुसरे हस्तियाचा ऐवज येणे याजकरिता पंत मशारनिलेस येथून पाठविले. त्याजला जाउन च्यार पांच महिने होत आले. अद्याप येवजाची तोड पडत नाही. तर हे गोष्ट उपयोगी नसे. त्यावरून हली हे पत्र सादर केले असे. तर पत्र दर्शनी दूसरे हस्तियाचा यैवज झाडियानसी मारनिलेकडे पावता करणे. जर तुम्ही हताचे पायावर घातलीयाने[९६] फौजा त्या प्रांती आलियावर तुम्हास जड पडेल, आसे समजोन संस्थानचा यैवज झाडियानसी मारनिलेकडे देउन सत्वर रवाना करून हुजूर येउ पोहोनचे ते करणे. ।' रा छ * २६ [?] बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ ११५ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८५३ मार्गशीर्ष वद्य १५

[ २९ दिसेंबर १७९६ ]

श्री
म्हाळसाकां
त चरणी तत्प
र मल्हारजि सु
त तुकोजी हो
ळकर

राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो तुकोजी होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. राजश्री बापुजी आनंदराव यास समागमें राजश्री नरहर मुरहार कादार व आम्हाकडील भला माणूस मुख्त्यार सेवेसी रवाना करितो म्हणोन लिहिले ते कळले. यैसियासि मार निलेचे रवानगीस विलंभ न लावता लिहिल्या प्रा पाठउन देणे. राजश्री नरहर मुरार याचा देण्या घेण्याचा लढा तुम्हाकडे असेल तोही फडशा करून देणे. त्याचे कामात कोणेविषई दिकत न पडे ते करणे. रा छ * २९ जाखर. सुमा सित तिसेन मया व अलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

( ९६ ) मागें 'सुतळीचा तोडा' ही म्हण आलीच आहे. [ लेखांक ९७ ] आतां ही दुसरी पहावयास मिळते. अहिल्याईबाच्या कित्येक राजकीय पत्रांत देखील म्हणी जागोजागीं विखुरलेल्या पाहून स्त्रीस्वभावाची साक्ष पटून कौतुक वाटतें.



# श्रीमंत कासीराव होळकर
## यांचा असल पत्रव्यवहार.

१८५२ ते १८५६ विक्रमी.

लेखांक [ ११६ ]     श्री ।" म्हाळसाकांत  ॥ संवत् १८५२ जेष्ट वद्य १०
[ १२ जून १७९५ ]

श्री म्हाळसा
कांत चरणी त
त्पर मल्हारिजी
सुत तुकोजी
होळकर

राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो      कासीराव होळकर दंडवत. सुमा सित तिसेन मया व अलफ. 'ताा नंदवाई प्रांत मेवाड येथील मामलत राा लक्ष्मण मोरेश्वर याजकडे सांगितली आहे. त्यास बेगूचे[९७] किल्यात तुम्हाकडील कारकून आहेत. ते ताा मारी उपसर्ग देतात' म्हणोन हुजूर विदित जाले. त्यावरून हे पत्र सादर केले असे. तरी 'तुम्ही आपल्याकडील कारकूनास निक्षूण ताकीद करून ताा मारी कोणेविसी तिलप्रांय उपद्रव न लागे ते करणे. राजश्री दौलत रा‍व सिंदे याजकडील महाल व इकडील महाल दोन नाहीत. त्याअर्थी तुमचे तर्फेचे कारकूनानी व सरकारचे मामलेदारानी येकविचारे राहून कामकाज लागल्यास परस्परे उपराळा करीत जावा. यात उत्तम आहे'. जाणिजे छ ॥ २४ जिलकाद. ।" बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुध

---

( ९७ ) शिंदेशाही जिल्हे मंदसोरपैकीं खास कसबे सिंगोलीच्या पश्चिमेस ८ कोसांवर हें गांव उदेपूर राज्यांत असून तें महाराणा यांच्या भाऊबंदांपैकीं एकाकडे जागीर आहे.

लेखांक [ ११७ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५३ चैत्र शुद्ध १४

[ २१ अप्रेल १७९६ ]




राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो काशिराव होळकर दंडवत. सुमा सित तिसेन मया व आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ अवगत जाला. 'चिरंजीव[९८] राजश्री कृष्णराव [भगवंत गुलगुले] देसी जात आहेत समागमे अटाला आहे. त्याची याद अलाहिदा पाठविली आहे. त्याप्रमाणे दस्तकाची आज्ञा जाहली पाहिजे' म्हणोन लिहिले. येसियासी तुमचे लिहिल्यान्वये यादीप्रमाणे दस्तक पाठविले असे. सर्वदा पत्र पाठउन आपले वृत्त सविस्तारे लेखन करीत जाणे. जाणिजे छ * १२ शवाल. बहुत काये लिहिणे.




---

लेखांक [ ११८ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५३ पौष शुद्ध १३

[ ११ जनवरी १७९७ ]




राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो कासीराव होळकर रामराम विनंती उपर. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जावे विशेष. ताा ब्राम्हणगांव येथील मामलत राजश्री पांडुरंग सिवजी याजकडून सरकारातून दूर करून राजश्री भगवंत बलाळ याज कडे सांगोन सनदा, सोडचिठ्या देउन रवाना करून मारनिलेकडील हरी भवानी कारकून यास पत्रे सादर जाली असता, खलेल करून ठाणे न देता लडाई[स] प्रवर्तून माणसे जाया केली. यामुळे बैदा होउन आमले सुरळीत चाल[त] नाही म्हणोन हाल मामलेदाराचे पत्र सरकारात आले. यैसियास त्याचा उपार होउन बखेडा मिठला पाहिजे. यास्तव हे

---

(९८) बाळाजी गुलगुल्याचा कनिष्ठ बंधु भगवंतराव याचा हा दत्तक पुत्र होय. नात्यानें तो लालाजी गुलगुल्याचा चुलत भाऊ म्हणून त्यास 'चिरंजीव' असें म्हटलें आहे.

पत्र लेखन केले आसे. तरी तुम्ही आपलेकडील जमियेत ता मारी हाल अमलदाराकडे पाठउन माजूलाकडून ठाणे त्याचे स्वाधीन करून देवउन इतःपर तालक्यात खलेल न होता बिनदिकत चालेल असे करणे. रा छ * १२ माहे रजब. सुमा सबा तिसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

लेखांक [ ११९ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८५४ आषाढ शुद्ध ५

[ २९ जून १७९७ ]




राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो काशीराव होळकर दंडवत विनंती उपरी. राजश्री मल्हारराव गोविंद यानी सरकारात येउन विदित केले की आम्ही माहा यात्रा करून आल्यामुळे तेथील देणे जाले. याजकरिता मोजे झर पाा शिलोर हा गांव सरकारातून आम्हाकडे इनाम आहे तो राजश्री लालाजीबाबाकडे लाउन देउन त्याजपासोन यैवज घेउन यात्रेसंबंधे देणे वारिले. त्याचा यैवज फिटे तोपर्यंत गांवची घालमेल होणार नाही. येसा करारमदार केला आहे परंतु सरकारचे पत्राखेरीज त्याची खातरजमा होत नाही. यास्तव पत्र दिल्हे पाहिजे. म्हणोन त्यावरून हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही मशारनिलेसी करारात आणिल्याप्रमाणे महायात्रेचे कर्ज वारा वयासी यैवज देउन मोजे मार हा गांव आपले रदकर्जी लाउन घेणे. ठेरल्या आन्वये सरकारातून आथवा मारनिलेकडून मोजे मारची घालमेल व्हावयाची नाही. रवाना छ * ४ माहे मोहरम. सुमा समान तिसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंति.




पौा छ १२ माहे रोवल सन मजकूर
उर्फ भाद्रपद शुा १४ समत १८५४
[ ४ सितंबर १७९७ ]

---

लेखांक [ १२० ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५४ कार्तिक शुद्ध १४

[ ३ नवंबर १७९७ ]




राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ कासीराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. सा॥ बूंदी येथील मामलत राजश्री सिवराम लक्ष्मण यानी राजश्री तिलोकसी टिकमसी व जीवनदास गोवर्धनदास व राम नारायेण शालिग्राम व बिरधीचंद सावकार याजकडून रसद भरणा करविल्यामुळे सरकारातून याजकडे सांगून सनदा [ व ] वस्त्रे दिल्ही आहेत. परंतु दूरचा पल्ला मामलेदारास तेथे पोहोचावयास च्यार दिवस आधिक उणे लागतील. याजकरिता वसूल महालचा माजी मामलेदाराकडे जाउ न पावता ठाणे हाल मामलेदारा ~~चे कायम जाले पाहिजे यास्तव हे पत्र लेखन केले असे. तरी सावकारानी सनदा आपले दुकानी कोठ्यास पाठविल्या आहेत. पुढे बूंदीस तूर्त गुमास्ते जातील त्याचा मा॥र मेहेरचंद व सेरसीग वगैरे तुम्हास समजावितील त्याआन्वये त्याचा उपराळा करून ठाणे बसउन देउन वसूल माजी मामलेदाराकडे जाउ न पावता सनदेआन्वये सुरलीत अमल याजकडे चाले ते करणे. जाणिजे छ * १३ जमादिलावल. सुमा समान तिसेन मया व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ १२१ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५४ कार्तिक शुद्ध १४

[ ३ नवंबर १७९७ ]




राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो॥ कासीराव होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. सा॥ बूंदी येथील मामलत

राजश्री नारायेणराव मल्हार व मुसा बास[९९] फिरंगी याजकडून दूर करून साल मजकूरा पासोन राजश्री शिवराम लक्ष्मण याजकडे सांगितली आहे. त्याचे ठाणे कायम जाले पाहिजे याजकरिता हे पत्र लेखन केले असे. तरी मशारनिले तुम्हास लिहितील त्याप्रमाणे त्याचा उपराळा राखून ठाणे कायम करून देणे आणि पुढेही उपयोग लागल्यास पुस्तपन्हा राखीत जाणे. रा। छ * १३ जमादिलावल. सुमा समान तिसेन मया आलफ. बहुत काय लिहिणे ।' हे विनंती.

मोर्तब
सुद

पै॥ छ ४ जाखर समान तिसेन
मार्गशीर्ष शुद्ध ६
[ २४ नवंबर १७९७ ]

लेखांक [ १२२ ]

श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५४ कार्तिक वद्य ३०
[ १८ नवंबर १७९७ ]

श्री
म्हाळसाकां
त चरणी तत्प
र तुकोजी सुत
कासीराव हो
ळकर

राजश्री सिवराम लक्ष्मण
कामदार सा। बूंदी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो। कासीराव होळकर दंडवत. सु॥ समान तिसेन मया व आलफ. श्रीमंताकडून राजश्री कृष्णाजी[१००] जगंनाथ जोधपूरी आहेत.

---

(९९) याचें वास्तविक मूळ नांव कोणतें हें सांगणें कठिण. ' इतिहाससंग्रहांत ' हें नांव दोन जागीं आलें आहे. त्यांपैकीं एका ठिकाणीं 'कर्नल बास' [म्हणजे बेली] असें म्हटलें आहे. [ इतिसंग्रह भाग १७ पूर्वार्ध लेखांक ६४ ] हें पारसनिसाचें विधान खरें असेल तर आंग्रेप्रकरणांतील ' बास ' निराळा असून त्याचा संबंध जिवबादादा केरकराशीं म्हणजे पर्यायें शिंदेशाहीशीं होता असें म्हटलें पाहिजे. [ इतिसंग्रह भाग १० पान २८ ] त्यांवेळीं हा होळकरशाहींत आला होता. Baours, Birch अशीं जीं दोन नांवें Gwalior Gazetteer vol. i page 243-44 वर आहेत त्यांचें साम्य ' बास ' शब्दाशीं बरेंच जुळतें. Baours हा पाटणच्या लढाईत १७९० सालीं मारला गेला, तेव्हां Birch हाच ' बास ' असावा असें वाटतें.

(१००) हाच कृष्णाजी जगन्नाथ पेशव्यांकडून मारवाड्यांत वकील होता. त्याचा वकिली पत्रव्यवहार ' जोधपूर येथील राजकारणें ' या मथळ्यांखालीं पारसनिसानें प्रसिद्ध केला आहे. [ इतिसंग्रह भाग २० ] ह्याचें कार्यक्षेत्र बहुतेक राजपुतान्यांत राहिल्यानें ही वकिली मिळाली असें वाटतें.

त्याची नेमणूक त्या पो च्यारसे रुपये सा मार यैवजी चालत आहे तो यैवज रा लक्ष्मण सदासिव याजकडे पावत आहे त्या प्रो तुमचे वहिवाटीचा पावला पाहिजे. याज करिता हे पत्र सादर केले असे. तरी तुम्ही मशारनिलेस यैवज नेमणूकी बा पावता करणे आणि माजीकडे त्याचा यैवज घेणे राहीला अ ॠ सेल त्यासही सांगून देवणे. जाणिजे. छ * २८ जोवल. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

---

लेखांक [ १२३ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५४ पौष शुद्ध १३

[ ३१ दिसंबर १७९७ ]

श्री ह्माळसाकां त चरणी तत्प र तुकोजी सुत कासीराव हो ळकर

राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो कासीराव होळकर रामराम विनंती उपर. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. सा बूंदी येथील मामलत राजश्री नारायेणराव मल्हार याजकडून दूर करून सरकारातून राजश्री सिवराम लक्ष्मण याजकडे सांगोन त्याचे ठाणे बसउन द्यावयाकरिता × × च्या रवानग्या तुम्हास जाल्या असतां अद्याप हाल मामलेदाराचा आमल दखल होत नाहीं. माजी ॠ मामलेदार जमेत करून ठाणे द्यावयास दिकत करितात म्हणून विदित जाले. त्यावरून हे पत्र लिहिले असे. तरी तुम्ही माजी मामलेदारास ताकीद करून ठाणे बसउन देणे. दिकत केल्यास जमेत देउन उपराळा करून हाल मामलेदाराचा आमल बसे ते करणे. माजी मामलेदारा कडे वसूल न जाय ते करणे. वारंवार येविसी पत्राची प्रतिक्षा न करणे. रा छ * १२ रजब. सुमा समान तिसेन मया व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पो छ २६ रजब माहे मार

पौष वा १३.

[ १४ जनवरी १७९८ ]

---

महादजी शिंदे यांचा भाचा बहिरजी ताकपीर यानें जें बंड १७७६ सालीं केलें त्यांत याचेंही अंग होतें. तें प्रकरण पुढें यावयाचेंच आहे.

लेखांक [ १२४ ]　　श्री ।' म्हाळसाकांत　　* संवत् १८५४ कार्तिक वद्य ३०

[ १८ नवंबर १७९७ ]




राजश्री नारायणराव बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　कासीराव होळकर दंडवत. सुमा समान तिसेन मया व आलफ. राजश्री लक्ष्मण सदासिव राजश्री आली बहादुर याजपासी-[वकीलीस] असतात त्याजला राजश्री कृष्णाजी जगंनाथ याची नेमणूक सा। बूंदी येथे आहे, त्याजपैकी दरसाल च्यारसे रुपये पावत असता तुम्ही च्यार साले यैवज पावता केला नाही. ये न्‍ विषई पूर्वी पत्रे पाठविली आसोन दिकत करिता म्हणोन विदित जाले. त्या वरून हे पत्र सादर केले असे. तरी अतःपर तुम्हाकडे याचा यैवज राहिला आसेल त्याचा देखत पत्र फडशा करणे. याउपरी बोभाट आलिया मर्जीस माननार नाही. जाणिजे छ * २८ जोवल. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ १२५ ]　　श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५४ कार्तिक वद्य ३०

[ १८ नवंबर १७९७ ]




राजश्री लक्ष्मणराव सदाशिव गोसांवी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो　　कासीराव होळकर दंडवत. सुा समान तिसेन मया आलफ. तुम्ही पत्र पाठविले ते पावोन माार अवगत जाला. आसामी संबंधी ताकीदपत्राविसी लिहिले. त्यास सा। माचे मामलेदारास समक्ष ताकीद होऊन पत्रही पाठविले असे. वरचेवर पत्र पाठउन वर्तमान लिहित जाणे. जाणिजे छ * २८ जावल. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब
सुद

पैा छ ३ सावान मुा नजीक चरखरी.

[ २१ जनवरी १७९८ ]

---

लेखांक [ १२६ ]   श्री ।' म्हाळसाकांत   * संवत् १८५४ माघ वद्य ८
[ ८ फरवरी १७९८ ]




राजश्री बाळकृष्ण वासुदेव कार
संस्थान बूंदी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा   कासीराव होळकर दंडवत. सुमा समान तिसेन मया आलफ. राजश्री मल्हारराव गोविंद निाा सरकार याजकडे मोजे झर ताो खिलोरे संस्थान मजकूर हा गांव इनामी पेशजीपासोन सरकारातून आहे. तेथील सनदाआन्वये वहिवट चालत आल्याप्रमाणे उपद्रव कोणेविसी न लागता चालली पाहिजे यास्तव हे पत्र सादर केले असे. तरी तुम्ही माारनिलेकडील गांवास बावगा उपसर्ग कांहीं येक लागो न देता त्याजकडे भोगवट्या प्रो निर्वेध चालून हरयेक प्रकारे उपर करीत जाणे. बोभाट येउ न देणे. जाणिजे छ * २१ माहे साबान. ।' बहुत काय लिहिणे.




---

लेखांक [ १२७ ]   श्री ।' म्हाळसाकांत   * संवत् १८५४ मार्गशीर्ष शुद्ध ११
[ १८ दिसंबर १७९८ ]




राजश्री राज आलमसिंगजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा   कासीराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. साा कोटे येथील मामल्याचा जाबसाल मातबर पाठउन करावा हे तुमचे मनात येउन राा बिरधीचंद हीरानंद यास तुम्ही माार लिहिला. तो त्याचे विनंती केल्यावरून साकल्य ध्यानास आला. यैसियासी या जाबसालास बहुत दिवस जाले. यैवज सरकाराचा मुबलग घेणे. येविसी महेश्वरचे मुकामी सेक हबीबउला येउन बोलत गेले. परंतु ताळा पडला नाही. आलीकडे पत्रे ही लिहिली असता दिनावधी तुम्हाकडूनच लागली. प्रस्तुत सलूख करावा हे तुमचे मानस [ आसे तर ] उतम आहे. याउपरी मातबर पाठविणे तो मुख्त्यार हरयेक बोलण्यास तुमची

प्रतिक्षा न करी आसा [मात्र] योजून पाठविणे. इा ताा तोड निघाला असता तुम्हाकडील मार्गाचे जाबसाल असतील ते विल्हेस लागतील. सविस्तरे मारनिलेसी बोलण्यात आले आहे. [ ते ] लिहितील. राा छ * ९ रजब. सुमा तिसा तिसेन मया आलफ. बहुत काय लिहिणे हे विनती.




पैाा छ ५ माहे साबान.
[ १२ जनवरी १७९९ ]

---

लेखांक [ १२८ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ वैशाख शुद्ध १४
[ १८ मे १७९९ ]




राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा कासीराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ आवगत जाला. ' राजश्री यशवंतराव होळकर यानी माळव्यात आमला फैला करून हाडोतीकडे राह धावया [च्या] इरावात आहेत. साा पूर्वीपासोन सरकार लक्षी हामेशा गौरवरदास्त होत आली त्या प्राा पुढे जाले पाो' म्हणोन लिहिले. ' त्यास प्रस्तुत चिरंजीव राा यशवंतराव होळकर यानी माळव्यात बखेडा केला, पुढे इरादा हाडोतीचा करीत आहे यामुळे तुम्ही सरकार लक्ष सोडाल हे घडावयाचेच नाही. येविषई परिहार लिहिण्याचे प्रयोजन काय ! सरकारातून संस्थानचे संरक्षणाविसी ⟅ कायेमी आहे तेच आहे. दुसरे व्हावयाचे नाही. प्रस्तुत बखेडा जाला. त्याचा समारोप व्हावा येविषईची पैरवी लागलीच आहे. कदाचित चिरंजीवाकडून आगळीक जाल्यास तुम्ही जुमस न खाता

गजबूत आसोन मामलती पौा येक पैसा त्याजला न देणे. दिल्यास मजरा पडणार नाही. तुमचे उपराळयाविसी राजश्री दौलतराव सिंदे याची पत्रे राजश्री लक्ष्मण[१०२] अनंत [लाड] व बाळोजी इंगळे[१०३] यास घेउन पाठविली आहेत. ते त्याजकडे पाठउन बंदोबस्त राखणे. रा छ * १२ जिल्हेज. सुमा तिसा तिसेन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.




---

(१०२) लक्ष्मण अनंत यासच संक्षेपानें लखबादादा म्हणत असत. [ लेखांक १४३, १४४ ]

(१०३) हा अंबुजी इंगळयाचा धाकटा बंधु होय. याचा वंश हल्लीं ग्वाल्हेरीस असून राई वाले इंगळे या नांवानें प्रसिद्ध आहे. शिंदेशाहींत इंगळे हे सरदार असून राई हा महाल त्यांजकडे इनाम असल्यामुळें वरील नामाभिधान प्राप्त झालें आहे. [ ताजा. भाग १ पान २९१ ]



# श्रीमंत यशवंतराव होळकर
## यांचा असल पत्रव्यवहार.

१८५६ तें १८६८ विक्रमी.



लेखांक [ १२९ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ चैत्र शुद्ध १

[ ६ अप्रेल १७९९ ]




राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. पाा पाटण श्री केशोरायेजीचे येथील मामलत राजश्री कासी कृष्ण व यादवराव व्यंकटेश याजकडे होती. आलीकडे मारनिलेकडील मामलत तगीर करून राजश्री त्रिंबक दिनकर याजकडे पाा मजकूर येथील जप्ती सांगून हे पत्र तुम्हास लेखन केले असे. तरी पंत मारनिले पाा मजकूरास आल्यावर महाली अमल बसवितील. माजी मामलेदार[ ने ] हरामखोरी केल्यास नवीन मामलेदारास सामल होउन मारनिलेचे पारपत्य करून महाली ठाणे बसउन गावगाना बंदोबस्त करून आमल सुरलितपणे चाले तो अर्थ करणे. ।' रा छ * २९ माहे सवाल. सुा तिसा तिसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.




बार

लेखांक [ १३० ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ वैशाख शुद्ध ४

[ ९ मे १७९९ ]

० श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री लालाजी बलाळ कामदार

नि।। हिसेदार सिंदे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो।। यशवंतराव होळकर दंडवत. सु।। तिसा तिसेन मया व आलफ. पा। बूंदी येथील जप्तीस सरकार हिशाचे राजश्री भजा [?] पा। आहेत तरी मा।रनिले सरकार हिशाचे कामाची वहिवट करतील. तुम्हाकडील खूळ उभे करून सरकार नुकसानी करिता त्यास तुम्हाकडील हिशा जो आहे तेथील बंदोबस्त करणे. आम्हाकडील मामलेतीत तुम्हास समंध नाही. इतःपर मामलतसंबंधी फितुर ꣸ जाल्यास नीट नाही. याजकरि [ता] तुमचे हिशाचे काम तुम्ही करून सरकार हिशाचा बंदोबस्त मा।रनिले करतील. जाणिजे छ * ३ ।' माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

पै।। छ ४ मोहरम सुमा मयतेन
[?] मया व आलफ.
[ ९ जून १७९९ ]

---

लेखांक [ १३१ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ वैशाख शुद्ध ११

[ १५ मे १७९९ ]

श्री ०
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंग झाले

संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो।। यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. पा। पाटण श्री केशो रायेजीचे येथील जप्तीचे काम सांप्रत सरकारातून राजश्री त्रिंबक दिनकर याजकडे सांगोन रवानगी केली. ते महाली गेलियावर माजी मामलेदारानी जमेत जमा करून ठाणे न देता माणसे जाया केली. महालात बखेडा होउन सरकार नुकसान होत आहे म्हणोन विदित जाहले. येसियासी त्यांचा उफर होउन बंदोबस्त ꣸ केला पाहिजे यास्तव हे लेखन केले असे. तरी तुम्ही पो। मा।रीहून जप्तीकडील कारकून मा।रनिले लिहितील त्यान्वये त्याचा उपराळा करून माजुलाकडील बेदा तुटून ठाण्यासुधा स्वाधीन करून

देउन कामकाज सुरलीत चाले असे करणे. ।' रा छ * ९ माहे जिल्हेजे. सुा तिसा तिसेन मया व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

लेखांक [ १३२ ]

श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ जेष्ट शुद्ध ९
[ १२ जून १७९९ ]

० श्री ~
म्हाळसाकात
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री लालाजी बल्लाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे विशेष. पेशजी तुम्हाकडून पत्रे आली त्यात राजश्री राज जालमसिंग झाले संस्थान कोटे याजकडील पूर्वरीतीने सरकार लक्षास जपण्याचे भाव लिहिण्यात आले. त्यास पेशजीपासोन संस्थानिकाचे निखालसतेचे चालीवर सरकातून व्यंग न होता निभावणी जाली. पुढे कोणेविसी दुसरा अर्थ न घडता पूर्वरीतीप्रमाणे घडल्यात येईल. तूर्त सरकारात यैवजाची निकड संस्थानिकाकडून फडशा होणे राहिला आहे ते पक्षी त्यानी प्रसंगास काहीयेक व्यंग होउन न पावता उपयोगी पडेल अशीच योजना करून ठेविली आसे[ल.] जाबसालात तुम्ही आहा त्याअर्थी ऱ्ह सरकारात व त्याजकडे चांगले तेच घडल्यात येईल. सविस्तरे बोलण्याचे भाव महंमद नूर खान सांगतील ते समजून त्यान्वये त्यासी बोलून घडल्यात येईल तसे उगउन लिहिणे. ।' रा छ * ७ माहे मोहरम सुा मयातेन व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ १७ माहे मोहरम साल मार.
[ २२ जून १७९९ ]

लेखांक [ १३३ ]

श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५६ श्रावण बद्य ६
[ २१ अगस्ट १७९९ [

० श्री ~
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंग झाले
संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम

विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. संस्थान बूंदी येथील सरकारी अमलाचे मामलतीचे काम सरकारातून राजश्री कृष्णराव चिमणाजी याजकडे सांगोन तेथील बंदोबस्तास त्याजकडील कारकून व महंमद नूर खान पठांण या [स] जमेत सह पाठउन आला[हि]दा सनदापत्रे दिल्हेच आहेत. त्याअन्वये वडले पाहिजे यास्तव हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही मारनिलेकडील कुल दखलगिरीस काही येक संस्थानी खलल होउ लागल्यास उफराळा हरयेकविसी लिहित जातील तसा करून काहीयेक वेध न होता आमल सुरलीत चालून वहिवाट चालत आली तसी घडे असे करणे. तेथील बंदोबस्तामुळे मागाहून स्वार माणसाची र न्हे वानगी होईल त्याजला [ मुकुंद ] दुप्यात वगैरे अटकाव न होता जातील असा बंदोवस्त करून देवणे. ॥ रा छ * १९ रबिलावल. सुा मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ २ रबिलाखर सन मयतेन
भाद्रपद शुा ४
[ ३ सिंतबर १७९९ ]

बार

---

लेखांक [ १३४ ] श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५६ श्रावण वद्य ६
[ २१ अगस्ट १७९९ ]

० श्री ०
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री ल्लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. संस्थान बूंदी येथील संस्थानिकाकडून खलल जाल्यामुळें तेथील सरकारी अमलाचे मामलतीचे काम सरकारात् राजश्री कृष्णराव चिमणाजी याजकडे सांगोन बंदोबस्तास त्या जकडील कारकून महमद नूर खान यास जमेतसुधा रवाना करून हे पत्र लेखन केले आसे .तरी तुम्ही मारनिले कडील हरयेकविसी उफार ठेवीत जाउन महालात दखलगिरी होउन दिकत न पडता आमल सुरळीत चालेल असे करणे. मधी संस्थानिकाकडून वगैरे दिकत होऊ लागल्यास

जरब देऊन वहिवट चालऊन देवणे. ॥ रा ॥ छ * १९ रविलावल. सुा मयातेन व अलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पा छ ३ माहे रविलाखर
भ. सु. ५ बुधवार.
[ ४ सितंबर १७९९ ]

बार

---

लेखांक [ १३५ ]    श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५६ भाद्रपद शुद्ध ८
[ ७ सितंबर १७९९ ]

श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंग झाले
संस्थान कोटे गोा यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जावे विशेष. संस्थान बूंदी येथील कोठड्याकडे स्वारी बाबत घांस दाण्याचा यैवज हमेशा स्वांरी येती तेव्हा येत असतो त्याप्रमाणे हली वराता करून यैवजाचे वसूलास स्वार पाठऊन हे पत्र तुम्हास लेखन केले असे. तरी तुम्ही कोणाचा पक्ष न करिता सर्वास ताकीद करून वरातीप्रमाणे यैवजाचा निर्गम होय ते करणे. ॥ रा छ * ६ रबिला ॥ खर. सुा मयातेन अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ १३ जाावल सन मयातेन व अलफ.
[ ६ अक्टुबर १७९९ ]

---

लेखांक [ १३६ ]    श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५६ भाद्रपद वद्य ८
[ २२ सितंबर १७९९ ]

श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंग झाले
संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. संस्थान सोपार येथे

सरकारी मामल्याचा यैवज घेणे व संस्थान बूंदी येथील कोठड्याकडे नजराणियाचा यैवज पेशजीप्रमाणे येणे व बूंदीकरानी सरकार आमलात मनमाने तसा बखेडा करून जबरदस्तीने यैवज घेतला तो माघारे द्यावयाचा [ असे ] करारात आले आहे त्यासुधा दरोबस्त भाई[१०४] दुधरनेक फरासीस याजकडे देवउन अल[हि]दा वराता करून दिल्ह्या आहेत त्याप्रमाणे झाडवाकीनिसी जलद पावला पाहिजे. यास्तव फरासीस याची रवानगी करून हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही माारनिले वराता वगैरे कागदपत्र घेउन सरंजामसुधा तिकडे आलियावर माहितगिरीने कोठेही दिकत पडून न पावता ऱ्हे सर्व प्रकारे त्याजला आनकूल राहून झाडून यैवज दिवसगत न लागता जलद पावता होउन सरकारी नक्ष राहून याजकडील बोभाट येउ न पावे असे करणे. ॥ रा छ * २१ रबिलाखर. सुाा मयातेन व अलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

बार. पौ छ १३ जाावल मयतेन व आलफ.

[ १३ अक्टुबर १७९९ ]

---

लेखाक [ १२७ ] श्री ॥ म्हालसाकांत * संवत् १८५६ मार्गशीर्ष वद्य १४

[ २५ दिसंबर १७९९ ]

श्री
म्हाळसाकां
त चरणी तत्पर
तुकोजि सुत य
शवंतराव हो
ळकरम
१०५

राजश्री लालाजी बलाल गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. तुम्हाकडील माार राजश्री बाळाराम आगरवाले याचे लिहिल्यावरून सर्व समज-

---

(१०४) दुदरनेक [ Dudrenec ] फरासीस यास 'भाई' हें जें विशेषण लाविलें आहे त्यावरून होळकरशाहींत त्याची महती काय होती हें स्पष्ट कळतें. शिंदेशाहींतील राणेखां 'भाई' प्रमाणेंच होळकरशाहींतील हें दुसरें उदाहरण होय. पण त्यांत भेद एवढाच कीं रानेखांप्रमाणें दुदरनेकाचे अंगीं पात्रता मात्र नव्हती.

(१०५) सितंबर १८०४ पासून यशवंतराव होळकरांनीं आपले नांवें 'सिक्कामोर्तब' चालविलें. [ लेखांक १५१,१५५ ] त्यापूर्वी खंडेराव होळकरांचेंच 'सिक्कामोर्तब' ते वापरित असत. [लेखांक १२९ ते १५०] अर्थात् वरील पत्राचें वर्ष १८०४ च्या मागें जाऊ शकत नाहीं. असल पत्रांत 'सित' किंवा 'सबा' मयातेन व अलफ असें असावयास पाहिजे. तथापि पत्राधारेंच वरील वर्ष दिलें आहे तें मात्र विश्वसनीय नाहीं.

ण्यात आला. त्यास तुमचे लक्ष पहिल्यापासून सरकारनक्ष ठेउन ज्या गोष्टीने सरकार किफायत तो आर्थ करून दाखवावा ते पक्षी भरवसाच आहे. विस्तारे ल्याहावे यैसे नाही. सविस्तरे बालाराम याजला लिहिण्यात आले आहे त्यावरून कळेल. ॥ रा छ * २७ ऱ्हु रजब. सुरसन मयातेन व अलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ ६ साबान सन मजकूर.
[ २ जनवरी १८०० ]

---

लेखांक [ १३८ ]     श्री ॥ म्हाळसाकांत     * संवत् १८५६ पौष वद्य ८
[ १८ जनवरी १८०० ]

० श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ आवगत जाला. 'राजश्री जगनाथराम[१०६] [केरकर] व लक्ष्मण आनंत [लाड] यासी आपले प्रकरणी बहुत निखालसतेची बोलणी होउन त्यानी आपल्यास पत्रे लिहिली आहेत त्यावरून ध्यानास येईल. देसी पत्रे यांची वारंवार जातात. महालचे बोभाट गेल्याने याचे लिहिण्यास बाध न पडे ते घडावे' म्हणोन विस्तारे करून लिहिले. यैसि यासी 'उभयेताचे व तुमचे पकेपणे बोलणे होउन पत्रे येतात ऱ्हु याआर्थी संशये राहावा असे नाहीं. तिकडील महालास उपसर्ग लागू न देता बचाव करून महेश्वरी दाखल जालो. मशारनिलेचे लिहिण्यास बाध न पडावी या लक्षास जपून कोणे महाली उपद्रव न दिल्हा. मामलेदार उगाच बोभाट लिहितील. त्याजवर मदार नाही. इकडून राजश्री

---

(१०६) जगन्नाथराम केरकर यासच जगोबा बापू असें म्हणत असत. [ लेखांक १४४ ] हा जिवबादादा बक्षी याचा चुलत भाऊ होय. या घराण्याचा बराच पत्र व्यवहार ' जिवाजी बल्लाळ केरकर ' याच्या चरित्रांत आला आहे. त्यासिवाय ' संग्रहात ' व इतरत्र जीं थोडीं पत्रें मिळालीं तीं पुढें येणार आहेतच.

बाळाजी[१०७] आनंत [ पिंगे ] याजला वरचेवर पत्रे जातात. प्रस्तुत त्याचे उतर आले त्यात भाव जे लिहिले आहेत ते समजावे याजकरिता उभयेताकडे त्याची नकल पाठविली आहे, त्यावरून कळल. दोन्ही पक्ष लिहिले आहेत. यात समजावे काये ? जसे करणे असल तैसा येकनिश्चये ठेराउन खचित लिहिले म्हणजे त्याप्रमाणे जपावयास येईल. उभयेता मारनिले व तुम्ही येविषई विचार करून पत्रे जाउन करण्याचा बेत खचित निश्चयात येउन बंदोबस्त घडे ते करावे.' ॥ रा छ २२ साबान. सुा मयातेन व आलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १३९ ] श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५७ चैत्र शुद्ध ४
[ २९ मार्च १८०० ]

० श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंग झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पाउन लेखनार्थ आवगत जाला. 'पा सिरोंज हा महाल राजश्री जगंनाथराम [ केरकर ] व लक्ष्मण आनंत [ लाड ] यानी खेचीकडे दिल्हा. हे वर्तमान येकून उभयतास व आम्हास पत्रे लिहिली होती. तेच पत्रे त्याजकडे पाठउन येथूनही ल्याहांवयाचे ते लिहिले होते. त्या वरून त्यानी आपले पत्राचे उत्तर पाठउन आम्हास पत्र लिहिले आहे. त्याचे नकलेसहित रवानगी केली आहे त्यावरून ध्यानास येईल. त्याचे लक्ष आपल्याविसी तिलप्राय दुसरे नाही. तसेच आपल्याकडूनही असावी. ते व आपण येकविचारे आसोन जेपूर आदि करून मोठाल्या मसलती केल्याने सहजात घडून सरकारनक्ष राहून पैका उत्पन्न होउन फौजेचा निर्वाह चालून कोणेविसी जड पडावे असे नाही' म्हणोन विस्तारे करून लिहिले. यैसियासी 'उभयेताचा खबीर

---

( १०७ ) शिंदेशाहींतील सुप्रसिद्ध मुत्सद्दी बाळाजी अनंत पिंगे उर्फ बाळोबा तात्या पागनीस तो हाच. याचें घराणें शिंदेशाहींत असून हल्लीं त्याच्या तीन शाखा विद्यमान आहेत. [ ताजा भाग १ पान ३९२ ते ४०१ ]

आणि भाउपण यास जपणे हे पाहून बहुत संतोष [ी] आहो. त्यात तुम्हासारखे मध्यस्थ आहेत. तेव्हा कोणतीही गोष्ट जे घडणे ते विचाराचे वाटेनेच होईल हे खातर जमा न्हे आहे. सिरोंजचे वर्तमान येकिल्यावर मनातच ठेविल्याने गुबार वाढून संशयाने संशयाची वृत्ती होती. याजकरिता कागदीपत्री लिहून उत्तरे आणून निखालसता घडत गेल्याने उभयपक्षीही चांगले आहे. आम्हास सर्वप्रकारे भरवसा उभयेताचा त्याच प्रमाणेच त्यांचेही जपणे आहे. तेव्हा दुसरे मनात यावयाचे नाही. खानदेश प्रांती पाा नंदुरबार वगैरे महाली तिकडील पलटनाचा उपसर्ग लागतो [तरी] हे बुध्या तिकडून घडणार नाही. पत्रेही इकडून गेलीच आहेत. तिकडूनही जावी. सारांश दोन्ही दौलतीचा येकोपा असल्याने शत्रुवर जरब राहून सरकारचाकरी घडून फौजेचा ही निर्वाह चालेल हेच लक्ष इकडील आहे. दूसरे तिलप्राय नाही. दौलती दोन्ही देशी बैठक पडल्यामुळे खराबीत आल्या. कोणेही प्रकारे बंदोबस्त घडून यैक्यतेने चालोन उलगडा पडल्याने फार उपयोग आहेत. येविसी इकडून पत्रे जातच आहेत. उभयेताचा व आमचा दूसरा विचार नाही. याजमुळेंही कितेकास अवघड वाटून कोणेही रीतीने आपसात संशये यावे याआर्थी नानाप्रकारे भास भासवितील, लिहितील त्याजवर त्यानी सर्वात्मना जाउ नये. तुम्ही मध्ये आहां. तेव्हां दुतर्फाही वाकडी गोष्ट कदापि घडणार नाही. कोठे कांही दिसू लागल्यास वरचेवर लिहून सावध करीत जाणे. आम्हास देशाचे बंदोबस्ताचा वेध मोठा आहे. येविसी पत्रे जांतच आहेत. उभयेताकडूनही वरचेवर जाउन बंदोबस्त चिरंजीव राजश्री खंडेराव[१०८] [होळकर] याचे नावे घडावा म्हणजे ते व

---

(१०८) तुकोजी होळकर हे १७ जुलै १७९७ रोजीं वारलें. [होइसा १ लेखांक ११५] अहिल्याबाईच्या संमतीनें आपल्या जिवंतपणींच 'जेष्ठ पुत्र काशीराव यास वस्त्रें द्यावी असा बेत होता परंतु कनिष्ठ पुत्र मल्हारराव बिघडले, हिसा मागू लागले.' मनस्वी उपद्याप केले. त्यामुळें 'त्यास कुशलगडचे किल्यांत ठेविलें.' [मदबापत्रें २ उत्तरार्ध लेखांक २५०, २५६, २५८, २५९, २६५ व इतिसंग्रह १४ लेखांक २] अशा प्रकारें गादीविषयीं वाद चालू असतांच अहिल्याबाई व तुकोजी होळकर निवर्तले. काशीरावाचा कायदेशीर वारसा पेशवे व शिंदे यांस मानवला पण तो मल्हाररावास रुचला नाहीं. शेवटीं या लढ्यापायींच त्याचा अंतही झाला. तथापि त्याचा हा अल्पवयी पुत्र खंडेराव यास गादी मिळावी असा जो पक्ष यत्न करीत होता त्यांत यशवंतराव होळकर हे प्रमुख होते आणि एवढ्यासाठींच पहिल्यापासून खंडेरावाचें स्वामित्व पुकारून तें त्याचा सिक्का वापरूं लागले. वस्तुतः मल्हारराव अथवा त्याचा पुत्र खंडेराव हे केव्हांही गादीवर आलेच नाहींत किंवा सुटका करून घेतल्यानंतरही खंडेरावास यशवंतराव होळकरांनीं गादीवर बसविलें नाहीं. होळकरशाहीचीं सूत्रें हातीं घेण्यापुरतेंच हें सिक्याचें सोंग होतें असें निष्पन्न होतें.

आम्ही मिळोन जे मसलत करू ते सहजात शेवटास जाईल. येविसीचे आर्थ सविस्तरे राजश्री बालचंद याचे पत्री लिहिले होते. ते समजून साद्यांत त्यासीही बोलण्यात [आले] आहे सविस्तरे लिहितील.' सर्वदा पत्री संतोषवीत जाणे. ।' रा छ * २ जिलकाद. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

पो छ १८ जिलकाद.
सुमा मयातेन व अलफ
[१३ अप्रेल १८००]

---

लेखाक [ १४० ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८५७ चैत्र वद्य १
[ १० अप्रेल १८०० ]

श्री म्हाळसाकात चरणी तत्पर मल्हारजी सुत खंडेराव होळकर

राजश्री राज जालमसिंग झाले
संस्थान कोटे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. दुदरनेक फरासीस याजला सरकारातून हाती खरीदी करून द्यावयाचा [ठरला] यास्तव हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही मारनिलेस हाती नग येक देउन पावती घेणे. त्याचे किमतीचा यैवज सरकार हिसेबी खर्ची लिहिणे. मजरा पडतील ꣰ ।' रा छ * १५ जिलकाद सुा मयातेन व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

---

लेखांक [ १४१ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८५७ चैत्र वद्य १
[ १० अप्रेल १८०० ]

श्री म्हाळसाकात चरणी तत्पर मल्हारजी सुत खंडेराव होळकर

राजेश्री राज जालमसिंग झाले संस्थान कोटे गो यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणे विशेष. पेशजी सरकारातून फुलण[१०९] फरासीस

(१०९) फुलण हा प्रथम दुदर्नेकाचे हाताखालीं एक सैनिक होता. नंतर त्यानें निराळा कंपू तयार केला. त्याचे खर्चास जावरें व देपालपूर हे महाल त्याजकडे होते. उज्जैनच्या लढाईंत हा शामिल होता. [ होकै. ७९, ८१, ८२, ८४, ९२ ] ' Major Plumet a *Frenchman*

याजकडील संस्थान यैवजी पंनास हजाराची वरात जाली आहे तो यैवज त्याजला सरकारातून दिल्ह्यामुळे वरातीचा भरणा दुदरनेक फरासीस याजकडे लाउन त्याजला सरकारी जाबसाल व मामल्याविसी उगउन लिहिण्यात येउन हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही फरासीस मार सरकार आज्ञेचे भाव सांगतील त्यान्वये जसे लक्ष ठेवीत आला त्याप्रमाणे जपून ज्यात उपयोग घडे ते करून मामल्याविसी घरोब्याचे चालीस व्यंग न पडता, दिवसगत न लागता जलद फडशात येईल तो अर्थ करून फुलण फरासीस याज कडील वरातीप्रमाणे यैवजाचा निर्गम दुदरनेक याजकडे करून देउन पावती घेणे. येविसी वारंवार लिहिणे न पडे असे करणे. † रा छ * १५ जिलकाद सुा मयातेन व अलफ. † बहुत काय लिहिणे हे विनंती

श्री
मोर्तब
सुद

पैा छ ६ जिल्हेज मयातेन व आलफ.
[ १ मे १८०० ]

---

लेखांक [ १४२ ]

श्रीम्हाळसाकांत * संवत् १८५७ वैशाख शुद्ध १३
[ ७ मे १८०० ]

o श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री जगनाथराम [ केरकर ] व
लक्ष्मण आनंत [ लाड ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. तुह्मी छ † २७ जिलकाद चे पत्र पाठविले ते कोट्यास येउन तेथून इकडे आले. ते छ † ९ जिल्हेजी पाउन लेखनार्थ आवगत जाला. ' आपण महेश्वरीहून कूच करून माळवे प्रांती आल्यानंतर

---

*raised* a *body of men* for Jaswant Rao [ Holkar ] in 1798 and was largely insrtumental in winning the *battle of Ujjain*. He deserted on the eve of the battle of Indore. This behavior and Dudrenec's defection made Holkar brand all Frenchmen as '*Dugabaz*'. [ Compton's. Adventurers page 381 ] हें Plumet चें वर्णन फुलणशीं बरेंच जुळते. अर्थात् फुलण हें Plumet चेंच मराठी रूपांतर असलें पाहिजे. हा 'फरासीस' म्हणजे फ्रेंच होता आणि त्याचा संबंध दुदर्नेकाशीं होता असें हें पत्रही सांगतें.

† २२ अप्रेल १८०० † ४ मे १८००

इकडील महाली उपसर्ग लागल याजकरिता यजमान[११०] साहेबानी व राजश्री [बाळोबा] तात्या [पागनीसा]नी पत्रे लिहिली आहेत त्याअन्वये बंदोबस्त आसावा. आपल्याकडील कामाविसी त्याजला काळजी आहेच. आम्हीही वरचेवर लिहितच आहों' म्हणोन विस्तारे करून लिहिले. येसियासी 'आमचे लक्ष पहिल्यापासोन राजश्री दौलतराव सिंदे याजखेरीज नाही. त्याची पत्रे [आम्हीं] महेश्वरी जावे या अन्वये येत गेली. त्यावरून तेथे जाउन तीन मास राहिलो परंतु बंदोबस्ताचा अर्थ कांहींच न घडला. फौजेचा खर्च भारी, निर्वाह चालला पाहिजे याजकरितां तेथून कूच करून माळवे प्रांती आलो. तिकडील महालास [तिल]प्रायेही उपसर्ग दिल्हा नाही व पुढेही द्यावयाचा नाही. इकडील बंदोबस्ताविसी त्याजला काळजी आहे आणि आपली पत्रे वारंवार जातात त्याअर्थी विस्तारे ल्याहावेसे नाही. जेणेकडून बंदोबस्त सत्वर घडून सरकारचाकरी होउन आपला उपयोग घडे ते करावे.' सर्वदा पत्री संतोषवीत जावे. †' रा छ * १२ जिल्हेज सुा मयातेन अलफ. हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १४३ ]

श्रीम्हाळसाकांत * संवत् १८५७ वैशाख शुद्ध १३
[७ मे १८००]

श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री दौलतराव[१११] सिंदे गोसावी यांसि.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित असावे विशेष. आपल्याकडून छ † १० माहे जिलकादचे पत्र आले ते राजश्री जगनाथराम [केरकर] व लक्ष्मणे आनंत [लाड] याजकडे जाउन तेथून कोट्यास येउन इकडे रवाना जाले [ते] छ ९ ↑ माहे जिल्हेजी पाउन लेखनार्थ अवगत जाला. 'महेश्वरीहून माळवे प्रांती कूच करून

---

(११०) दौलतराव शिंदे. † ५ अप्रेल १८०० ↑ ४ मे १८००

(१११) हें पत्र दौलतराव शिंद्यांस मिळालें नसावें. कारण होळकरांविषयीं मनांत 'कल्प विकल्प' येऊन लालाजी गुलगुले किंवा त्याच्या वतीनें इतर कोणी होळकरांच्या 'भेटीस' गेला नाहीं. [लेखांक १४७, १४८, १४९] अर्थात् पत्रावर भिस्त ठेवून तें शिंद्यांकडे लालाजीनें पाठविलें नाहीं म्हणूनच आज प्रत्यक्ष 'संग्रहांत' पाहावयास मिळतें.

गेला. इकडील महाली दंगा करणार त्यास आजपर्यंत तुमची पत्रे येत गेली त्याजवर इकडीलही लक्ष असता असे ऱ्ह प्रकार घडल्याने नीट नाही. महाली उपसर्ग न लागे ते करावे ' म्हणोन लिहिले. येसियासि आमचे लक्ष पहिल्यापासोन आपल्याखेरीज नाही. आपली पत्रे येत गेली त्यावरून महेश्वरी येउन तीन मास राहिलो. बंदोबस्तचा अर्थ कांहीं न घडला. फौजेचा खर्च भारी निर्वाह चालला पाहिजे याजकरिता महेश्वरीहून कूच करून माळवे प्रांती आलो. आपल्याकडील महालात मागे उपसर्ग दिल्हा [ नाही ] व पुढेही द्यावयाचा नाहीं. आम्ही सर्व प्रकारे आपले भरवसियावर असो. दौलत खराबीत बहुत आली. जसे आपले आभये आहे त्याप्रमाणें बंदोबस्त सत्वर घडे ते करावे. इकडून आपले लक्षा वेगळें कांहीं घडावयाचे नाही. सर्वदा पत्री संतोषवीत असावे. रा छ * १२ जिल्हेज सुा मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १४४ ]      श्री ।' म्हालसाकांत * संवत् १८५७ वैशाख शुद्ध १३
[ ७ मे १८०० ]

o श्री
म्हाळसाका
त चरणी तत्पर
मल्हारजी सुत
खंडेराव होळ
कर

राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. तुम्ही छ † २ जिल्हेजचे पत्र पाठविले ते छ † ९ माहे मिनहूस पाउन लेखनार्थ आवगत जाला. आपले नावची पत्रे देसीहून राजश्री जगोबा बापु [केरकर] व लखबा दादा [लाड] याजकडे आली ते त्यानी आपल्याकडे पाठउन आपले नावेही पत्र लिहिले ते येथें ऱ्ह पोहचून तिकडे रवाना केली आहेत. पावतील. त्याप्रमाणें घडल्यात येउन त्याचे महालचे बोभाट न गेल्यात फार उपयोगी आहे म्हणोन विस्तारे करून लिहिले. येसियासी तुमचे लिहिल्याप्रमाणें राजश्री दौलतराव सिंदे व बाळाजी अनंत [ पिंगे ] व उभयेता मारनिलेचे पत्र पाउन अर्थ समजला. त्याची उत्तरे अलाहिदा पाठविली आहेत त्यावरून कळेल. पुढे रवाना करावी. सारांश आम्हास सर्व प्रकारे त्याचे लक्षाखेरीज कांही कर्तव्य नाही. तेव्हां त्याचे महालास उपसर्ग

---

† २७ अप्रेल १८००      † ४ मे १८००

द्यावा हे कसे घडेल ! त्याजकडील महाल ते इकडील जाणोन मागे उपद्रव दिल्हा नाही व पुढेही द्यावयाचा नाही. सर्वदा पत्र पाठउन संतोषवीत जावे. ॥ रा छ * १२ जिल्हेज सुा मयातेन व आलफ. ॥ बहुत काय लिहिणे ꣲ हे विनंती. श्री मोर्तब सुद

---

लेखांक [ १४५ ] श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५८ आषाढ शुद्ध १५

[ २५ जुलै १८०१ ]

श्री म्हालसाकांत चरणि तत्पर मल्लारजि सुत खंडेराव होळकर

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसी.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम. सुमा इसने मयातेन व आलफ. प्रगणे बूंदी व प्रगणे पाटण प्रगणे सिंगोली प्रगणे रतनपुर खेडी व प्रगणे निमथूर म्हैसोदे हे पांच[११२] महाल तुम्हाकडेस आहेत. त्याचा घासदाण्याचा ठराव राजश्री शामराव महाडिक याचे विद्यमान रुा २५००० सदरहू पंचवीस हजार तुम्हाकडील महालसंबंधी समजून घेतला असे. खातरजमा राखून महालचा बंदोबस्ती व आबादी करणे. आम्हाकडून ꣲ कोणे गोष्टीचा उपसर्ग तुमचे महालासी लागणार नाही. रा छ * १३ माहे रबिलौवल. बहुत काय लिहिणे ꣲ हे विनंती. श्री मोर्तब सुद

बार

---

लेखांक [ १४६ ] श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८५८ माघ शुद्ध ८

[ १० फरवरी १८०२ ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर मलहारजी सुत खंडेराव होळकर

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुमा इसने मयातेन व आलफ. तुम्हाकडील बोलण्याचे भाव राजश्री बालचंद शेवाराम [शेट] यानी लिहून कळविले. येसियासी तुम्ही जुने माणूस पाहिले [ऐकिले] फार. त्यास दोन्ही

---

ꣲ हस्ताक्षर यशवंतराव होळकर.

(११२) हे पांची महाल हल्लीं शिंदेशाही जिल्हे मंदोसरांत मोडतात.

सरदारीत कलह लागोन बखेडे वाहडल्यात अर्थ कसे आहे तयाचा विचार तुम्हा सारख्यानी न करावा हे काय ? तुम्ही दोन्ही सरकार येकच मोजून उचितास जपावे हेच या दिवसात योग्य आहे. त्यातही इकडून दुसरा अर्थ किमपि न जाणावा. राजश्री नागो जिवाजी व बालचंद शेवराम बोलतील त्याप्रमाण खातरजमा राखोन ज्यात उपयोग ते करणे. जाणिजे छ * ६ सवाल. बहुत काय लिो.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १४७ ]     श्री म्हाळसाकांत     * संवत् १८५८ माघ वद्य ६
[ २३ फरवरी १८०२ ]

० श्री ०
म्हाळसाकांत
चरणी तत्पर मलहा
रजी सुत खंडेरा
व होळकर

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो     यशवंतराव होळकर दंडवत. सुमा इसने मयातेन व अलफ. 'स्वारी या प्रांती आलियावर तुम्हाकडील कोन्ही स्वारीत आले नाही. गुदस्ता शामराव महाडिक याच्या बोलण्यावरून व सरदाराच्या वाकड्यावरून तुमचे चित्ती संदेह आला' म्हणोन परस्परे कलल्यात आले. त्यास 'इकडील तुम्हाविसी आजपावेतो दुसरा अर्थ नाही. वरकड कितीक घरगूती राजश्री बालचंद सेठ यासी बोलणी जाली आहेत ते तुम्हास बोलतील. त्या प्रा अमलात आणावी. रा भास्कर आनंत याजकडील कारकून आले. सविस्तर बोलतील.' जाणिजे छ * १९ सवाल. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १४८ ]     श्री म्हाळसाकांत     * संवत १८५८ माघ वद्य ९
[ २६ फरवरी १८०२ ]

० श्री ०
म्हाळसाकांत
चरणी तत्पर मलहा
रजी सुत खंडेरा
व होळकर

राजश्री राज जालमसिंगजी झाले गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो     यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. 'राजश्री बा[ल]चंद सिवराम यासी कितेक अर्थ बोलून तुम्हाकडे पा. त्याची

भेट होउन [अर्थ] समजल्यात आले असतील. पहिलेपासून आजपावेतो तुम्हाविसी दुसरा आर्थ जाला ना होणार. हाली राजश्री नागो जीवाजी याची रवानगी करून हे पत्र लेखन केले असे. तरी मनात कोणेविसी कल्पविकल्प न ठेविता मारनिले बोलतील ते समजून खातरजमा राखून ~~ इकडील जाबसालात लांबण येका दिवसाची न करिता सत्वर गुंते उरकून देउन मारनिले आदिकरुन सर्वांची रवानगी करावी.' ।' रा छ * २२ सवाल. बहुत काय लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १४९ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत १८५८ माघ वद्य ९

[ २६ फरवरी १८०२ ]

० श्री ०
म्हाळसाकांत
चरणी तत्पर मलहा
रजी सुत खंडेरा
व होळकर

राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुमा इसने मयातेन व आलफ. 'तुम्हाकडील इकडे स्वारी आल्यावरी कोन्ही आले नाही. अस्तु. तुम्हाविसी सरकारातून दुसरा अर्थ ~~ नाही. राजश्री नागो जीवाजी बोलतील. ज्यात सरकार उपयोग तेच तुम्हाकडूनही करण्यात येईल.' जाणिजे छ * २२ सवाल. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

पैा छ २३ माहे मजकूर.
सुमा इसने मया व आलफ.
[ २७ फरवरी १८०२ ]

---

लेखांक [ १५० ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८५८ माघ वद्य १३.

[ २ मार्च १८०२ ]

० श्री ०
म्हाळसाकांत
चरणी तत्पर मलहा
रजी सुत खंडेरा
व होळकर

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुा इसने मयातेन व अलफ. वो राजश्री पूर्णपात्री बाबा श्री माहायात्रा करून उजनीस जातात. त्यास तुम्हाकडून स्वहस्ते परहस्ते याची संभवना घडून पुढे जाणे घडावे या

करिता हे पत्र सादर केले असे. तरी तुम्ही उचितास जपून यास मार्गस्त करावे. ल्ह बाबानी तुम्हाकडील वर्तमान साद्यंत सांगितले. त्यास इकडील कोणेविषई संशय किमपि न धरावा. ॥ जाणिजे छ * २६ सवाल. बहुत काय लिा.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १५१ ] श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८६१ भाद्रपद वद्य १२
[ ३० सितंबर १८०४ ]

श्रीलक्ष्मीकांत
शाह आलम बादशाह गाजी
का फरजंद अरजुमंद बहादरुल
मुल्क जुबदतुल उमरा महा
राजाधिराज राजराजेश्वर जश
वंतराव होळकर सुबेदार आली
जाह नुसरत जंग बहा
दर

११३

राजश्री वासुदेव रघुनाथ काार पाा पाटण
श्री केशवरायेजीचे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुा खमस मयातेन व अलफ. वेदमूर्ती राजश्री आमरकृष्ण जोशी सुरुंजकर याजला सरकारातून पाा मजकूर पाौ मौजे निमोदा हा गांव साल मजकूरी धमार्थ लाउन देउन सनदापत्रे वर्तमान भावी वगैरे [चे नांवें] करून दिल्ही त्याप्रमाणे वहिवट मारनिलेची व्हावी. तो साल मारी पाा मार येथील मख्ता तुम्हाकडे ठराउन महाल लाउन दिल्हा. गांव सनदेप्रमाणे जोशीबाबाकडे चालू न होय याजकरिता स्वारीत मथुरच्या[११४] मुकामी आले. तेव्हां मोजे मजकूरचा यैवज तुमचे मख्त्यात मजरा देउन गांव जोशीबाबा ल्ह कडे चालवावा असे ठराउन हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही मोजे मार येथील साल मारचा यैवज जमेत वजा घालून गांव पेशजीच्या सनदेप्रमाणे मारनिलेकडे दुमाला करून

---

(११३) यशवंतराव होळकर यांनीं या वेळीं आपला स्वतंत्र सिक्का चालू केला. अजंठ्याच्या लढाईनंतर शिंद्यांची ‘ वकील मुतलकी ’ गेली ती पुन्हा स्थापित करून मोगल दरबारीं आपलें वर्चस्व राखावें या हेतूनें हा सिक्का होळकरांनीं ‘ फरजंदे शाह आलम बादशाह गाजी ’ या नांवानें धारण केलेला दिसतो. पण हा त्यांनीं लवकरच सोडला व दुसरा मराठी सिक्का स्वीकारिला. [लेखांक १५५] मोठ्या सिक्यांतील अक्षरें फारसी किंवा मराठी नसून शुद्ध हिंदी आहेत. ती अनंत नारायण भागवत यास पूर्णपणें उमगल्याचें दिसत नाहीं. [ होइसाधनें खंड १ पूर्वार्ध लेखांक ८६ ]

(११४) श्रीमथुरा.

देउन साल मजकूर यैवजी वसूल घेतला असेल तोही मावारे देउन खर्ची लिहिणे. चौकसीने समजून गांवचा यैवज हिसेबी मजरा दिल्हा जाईल. याचे कामाविषई पुन्हा लिहिणे न पडे ते करणे. जोशी मार याजला कस्बे मारी राहावयास जागा देविली आहे त्यास सरकारची जागा इमल्यासहित, [जे]थे बालाजी गुणाजी राहात होते ते जागा, देउन हरयेकविसी गौर बरदास्त करणे. जाणिजे. छ * २५ जाखर. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

बार

---

लेखांक [ १५२ ]    श्री ।ै म्हाळसाकांत * संवत् १८६१ आश्विन शु॥ ५
[ ९ अक्टुबर १८०४ ]

श्रीलक्ष्मीकांत
शाह आलम बादशाह गाजी
का फरजंद अरजुमंद बहादरुल
मुलक जुबदतुल उमरा महा
राजाधिराज राजराजेश्वर जश
वंतराव होलकर सुबेदार आली
जाह नुसरत जंग बहा
दर

राजश्री वासुदेव रघुनाथ कामदार
संस्थान बूंदी वगैरे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुा खमस मयातेन व आलफ. आली साहेब सिलेदार थोक निा लाला भवानीशंकर याज कडील अमीनुदीन सिलेदार याजला तिकडून स्वारी आली तेव्हां जखमी सबब कोट्यास रा लाला भवानीशंकर याचे वाड्यात ठेविले आहेत. त्याजला स्वारीत येण्याविसी ठराऊन हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी आमीनुदीन सिलेदार याजला बाा मुा ऐवजी स्वारी खर्चास
३०० रुपये.

येकूण तीनसे रुपये तुम्हाकडून देविले असेत. तरी सदरहू तीनसे रुपये संवस्थान मार ॠ येथील येवजी सालमसाई खर्च देऊन मारनिले मार्गाचा जाप्ता रा राज जालमसिंग याजकडून जाप्ता देवउन वाटेचा बंदोबस्त करून स्वारीत मथुरे प्रांती पावते करून देणे. ।ै जाणिजे छ * ४ रजब. ।ै बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

लेखांक [ १५३ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६१ मार्गशीर्ष शुद्ध २

[ ४ दिसंबर १८०४ ]

सिक्का मोठा नकल

राजश्री वासुदेव रघुनाथ

कमाविसदार संस्थान बूंदी गो यासि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुमा खमस मयातेन व अलफ. राजश्री राजाराम गिरे सावकार याजकडे रूा १०००० दहा हजार तुम्हाकडून देविले असे. तरी सदरहू दहा हजार रूा देउन पावती घेणे. या कामास दिवसगत येकरूप न लावणे. सविस्तार चिरंजीव राजश्री रघुजी होळकर [?] सांगता कळेल. जाणिजे छ * ३० साबान. बहुत काय लिहिणे माा.

---

लेखांक [ १५४ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८६२ जेष्ठ शुद्ध १

[ २९ मे १८०५ ]

श्रीलक्ष्मीकांत
शाह आलम बादशाह गाजी
का फरजंद अरजुमंद बहादरुल
मुलक जुबदतुल उमरा महा
राजाधिराज राजराजेश्वर जश
वंतराव होल्कर सुबेदार आली
जाह नुसरत जंग बहा
दर

राजश्री वासुदेव रघुनाथ कमाविसदार

संस्थान बूंदी पाटण व लाखेरी गो यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुमा खमस मयातेन व आलफ. तुम्हाकडे संस्थान व पो मार येथील मामलत साल मजकूरी होती [ते] पेष्तर साल सन सित संवत १८६२ चे अवल सालापासोन दूर करून राजश्री बाजीराव बापूजी याजकडे सांगून हे पत्र तुम्हास सादर केले आसे. तरी तुम्ही साल मार आखर साल पौ आमल करून कचा हिशेब जमीदाराचे दाखल्यानसी सरकारात समजाउन देउन पेष्तर सालचे अवल तारीखीपासून महाली कोणेविषई दखलगिरी न करिता संस्थान व महाल ~~ ची ठाणी मारनिल्हेच्या जिमेस करून देउन कबज घेणे. जाणिजे छ * २९ सफर. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

बार.

---

लेखांक [ १५५ ]                श्री ।ᐦम्हाळसाकांत   * संवत् १८६२ जेष्ट शुद्ध १३
[ १० जून १८०५ ]




राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो     यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. वेदमूर्ती राजश्री आमरकृष्ण जोशी सिरोजकर याजला सरकारातून पो पाटण श्रीकेशोरायेजी येथील गांव मोजे निमोदा धर्मार्थ दिल्हा आहे. तेथील साल मारी यैवज खरीफ रबीचा दरोबस्त घेउन मारनिलेस सांगितले की राजश्री हरनाथसिंग [होळकर] यानी गांवचा वसूल नेला. त्यास चिरंजीव धर्मार्थ गांवचा येक पैसा ᐦ नेणार नाही. कदाचित गैर समजून नेला असला तर त्यास सरकारातून ताकीद होउन यैवज देण्याचा आगाध काये ! त्याजलाही परभारे येविषई लेखनार्थ येउन हे पत्र तुम्हास लिहिले असे. तरी तुम्ही जोशीबाबा याचे गांवचा यैवज व गल्ला वगैरे जो वसूल साल मजकूर बाबत बाजवी नेला आसेल तो पत्र पावताच जोशीबाबास माघारी देउन पावती हुजूर पाठवणे. या कामास मुजरद हलकारा पाठविला आहे. याजबराबर पावती पाठउन देणे. पुन्हा याचे गावांस काडीमात्र उपसर्ग न लाविता हरयेकविसी उफल ठेवीत जाणे. जोशी बाबाचे गांवचा वसूल कदाचित गैर समजून चिरंजीवाने नेला असला तर चिंता नाही. जो नेला असेल तो तुम्ही द्यावा. तुम्हास हिसेबी मजरा पडेल. ᐦ रा छ * १२ रबिलावल. सुा सितन मयातेन व आलफ. ।ᐦ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

लेखांक [ १५६ ]           श्री      * संवत् १८६३ चैत्र शुद्ध १४
[ ९ अप्रेल १८०६ ]




राजश्री बाळकृष्ण वासुदेव कादार
पाा पाटण वगैरे गोा यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो     यशवंतराव होळकर दंडवत. सुमा सित मयातेन व आलफ. पाो मजकूरचा वगैरे येवज तुम्हाकडून सरकारात येणे तो राजश्री बाळाराम आगरवाले यानी समजून घेतला

सो

१५७८७॥ जेष्ट सुध प्रतिपदा शके १७२८ या मितीने बालाराम याजकडे जमाखर्च करून दिल्हे बा मानिलेची याद. रुा

१३००० पो पाटण येथील वसूल इंग्रजाकडे जाउन बाकी उन्हाळू पैकी राहिली त्या बा हिशाचे

२७८७॥ तुम्हापासोन नजरदाखल घेणे ठराविले वी आगरवाले रुा

१५७८७॥

ता

२२२॥ संस्थान इंद्र[गड]पैकी राजपुरा निमसराव संस्थान खातोली वगैरे सरकारी आम[ल] येवजी आदमासे घेतले सदरहू येवजाची चिठी इंग्रजाची आणून द्यावी ऐसा करार त्या बा रुा

१८०००

येकुण आठरा हजार तुम्हाकडून आले. सदरहू आठरा हजार तपसीलवार चिरंजीव राजश्री हरनाथसिंग [होळकर] याचे स्वारीकडे जमा असे. जाणिजे छ * १२ मोहरम. बहुत काय लिहिणे.

श्री मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [ १५७ ] श्री * संवत् १८६३ वैशाख शुद्ध ३

[ २१ अप्रेल १८०६ ]

श्री म्हाळसाकांत चरणि तत्पर तुकोजि सुत य.शवंतराव होळकरस

राजश्री बाळकृष्णरावजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो हरनाथसिंग [होळकर] दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन आपले कुशल लिा जावे विशेष. तुम्हीरा जश्री बालाराम आगरवाले यास पत्र पाठविले ते मारनिलेनी दाखविले. त्यात पो पाटण केशोराये येथे बाकी राहिली असेल तिजपैकी श्रीमंत राजश्री दौलतराव बाबा [शिंदे] याजकडे दो हिशाचा ऐवज द्यावा. याअन्वये इंग्रजाकडील चकती अली आहे. तुम्ही परभारे येवज

दरोवस्त नेला. त्या प्रो दो हिशाचा येवज माघारे आम्हाकडे देवावा म्हणून राहिले. त्यास इंग्रजाचा तह जाला त्यात पाटण आमचे सरकारात लाउन दिल्हे व चकतीही आम्हाकडे येवज द्यावा येसी आली. त्याजवरून बाकीचा ऐवज महालीहून आम्ही घेतला. हली शिंदे याचे सरकारात दोन हिशाचा येवज द्यावा असी चकती आली म्हणोन तुम्ही लिहिले. त्यास चिंता नाही. वहीवाट झाली ते श्रीमंत येजमान[११५] साहेबाकडे लेखन केली आहे. सांप्रत तुम्हीही मजकूर लिहिला तोही सरकारात लिहून पाठउन दोन्ही सरकारे यकच आहेत. येवज मुबदलेही परस्पर जाले आहेत. खासा स्वारीही अविलंबेच येत आहे. इकडे येणे जाले असता जाबसाल उलगडणे तैसे उलगडतील. रा छ * १ सफर. सुा सित मयातेन व आलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

श्री मोर्तब सुद

पौ छ ५ माहे मजकूर

[ २५ अप्रेल १८०६ ]

---

लेखांक [ १५८ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६३ वैशाख शुद्ध १२

[ २९ अप्रेल १८०६ ]

श्री झाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत य शवंतराव हो ळकर

राजश्री लालाजी बलाळ गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. नजीमखां याजकडे प्रगणे पाटण पौ सरजामास गांव दिल्हा आहे त्याची जपती करण्याचे ठरून हे पत्र तुम्हास लिा आहे. तरी पत्र पावताच मारनिलेकडील गांव सरकारात जप्त करून त्याचे टाणे उठउन देउन यक पैसा वसूल जाउ न देणे. रा छ * ९ सफर. सुरसन सित मयातेन व अलफ. बहुत काये लिा हे विनंती.

मोर्तब सुद

बार

---

(११५) यशवंतराव होळकर.

लेखांक [ १५९ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६३ श्रावण शुद्ध ११

[ २५ अगष्ट १८०६ ]

श्री
म्हाळसाकां
त चरणि तत्पर
तुकाजि सुत य
शवंतराव हो
ळकरम

राजश्री बाळकृष्ण वासुदेव कमादार
प्रा पाटण व सुनेल[116] गो यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुा सबा मयातेन व आलफ. हरदू महालची कामे मखतियाने तुम्हाकडे सांगून तेथील यैवज येकंदर राजश्री बाळाराम केशोराम आगरवाले याजकडे द्यावयाचा [ करार ] ठरून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही सदरहू महालचे यैवज आगरवाले याजकडे मखल्या बाा हप्तेबंदी प्रो देउन पावती घेणे. जाणिजे छ * १० जमादिलाखर. बहुत काय लिहिणे.

श्री
मोर्तब
सुद

---

लेखांक [ १६० ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८६३ श्रावण शुद्ध ११

[ २५ अगस्ट १८०६ ]

श्री
म्हालसाकां
त चरणि तत्पर
तुकोजि सुत य
शवंतराव हो
ळकरम

राजश्री बाळकृष्ण[117] वासुदेव गोसावी यासि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुा सबा मयातेन व आलफ. तुम्ही कार्यकर्ते जाणोन प्रो सुनेर हा महाल साल मारी सरकारातून मखतियाने बिनखर्ची मक्ता रुपये १३,००० तेरा हजारास करार करून हे सनद सादर केली असे. तरी तुम्ही प्रो मारची वहिवट इमाने इतबारे करून सरकार मखल्याचा यैवज हप्तेबंदीने पावता करणे येणेप्रमाणें: —

---

(११६) सुनेल. शिंदेशाही टप्पे सोयतच्या उत्तरेस कालीसिंध व आऊ या दोन नद्यांमध्यें हा महाल असून तो होळकरशाही जिल्हे रामपुऱ्यांत हल्लीं मोडतो. यासच सुनेर असेंही म्हटलें आहे. [ लेखांक १६० ].

(११७) याच मितीस ' प्रो पाटण येथील मामलत मखतीयाने १७००० [ रास ] बालकृष्ण रावजीस ' मिळाली आहे.

६,५०० श्रावण शुा १५
६,५०० माघ शुा १५

---

१३,०००

येकूण तेरा हजार रुपये महाल चलणी राजश्री बाळाराम केशोराम आगरवाले निा सरकार याचे विद्यमाने सरकारात ⅂⅃ पावता करून कबज घेणे. सरकातून निभावणी केली जाईल. ।' जाणिजे छ * १० जमादिलाखर. बहुत काय लिहिणे. (श्री मोर्तब सुद)

बार.

---

लेखांक [ १६१ ] श्री ।' म्हाळसाकांत[११८] * संवत् १८६३ श्रावण वद्य ३
[ १ सितंबर १८०६ ]

सिका नकल

राजश्री कृष्णराव बाजी व चिटको बाळाजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृ राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत. सुमा सबा मयातेन व अल्फ. प्रो रायपुर येथील जप्तीचे काम चिरंजीव राजश्री हरनाथ [होळकर] याने तुम्हाकडे सांगितले होते ते दूर करून साल मारी राजश्री बाळकृष्ण वासूदेव याजकडे मक्तियाने सांगोन अलाहिदा मारनिलेचे नावे सनद देउन हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही प्रो मारचे ठाणे मारनिलेचे स्वाधीन करून कबज घेणे. जाणिजे छ * १७ जाखर. बहुत काय लिहिणे. मो.

बार.

---

लेखांक [ १६२ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८६३ श्रावण वद्य १४
[ ११ सितंबर १८०६ ]

(श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत यशवंतराव होळकर)

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत

---

(११८) याच अर्थाचीं व मितीचीं पत्रें 'चौधरी कानगो परगने पिंढावे व रायपुर' यांच्या नांवें निरनिराळीं असून 'मख्ता रायपुर ६०००, तो कोठडी प्रो पिढावे १६०००' चा ठरविला आहे.

विनंती उपरी. संस्थान बूंदी वगैरे येथील सरकारी अमलाचे पातीची मामलत सरकारातून राजश्री राव बिसनासिंगजी [बूंदीकर] याजकडे साल मजकूरी सांगून सनदापत्रे करून दिल्ही त्याअन्वये सरकारचे आमलाची वहिवट मशारनिले करतील. सांप्रत तुम्ही राजश्री दौलतराव शिंदे याजकडील पातीचे बंदोबस्ताकरिता जमेत आणून त्यानी तिकडील पातीत ऱ्ह करणे तसे करावे, ते सोडून सरकारी अमलात बखेडा करून नुकसानी होत आहे म्हणोन विदित जाले. ऐसियासी सरकारी पातीत उपसर्ग लागणे चांगले नाही. यास्तव हे पत्र लेखन केले असे. तरी तुम्ही जमेतीत[स] इतःपर निक्षूण सांगोन सरकारी अमलात तिलमात्रही उपसर्ग न लागता आमची वहिवट सुरळीतपणे चालेल आसे करणे. याउपर उपद्रव लागोन बोभाट आलियास नुकसान होईल. तिकडील पातीत समजून घ्यावे लागेल आसे न घडे. यास जपून कर्तव्य तसे करणे. सरकारातून पागा व कारकून संवस्थान मजकूरी सरकार आज्ञे प्रो जाप्ता करून तिकडील वर्तमान घडेल तसे सरकारात लिहित जातील. ॥ रा छ * २७ जमादिलाखर. ॥ सुा सबा मयातेन व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [ १६३ ]    श्री ॥ म्हाळसाकांत  * संतत् १८६३ मार्गशीर्ष वद्य ३
[ २८ दिसंबर १८०६ ]

(श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत यशवंतराव होळकर)

राजश्री राजे राधिकादास संस्थान सोपर गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. संस्थान मजकूरी पवाराचा हिसा आहे त्याची सरकारातून जप्ती[११९] करून तेथील काम राजश्री बालाराम अगरवाले याजकडे सांगून हे पत्र तुम्हास लेखन केले असे. तरी तुम्ही पवाराकडील कारकूनास इतला न देता अगरवाले याचे ऱ्ह कारकून वहिवट करतील त्याजला कोण्हे गोष्टीची अडचण न पडता उपर राखीत जाणे. ॥ रा

---

(११९) या पूर्वीच 'जप्ती करून २००० मख्ता मामलत बालकृष्णरावजी विद्यमानें आगरवाले' यांस सांगितली होती. [ ७ नवंबर १८०६ ]

छ * १७ सवाल. ।‍ सुमा सबा मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

बार.

---

लेखांक [ १६४ ]    श्री म्हाळसाकांत   * संवत् १८६३ पौष शुा ४

[ १३ जनवरी १८०७ ]

(श्री म्हाळसाकांत चरणि तत्पर तुकोजि सुत यशवंतराव होळकर)

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो    यशवंतराव होळकर दंडवत. सुमा सबा मयातेन व अलफ. पो पिढावे व तालुके कोठडी येथील पटवारीपणाचे काम राजश्री बालाराम आगरवाले याचे विद्यमाने तुम्हांकडे सांगोन हे सनद सादर केली असे. तरी तुम्ही पो मजकूर व तो मजकूर येथील पटवारीपणाची वहिवट चालउन सरकारजमे सिवाये दोन्ही महालात दर सेकडा तीन रुपये दोन आणे प्रमाणें घेउन व्याज पौ तीनसे रुपये कारकूनाचा खर्च घेत जाउन बाकी सरकारात दाखल करीत जाणे. ।‍ जाणिजे छ * ३ जिलकाद. ।‍ बहुत काय लिहिणे. (श्री मोर्तब सुद)

बार.

---

लेखांक [ १६५ ]    श्रीम्हाळसाकांत[१२०]    * संवत् १८६४ जेष्ट शुद्ध ३

[ ९ जून १८०७ ]

(श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत यशवंतराव होळकर)

राजश्री महाराजा शिवदानसिंग
संवस्थान इंद्रगड गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो    यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावे विशेष. संस्थान मार व खातोली वगैरे कोठड्याची मामलत राजश्री नवाब शाहा[म]त खां याजकडून दूर करून साल मारपासून

---

(१२०) याच मजकुराचें व तारखेचें पत्र 'नवाब शाहामत खां' याचे नांवें आहे.

जपतीचे काम राजश्री बालाराम आगरवाले याजकडे सांगून हे पत्र तुम्हास सादर केले असे. तरी तुम्ही संवस्थान मार व खातोली वगैरे कोठड्याचा दाखला ॥ माजुलाकडे न देता आगरवाले मार[निले] याजकडे वहिवट सुदामत अन्वये देत जाणे. रा छ * २ रविलाखर सुमा. ॥ समान मयातेन व आलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ १६६ ]

श्री ॥ म्हाळसाकांत * संवत् १८६६ वैशाख वद्य १२

[ ११ मे १८०९ ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत य शवंतराव हो ळकर

राजश्री बाळकृष्ण [वासुदेव] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. राजश्री दौलतराव शिंदे याजपासी वकीलीचे[१२१] कामावर सरकार तर्फेने राजश्री रावजी गोविंद याजला ठेउन मारनिलेकडील खर्च बाबत दरमा[हा]ची नेमणूक बाा याद चांदवड ४५० रुपये येकुण साडे च्यारसे रुपये तुम्हाकडून देविले असे. तरी तुम्ही सरकारी महालचे यैवजी सदरहू च्यारसे पंनास रुपये चांदवड सिका छ १ राखरचे तारखेपासून दरमहाचे दरमहा मारनिलेकडे देत जाउन कबज घेत जाणे. आखेर साली महालचे हिसेबी येकंदर यैवज खर्ची लिहिणे. ॥ सरकारातून मजरा दिल्हा जाईल. ॥ रा छ २५ रविलावल. सुा तिसा मयातेन व आलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार.

---

(१२१) सवाई बाजीराव पेशवे यांनीं इंग्रजांचा प्रथम आश्रय घेऊन वसईचा जो तह १८०२ सालीं केला त्यापूर्वीं तर पेशवे, शिंदे व होळकर यांचे वकील एकमेकांचे दरबारीं राहातच होते पण सर्जेअर्जुनगांव व ब्यास येथील तह झाल्यानंतरसुद्धां त्यांचे वकील परपस्परांकडे राहात असत ही गोष्ट अत्यंत महत्वाची असून अवश्य लक्षांत ठेवण्यासारखी आहे. [ लेखांक १७१, होइसा १ लेखांक ८८, ९२ भाग १ लेखांक २४५ टीप २५० ]

लेखांक [ १६७ ]   श्री म्हाळसाकांत   * संवत् १८६६ आश्विन वद्य ४
[ २७ अक्टुबर १८०९ ]

श्री
झाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा   यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. 'किले रामपुरा येथील आलग व बुरजाची पडधड जाली आहे त्याची मरमत करण्याविसी सरकारची आज्ञा यावी' म्हणोन तुम्हाकडून स्वारीत विदित जाले. त्यावरून हे पत्र लिहिले आहे. तरी किले मजकूरची आलग व बुरूज याची पडझड कार्याकारण जरूर करावयाजोगी [पाहून] बगारीने वगैरे काम व्हायाजोगे असेल त्यास गांवगन्नाचे बेगारी व राज आणोन करून घेणे. चुना दगड वगैरे मजबूत काम करावयाचे तेथे राज मजूर महिनदार व माल म꣸साला लागेल तो चौकसीने लाउन काम चांगले मजबूत करून राज व मजूराचा खर्च प्रो मारचे हिशेबी खर्ची लिहिणे. सरकारातून मजरा दिल्हा जाईल. रा छ * १७ रमजान. सुा अशर मयातेन व अलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार.

---

लेखांक [ १६८ ]   श्री   * संवत् १८६६ कार्तिक वद्य १२
[ २७ नवंबर १८०९ ]

श्री
झाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री राव बिसनसिंगजी साा बूंदी गोसावी

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेाा   यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. सरकारांतून वेदमूर्ती राजश्री राजाराम जोसी निाा सरकार याजला मोजे सादडी हा गांव धर्मार्थ इनाम दिल्हा. तेथील हरयेकविसी तुम्हाकडून संरक्षण घडून उपर राहात जावा, ते कांहीच न होता वरकड गांवाप्रमाणें जोसी याचे गांवावर फुरफरमास भेट बेगार जामदारी नेवता वगैरेचा कितेक प्रकारे उपद्रव × (हे) चाल कोठील! असो इत [पर] × गावास कोणेविसी × मात्र उपसर्ग लागू न देता संरक्षण करून

हरयेकविसीचा उपर ठेवीत जाणे. पुन्हा याचा बोभाट येउ न देणे. रा छ * १८ सवाल. सुमा अशर मयातेन व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ १६९ ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८६६ कार्तिक वद्य १२

[ ४ दिसंबर १८०९ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. तुमचे चिरंजीवाचे लग्नामुळें खर्चास पो मापी [ फी ] मखलसीची ३००० रुपये

पैकी वजा कसर पोतदारी दर सदे ३ प्रमाणें ९० रुपये

बाकी २९१० रुपये

यकुण दोन हजार नवसे दहा रुपये तुम्हाकडे सरकारी मामलत आहेत त्यायैवजी महाल चलनी घेउन महालचे हिसेबी खर्ची लि卍हिणें. मजरा दिल्हे जातील. रा छ * २५ सवाल. सुा अशेर मयातेन व अलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

---

लेखांक [ १७० ] श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८६६ माघ शुा १३

[ १७ फरवरी १८१० ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री बालकृष्ण वासुदेव कादार
पाटण केशवरायजीचे वगैरे गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. राजश्री रामचंद्र रंगनाथ निा मजमदार हे निरोप घेउन घरी जातात सबब खर्चास बाा यादी ४०० रुपये.

卍 च्यारसे रुपये तुम्हाकडून देविले असेत. तरी तुम्ही सदरहू रुपये महाल चलनी

मारनिलेस देउन कबज घेणे. रा छ * १२ मोहरम. सुा अशेर मयातेन व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [ १७१ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८६६ माघ वद्य ३

[ २२ फरवरी १८१० ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत यशवंतराव होळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव कादार

पाटण वगैरे माहाय गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. राजश्री रावजी गोविंद याजला सिंदे याजकडे वकीलीचे कामावर सरकारातून पाठविले होते. सबब मारनिलेस साडे च्यारसे रुपये दरमाह नेमणूक तुम्हावर सरकारातून करून दिल्ही होती. त्याप्रो सामाही येवज त्याजला पावता जाला. बाकी सहा माही येवज तुम्हा कडे बाकी येणे राहिला आहे. हली रावजी गोविंद याजकडून काम दूर करून राजश्री कासी रामचंद्र याजकडे वकीलीचे काम सांगून याची दरमाहची नेमणूक दरमाह च्यारसे रुपये करून दिल्ही आहे परंतु याजला मागील देण्याची निकड यास्तव पेशजीचा येवज सहामाहीचा तुम्हाकडे राहिला आहे, त्यायेवजी अडीच हजार रुपये सध्या देउन याचे दरमाहचे नेमणूकीत मजरा घेणे. ढील न करणे. सरकार कामावर याचे जाणे जलदीने जाले पो. याजकरिता पत्र पावताच सदरहू अडीच हजार रुपये देणे. चांदवड सिका देणे. रा छ * १७ मोहरम. सुा अशेर मयातेन व अलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

---

लेखांक [ १७२ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८६६ फाल्गुन शुद्ध १

[ ६ मार्च १८१० ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत यशवंतराव होळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती

उपरी. राजश्री सखाराम जगजीवन यांची रवानगी पुणियास श्रीमंताकडे सरकारातून केली आहे. समागमे हुजरात पागा दिली आहे. त्याचे चंदीची वगैरे खर्चा करिता ४०० रुपये

येकुण च्यारसे रुपये तुम्हांकडे महाल आ‍हेत तेथील सन आशर मयातेन साल मजकूर पो देविले आसे. तरी सदरहू च्यारसे रुपये तुम्ही मारनिलेचे विा देउन कबज घेणे. या कामास घटकेचा विलंब न करणे. रा छ * २९ मोहरम. सुा अशेर मयातेन व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार.

---

लेखांक [ १७३ ]

श्री'म्हाळसाकांत * संवत् १८६७ चैत्र शुद्ध ९
[ १२ अप्रेल १८१० ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जाणे विशेष. तुम्ही पत्र पाठविले ते पावले. 'सरकारात पैदलचे लोकाची तलब देणे त्याबद्दल यैवजाचे सरबरेविसी आज्ञा आली. त्यावरून पंचवीस हजार रुपयाच्या हुंड्या बूंदी सिक्याच्या पाठविल्या आहेत त्या पावतील.' म्हणोन लिहिले. यैसियास तुमच्या लि‍हिल्याप्रमाणे सदरहू पंचवीस हजार रुपयाची हुंडी बहुत अडचणीचे समयास येउन पावली. मुदत भरून येवजाचा जाब पका जाला म्हणजे सरकार महालचे पेश्तर साल यैवजी पावती देण्यात येईल. सरकार लक्षास जपणे याची खात्री दिवसेदिवस वृधिंगत आहे. त्याचा संतोष पत्री लेहून कळवावा असे नाहीं. सविस्तरे राजश्री कनीराम ठग याचे लिहिल्यावरून कळेल. रा छ * ७ रावल. सुा अशेर मयातेन व अलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पो चैत्र सुा १५ गुरूवासर.
[ १९ अप्रेल १८१० ]

---

लेखांक [ १७४ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६७ वैशाख वद्य ८
[ २६ मे १८१० ]

राजश्री लालाजी बलाळ [ गुलगुले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो सा[वती] लाडाबाई व तुळसाबाई होळकर विनंती उपरी. तुम्हाकडे सरकारातून महाल आहेत त्या ऐवजी च्यार रुपये रसदे बाा पेस्तर सालावर आले आहे याजमुळे सरसालची निभावणी होईल न होईल म्हणोन संशये आला हे विदित जाले. त्यावरुन हे पत्र तुम्हास लिहिले असे. तरी तुम्हाकडे महाल आहेत त्याची निभावणी सन १२२० चे सालाची बारामाही सरकारातून निभावणी केली जाईल. येविषई संशय किमपि न धरणे. ॥ रा छ * २१ राखर. सुा अशेर मयातेन व आलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पो जेष्ट सुा १ रविवासर.
[ ३ जून १८१० ]

---

लेखांक [ १७५ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६७ कार्तिक शुद्ध ११
[ ७ नवंबर १८१० ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर तुकोजी सुत य शवंतराव हो ळकर

राजश्री बालकृष्ण वासुदेव
काादार पाा रामपुरा खुर्द[122] गोा.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. भरतपुर व हिंडोण[123] पो बारूद खोचे दास्तान सरकारी किले रामपुरा येथे आहे. त्याज पो हुजूरचे तोपखान्याकडे बारूद वजन आडीचसे मण याची वरात पेशजी छ २९ जाखरी जाली. ते गैरविल्हेत पडली साा हाली बारूद वजन मण २५० आडीचसे मण बारूद वजनी तुम्हाकडून देविली असे. तरी सदरहू दोनसे पनास मण बारूद सरकारी दास्ताना पो हुजूरचे तोपखान्याकडे राजश्री विठल महादेव [जोग] याचे

---

(१२२) या वेळीं होळकरशाहींत दोन रामपुरे होते. एक माळव्यांतील व दुसरा राजपुतान्यांतील. हा रामपुरा टोंकच असावा. [लेखांक १८९] हल्लीं तो अमीरखां पेंढारी यांचे वंशजाकडे आहे.

(१२३) हिंडोण. आग्रा व अजमेर या फाट्यावर हें एक रेलवे स्टेशन असून तें करोलीच्या उत्तरेस ८ कोसांवर जयपूर राज्यांत सांप्रत आहे.

निा देउन पावती घेणे. ।' रा छ * ९ सवाल. सुमा इहिदे ॥ आशर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार.

वराती पो वसूल कृष्णाजी महाडिक व अनंदराव राजाराम हस्ते रामराव कासी कारकून निा मारनिले दारू वजन मण १६९८॥०। रूये ८४ चे थैले सुमार नग ७८ सरोन सिका माधोपूर गुा बापूजी पांडुरंग निा कादार याचे विद्यमाने भरून पावलो. मिती मार्गशीर्ष वद्य ११ संवत १८६७. [ २२ दिसंबर १८१० ]

---

लेखांक [ १७६ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६७ मार्गशीर्ष वद्य १
[ ११ दिसंबर १८१० ]

श्री
म्हाळसाकां
त चरणि तत्पर
तुकोजि सुत य
शवंतराव हो
ळकरम

राजश्री राव बिसनसिंगजी संवस्थान बूंदी गो यां.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. जिनसी[१२४] व पलटणे व सिलेदार नगर नेणव्यास आहेत. त्यांजकडे फौज खर्चाचा यैवज तुम्हांकडे घेणे ठरला. त्याज पाा प्रथम हप्त्या यैवजी तुम्हावर वरात सरकारातून केली. त्याप्रमाणे यैवज पावता जाला पाहिजे. याजकरिता हे पत्र लेखन केले असे. तरी राजश्री रामचंद्र सदासिव कारकून तेथे आल्यावर वराती अन्वये यैवज मारनिलेस देउन कबज घेणे. रा छ * १३ जिलकाद. ॥ ।' सुा इहिदे अशर मयातेन वा अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

श्री
मोर्तब
सुद

---

(१२४) जिनसी हा शब्द जिन्स या फारसी शब्दापासून निघाल्यामुळें त्याचा कोठार असा सामान्य अर्थ घेतां येईल पण मराठ्यांच्या सैन्यास कवायती स्वरूप आलें त्याबरोबर या शब्दाला मराठ्यांच्या फौजी भाषेत 'तोफखाना' असा यौगिक अर्थ रूढ झालेला दिसतो. [ लेखांक १७८, १८३ ] शिंदेशाही जिनसी संबंधीं जें वर्णन Capt. Broughton देतो तें लक्षांत घेतां जिनसी म्हणजे 'जंगी तोफखाना' असा विशेषार्थ कळतो. [ Broughton's Maratha Camp,

लेखांक [ १७७ ]    श्रीम्हाळसाकांत    * संवत् १८६७ माघ शुद्ध १५
[ ८ फरवरी १८११ ]




राजश्री राव बिसनसिंगजी सा। बूंदी गोसावी यांस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो।    यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लिहित जावें विशेष. बाळकृष्ण जोसी याजला सरकारांतून इनामी जमीन धर्मार्थ पेशजी करून देउन सनद दिल्ही. कैलासवासी ती। [ तुकोजी होळकर ] सुभेदार साहेब यानी कायदार याचे नावें देउन त्याचा भोगवटा चालत आहे. दरम्यान जोसी याचाही काल जाला. त्याचे स्त्रीकडें वहिवट सनदे अन्वयें चालत असून साल मारी खलश पडती. याचा बोभाट आल्यावरून समजलें. जमीन बीघे येणे प्रा।

२०१ मोजे जरखोदा पा। समधी
 ६१ को। समेधीस[१२५]
२६२

येकुण दोनसें बासष्ट बीघें चालत असतां खलश करण्याचे कारण काये ? त्यावरून हे पत्र तुम्हास लेखन केलें असे. तरी जोसी याचे स्त्रीकडे वहि‿वट चालत आल्या प्रा। निर्वेध चालउन धर्मार्थ कैलासवासी ती।। सुभेदार साहेबानी जमीन दोनसे बासष्ट बीघे करून दिल्हीं त्या प्रा। तुम्ही काहीयेक दिकत न करितां सुदामत चालल्यान्वये साल मारी याजपासून काहीं घेतले असल्यास जोसी याचे माघारें देउन सुरळीत चालविणे. येविसीचा पुन्हा बोभाट येउ न देणे. ॥ रा। छ * १३ मोहरम. सु।। इहिदे असेर मयातेन व आलफ. ।' बहुत काये लिहिणे हे विनंती.




---

pages 43, 109, 110, 121 ] किंबहुना तोफखान्याचें महत्व वाढल्याबरोबर त्याच्या संरक्षणार्थ होळकरशाहींत पलटणी निर्माण झाल्या होत्या असेंही स्पष्ट कळतें.

(१२५) समेधी हा मुख्य गांव लाखेरीच्या वायव्य दिशेस ८ कोसांवर असून मंदसोरच्या तहानंतर हा महाल इंग्रजांनीं बूंदीकरांस दिला.

लेखांक [ १७८ ]    श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६८ वैशाख शुद्ध ७
[ २९ अप्रेल १८११ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर
तुकोजी सुत य
शवंतराव हो
ळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव
कादार पा रामपुरा गो.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर दंडवत विनंती उपरी. जिनसी पलटणाकडे हिंडोणचे बारूद पो पेशजी साठ मणाची वरात केली. त्या प्रा [ दारु ] आद्याप पावत नाही म्हणोन बोभाट आला. त्यावरून हे पत्र तुम्हास लेखन केले असे. तरी जिनसी पलटणाकडे हिंडोणचे दारूपैकी साठ मण देविली आहे त्या प्रो बिनदिकत दुसरे पत्राचा आक्षेप न घेता दोहीकडे देउन पावल्या घेणे. रवान्‍ना छ * ५ राखर सुमा इहिदे अशर मयातेन व आलफ. ॥ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

सदरहू बारूद हिंडोण पो पलटण जिनसीकडील कारकूण निा परशराम होळकर हास्ते रामचंद्र गोविंद बारूद आसीचे तोलणे वजन मण ५० पनास भरून पावलो. छ * ३ जमादिलाखर. थैले सुमार २९.    [ २६ मे १८२१ ]

---

लेखांक [ १७९ ]    श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६८ आश्विन शुद्ध ७
[ २४ सितंबर १८११ ]

नकल

सिका

राजश्री राज जालमसिंगजी [ झाले ] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो यशवंतराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जावे विशेष. सरकारात खर्चाची वोढ यास्तव तुम्ही व राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] याजकडून दीड लक्ष रुपये घ्यावे म्हणोन निश्चयात येउन आगाउ तुम्हाकडे पत्रे पाठउन पनास हजार रुपयाची वरात मशारनिलेवर करून मुजरद कारकूनाची रवानगी करण्यात आली व भगोतीदास याजला छावणीत पाठविले.

कारकूण मार तुम्हाजवळ येउन सर्व इत्तला देउन पुढे कोव्यास जाउन लालाजी बलाळ याजला सरकाचे पत्र व वरात दाखउन आज्ञेप्रमाणे मार कळविला. त्यासि धातुपोषणाचे जाब पर्यायेकरून बोलले. येथे ऐवजाचा थाक लागत नाही. या अन्वये मारनिलेचे पत्र येकवेळ आले. तथापि तुम्ही जलदी न करिता सोईने बोलोन कार्य करून घेणे, तेही दिकत करणार नाही, याप्रमाणे कारकूनास लेहून मारनिलेसही पेशजी अन्वये अडचणी चे भाव लिहिण्यात आले. सरकारात वोढीचा प्रकार. हे त्याचे ध्यानात व ऐवजाची सरबारा लागणे तेव्हा पाउण लक्षात पांच च्यार हजार कमी अथवा वायेदा मुदत बोलण्यात येउन स्वारीत गुमास्ता पाठउन पत्राचा जाब यावा. इतक्या व्यवहारात मुबदला होउन सावकाराची खात्री पटून सरकारकाम चालीस लागते. ठेरला ऐवज साईसोई ने घेण्यात येता. त्यात हाली पउण लक्ष पटून आले म्हणजे त्याजला ऐवज लाउन देण्यात येउन पुढे आणखी घ्यावयास येतील. याप्रमाणे सरकारपत्रात लिहिणे व कारकूनासी बोलणे. येसे असता राजश्री राघो भवानी यासि तोडजोडीचे बोलणे कांहीं येक न करिता टालाटाली बोलोन सरकारपत्रे सुवाच्य आम्हाकड यावीत, शिलक [ही] नाही म्हणोन पष्ट बोलोन पत्राचा जाब दिल्हा नाही. राजश्री बाळकृष्ण वासुदेव व राघो भवानी यांची पत्रे राजश्री विठल महादेव [जोग] याचे नावे आली. त्याच्या नकला पाठविल्या आहेत [त्या] पावतील व कारकूनही फार करून उठोन येईल. सरकार शिलक मशारनिलेजवळ आसती तर कारकून पाठवणे, पत्रे लिहिणे याचे कार[ण] कोणते ? मशारनिले सरकार लक्षात, खात्रीने कामे जाली व होतील असे जाणोन लिहिण्यात येते. सरकारपत्राचा जाब देउ नये, लिहिण्यास सुवाच्य म्हणावे हा पर्याये येक वेळेस निदर्शनास आला. अस्तु. सरकार अडचणी उपायेच नाही. [ केवळ ] जाला मजकूर तुम्हास कलावयास्तव लिहिला आहे. सरकार लिहिणे बोलणे सुवाच्य गणनेत आले. ते पक्षी ऐवजाचे काम होउन येणे याची तथा फार करून राहिला नाही. ऐवजाची वोढ तेव्हां मामल्याची घालमेल करणे प्राप्त. येक वेळ तुम्हाकडे लेहून घडावे याजकरिता वास्तवीक [लिहिण्यात] आले व [ पुढें जे ] करणे ते लिहिले आहे. पत्राचा जाब लौकर उगउन यावा. याप्रमाणे करावयास येईल. रा छ * ५ रमजान. सुा इसने अशर मयातेन आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.



# श्रीमंत मल्हारराव होळकर
## यांचा असल पत्रव्यवहार.

१८६८ ते १८७१ विक्रमी.

लेखांक [ १८० ]  श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६८ पौष शुद्ध ४
[ १९ दिसंबर १८११ ]




राजश्री कुवर सिवलाल[१२६] गोसावी यांसि.

अखंडीतलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर रामराम. सुमा इसने आशर मयातेन व आलफ. ताा गरोठ[१२७] पाो रामपुरा येथील मामलत सरकारातून पेष्तर सन १२२२ [फसली] समत १८६९ चे सालापासून बिनखर्च च्यार साला इस्ताव्याने मख्ता बांधून देउन तुम्हाकडे सांगितली आहे परंतु ताा माार येथील सायर चौतऱ्याची वहिवट आलाहिदा राजश्री मगनीराम कोठारी कादार पाो मारी याजकडे आहे. त्यास मामला व सायरची वहिवट वेगळाली जाली असता नीट पडणार नाही, यास्तव ताो मारचे सायर आमदानीबदल बिनखर्च घाा याद मखलसीची रुपये ३५०० साडे तीन हजार रुपये दरसाल पेष्तर समत १८६९ ताा समत १८७२ सन १२२५ [फसली] येकुण च्यार साला करार करून देउन हे सनद सादर केली आहे. तरी तुम्ही च्यार साला ताो मार येथील सायर आमदनीची वहिवट करून दरसाल सदरहू साडे तीन हजार रुपये

---

(१२६) 'तालुके गरोठ व परगने रामपुरा येथील मामलत मगनीराम कोठारी याजकडून दूर करून कुवर सिवलाल याजकडे सांगितल्या' बद्दल दोन पत्रें याच मितीचीं व मजकुराचीं 'चौधरी रामपुरा व मगनीराम कोठारी' यांच्या नांवें आहेत.

(१२७) गरोठ हा गांव रामपुराच्या अग्नेय दिशेस ८ कोसांवर असून तो होळकरशाहींत आहे.

विनखर्ची मामलेदाराकडे पावते करीत जाउन कबज घेत जाणे. सायरावर येन जमेत रोजीना वर्षासन व देवस्थानची नेमणूक सुदामत चालत आली आसल्यास पावती करीत जाणे. यैवज साडे तीन हजारात मजरा दिल्हा जाईल व जमेसिवाय परभारे बालादस्ती पो रोजीना वगैरे असला तर बिनदिकत ज्याचा त्यास देत जाउन बोभाट न ये ते करणे. जाणिजे छ * २ जिल्हेज. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [ १८१ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६८ पौष शुद्ध ४

[ १९ दिसंबर १८११ ]

श्री म्हाळसाकात चरणी तत्पर य शवंतराव सुत मल्हारराव हो ळकर

राजश्री कुवर सिवलाल गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर रामराम. सुा इसने अशर मयातेन व अलफ. तुम्ही कार्यकर्ते जाणोन ताा गरोठ पाो रामपुरा येथील मामलत पाो किले हिंगलाजगड[१२८] चे खर्चाकडे गांव येणे प्राो

| | |
|---|---|
| १ मोजे पावटी. | १ मोजे खजूरी पथाची. |
| १ मोजे बोल्या. | ० लंग. |
| २ | १ |

---

३

येकुण तीन गांव खेरीज करून ताा मजकूरची मामलत तुम्हाकडे पेस्तर सन १२२२ [ फसली ] संमत् १८६९ चे सालापासोन च्यार साला इस्ताव्याने बिन खर्च मक्ता येणे प्रमाणे महाल चलण रुपये.

७०००० समत् १८६९ सन १२२२ [ फसली ] यासि हप्तेबंदी येणेप्रमाणे.

आश्विन शुद्ध १५

---

(१२८) हिंगलजगड हा किल्ला भानपुऱ्याचे उत्तरेस ५ कोसांवर होळकरशाहींत आहे.

माघ शुद्ध १५
वैशाख शुद्ध १५

७००००

७२००० समत १८७० सन १२२३ [ फसली ]
७०००० रुजू गुदस्त
२००० इजाफा साल मारी

७२०००

७५००० समत १८७१ सन १२२४ [ फसली ]
७२००० रुजू गुदस्त
३००० इजाफा साल मारी

७५०००

८०००१ समत १८७२ सन १२२५ [ फसली ]
७५००० रुजू गुदस्त
५००१ इजाफा साल मारी

८०००१

२९७००१

सिवाये कलमे.

१. मनोती आगाउ यैवज सरकारात घेतला जाईल त्याजला दर सेकडा रुपये २ दोन रो प्रो येक वेळा मजरा दिल्ही जाईल.

१. व्याज रसदेचा यैवज सरकारात आगाउ घेण्यात येईल. त्यात महालचे किस्ती प्रो खरीफ [ व ] रबीचे सरकारचे व्याज वजा होउन बाकीचे यैवजास भोगले मितीचे दिल्हे जाईल.

१. ता मारचे सायर, मख्ल्याचे वहिवटीत नाही परंतु वेग[ ळिलें असतां ] आमलदारास दिकत पडेल यास्तव सायेरची वहिवट तुम्हाकडे येणे प्रो.

१. सायरचे जमेत मजराईची कलमे असतील ते सुदामत वहिवाटी अन्वये देत जाणे. मजरा पडतील.

१. रोजीनदार व महीनमाहा[दार] वगैरे सरकार जमेसिवाये परभारे बालादस्ती पो ॥ पावत आहेत त्या प्राो ज्याचे त्यास पावते करीत जाणे.

१. किल्याकडील तीनी गांवचे नाक्याचा भोगवटा असेल त्या प्राो वहिवट करणे.

---

३

येकुण तीन कलमे बाा वहिवट करणे. सायेरचा अंख बांधून दिल्हा जाईल त्या प्राो सायेरचे काादाराकडे यैवज पावता करीत जाणे.

१. देवस्थानाकडील नेमणूका व वर्षासने वगैरे ताा माारी आहेत त्याची व्यवस्था येणे प्रमाणे.

१. यैन जमेत देवस्थानाची नेमणूक व वर्षासने पावत असेल त्याची सुदामत वहिवट पाहून दर साल पाववीत जाणे. सरकारातून मजरा दिल्ही जातील.

१. सरकार जमेसिवाय परभारा रयेत निाा देवस्थानाकडे व वर्षासने गांवगन्ना पावत असेल त्या प्राा ताकीद करून देववीत जाउन देवाकडे नंदादीपास तेल परभारा तेल्याचे खुंटा पोा पावत आहे ते देववीत जाणे.

---

२

येकुण दोन कलमे अन्वये वहिवट करणे.

१. ताा माारचा यैवज सालाचे सालास ठरावा बाा घेतला जाईल. कदाचित सरकारात अगाउ यैवज घेणे पडल्यास तुमचे विचारे घेतला जाईल.

१. किले हिंगलाजगड येथील फरमास ताा माारी होणार नाही.

१. ताा माारी गांव इजारियाने असतील त्यात गुंजाइश असल्यास तुम्ही खालसे ठेउन वहिवट करणे.

१. इनामी जमीन धर्मार्थ उदक असतील त्याची सुदामत वहिवट पाहून चालवणे.

१. ताा माारी फडनीस सरकारातून आहे त्याचे नेमणूकी प्राा वेतन दरसाल देत जाणे. सरकारातून मजरा दिल्हे जाईल.

१. ताा माा येथील समत १८६८ चे सालची मामलत रोा मगनीराम कोठारी काादार पोा रामपुरा याजकडून तुम्ही केली आहे. साल मारी आखेर साली

तुमचा त्याचा वाजवी हिसब होउन तुमची बाकी मारनिलेकडे निघाल्यास सरकारातून ताकीद करून देवण्यात येईल. [मगनीराम] कोठारी याचा यैवज तुम्हाकडे पडल्यास तुम्ही फडचा करून देणे.

१. किल्याचे खर्चास तालुके मारचे गांव आहेत त्याजला तुम्ही उपद्रव देउ नये.

नख्ती. कलमे.

२९७००१ ११.

येकुण दोन लाख सत्याणव हजार येक रुपये दर सालाचे अंखाप्रमाणे बंद बसउन यैवज सरकारात अदा करणे व अकरा कलमे लिहिल्या अन्वये वहिवट करून हिसब सरकारात समजावीत जाणे. सदरहू लिहिल्या प्रो सरकारातूनही निभावणी केली जाईल. जाणिजे. छ * २ जिलहेज. ।' बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [ १८२ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८६९ आषाढ शुद्ध ८

[ १६ जुलै १८१२ ]

श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर यशवंतराव सुत मल्हारराव होळकर

राजश्री कुवर शिवलाल कामदार

तो गरोठ पा रामपुरा गो यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर. सुमा सलास अशर मयातेन व आलफ. तो मार येथील मामलत सरकारातून साल मारी तुम्हाकडे मखत्याने आहे [ तरी ] तो मार येथील गांव तीर्थरूप कैलासवासी [ यशवंतराव ] बाबा साहेब [ होळकर ] याचे छेत्रीचे[१२९] खर्चा करिता खासगीकडे मोजे साठखेडा व मोजे शेवळी रुपाची येकुण दोन गांव लाउन दिल्हे आहेत. त्यास साल मारी जमीदाराचे विद्यमाने चौकसीचे आन्वये सदरहू दोही गांवचा यैवज मखत्यात मजरा दिल्हा जाईल. जाणिजे छ * ६ रजब. बहुत काय लिहिणे.

मोर्तब सुद

बार.

---

(१२९) यशवंतराव होळकर २८ अक्टुबर १८११ रोजीं रामपुऱ्यास वारले. [ होकै. पृष्ट ११६ ] तेथें त्यांची जी छत्री आहे तिचें काम या सुमारास संपलें असून हीं दोन गांवें तिच्या खर्चासाठीं लाविलीं आहेत.

लेखांक [ १८३ ]

श्री म्हाळसाकांत * संवत् १८६९ श्रावण शुद्ध १५
[ २२ अगस्ट १८१२ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर य
शवंतराव सुत
मल्हारराव हो
ळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव कादार
किले रामपुरा खुर्द गोस.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरी. 'चोरू[१३०] पिपळू बावडी येथे जेपूरवाले याचा उपद्रव लागला. सरकार जाग्यास खलश करण्याचा त्याचा इरादा यास्तव किले मारचे रखवालीस जिनसी पो माणशे देविली पाहिजेत' म्हणोन राजश्री बाळाराम आगरवाले याचे पत्री मार लिहिला. मशारनिलेनी सरकारात विनंती केली. त्यावरून जिनसी पो बुंधेल्याची वगैरे शंभर माणशे किल्याचे रखवालीस देवउन त्याचे ꠲ दरमहाचे वीस रोज्याबदल रूपये ५०० पांचशे दरमहा द्यावयाचे ठरून आलाहिदा चिरंजीव[१३१] परशराम होळकर यास लेहून हे पत्र तुम्हास लिा आहे. तरी जिनसी पौ शंभर माणशे किले मारी आलियावर सदरहू पांचशे रूपये वीस रोज्याबदल दरमहा महाल चलण पो मार यैवजी देउन कबजा घेउन हिशेबी खर्चा लिहिणे. रूपये कबजा आन्वये सरकारातून मजरा दिल्हे जातील. ꠱ रवाना छ * १४ साबान. सुमा सलास आशर मयातेन व अलफ. ꠱ बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

बार.

---

लेखांक [ १८४ ]

श्री म्हाळसाकांत * संवत् १८६९ श्रावण वद्य १०
[ ३१ अगस्ट १८१२ ]

श्री
म्हाळसाकात
चरणी तत्पर य
शवंतराव सुत
मल्हारराव हो
ळकर

राजश्री लाळाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती

---

(१३०) चोरु हा गांव सवाई माधवपुरच्या पश्चिमेस ५ कोसांवर असून सांप्रत तो नवाब टोंक याजकडे आहे. पिपलुबावडी हें स्थल नकाशांत सांपडत नाहीं पण तें चोरु समीपच कोठेंतरी असलें पाहिजे.

(१३१) 'चिरंजीव परशराम होळकर' असें यशवंतराव होळकरांनीं उल्लेखिलें असतां तसाच

उपरी. तुम्ही राजश्री बाळाराम आगरवाले याचे नावे पत्र पाठविले ते पावले. मारनिलेनी पत्रान्वये सरकारात अर्थ विदित केला तो श्रवण केला. 'शांगड्याची जमीयत चहूकडून जमाव होउन हमरा जाले आहेत. स्वारीतून फौजेची मदत व्हावी म्हणोन मसलतीचे ताबे सुचउन किल्याविषई खातरीचा पर्याय लिहिला तो कळला.' यैसियासी 'जैपूरवाले याजला सरकारचा अमला देणे तो सुरतमलीत न देता फौजा जमा करून [लडाईचा] इरादा ठेवितात ते पक्षी तुमचे सुचविल्या आन्वयेच विचार घडत आहे. थोडकेच दिवसात शांगड्याचे प्रत्ययास येणे तैशे येईल. रामपुराचे किल्याविषई तुम्ही खातरीने लेहून कळवावे असे नाही. तुमचे सावधानीविषई सरकारात खातरखा भरोसा आहे. जिनसीकडे दारू देविली. सद्यः गडबडीचा प्रसंग [समजून तुम्ही] दारस्तानची दारू देण्याची सला न केली की ठीकच आहे परंतु फौजेत बारूद गोळ्याचा मेळ असावा याकरिता स्वारीतून गोळे पाठउन तुम्हावर दारूची वरात केली आहे. त्याप्रमाणे दारू खरिदी करून राजश्री विठल महादेव [जोग] दिा कंपू याजकडे पावती करून किल्याकडील वगैरे वर्तमान दरपे सुचवीत जाणे.' रा छ * २३ साबान. सुमा सलास अशर मयातेन व आलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पौ श्रा वा १४ भृगुवासर.
[४ सितंबर १८१२]

---

लेखांक [ १८५ ]

श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६९ भाद्रपद शुद्ध १४
[२० सितंबर १८१२]

नकल.

राजश्री राज जालमसिंगजी [झाले] गोसावी यासि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. जैपूरवाले हमदा [फिसाद] होउन नवाब महंमद शाह[१३२] यासी मुकाबला [ केला. ] हे वर्तमान कंपू यास कळताच त्याणी आपले तलबेची आडबीड सोडून नवाबाचे मदतीस दरकूच येताना किले रामपुरे

---

उचार मल्हारराव कां करीत आहेत ? [ ले. १८५, १८६, १९०, १९१ ] होळकरांच्या कैफियतींत याचें नांव आलें आहे पण त्याचा संबंध मात्र उमजत नाहीं.

(१३२) हा खान जातीनें अफगान असून अमीरखांच्या पेंढारीं दलास कवायत शिकविण्याचें काम त्याजकडे होतें. अमीरखांच्या सरशीबरोबर त्यानें एक निराळा कंपू निर्माण केला. या नंतर

नजीक मुा ठेउन सडी पलटणे घेउन पुढे जावे. धुडाड[१३३] प्रांती किले मजकूरी सरकार आमल बुणगे वगैरे ठेवण्यास प्रशस्त, हरयेक कामास किल्याचा साहेरा राहून रसद येण्याची सोहलत पडेल म्हणोन कंपुवाल्याचा विचार [ठरून] व या प्राच किलेवाल्यास सूचना लाविली. परंतु त्याणी विचार न करिता बाईसाहेबाचा[१३४] हुकूम येथे मुकाम करू नये, हीच निकड लावोन तोफा मारण्यास सिद्द जाहले. तोफ चालू जाहल्यास पुढील इराद्यास कमती पडेल ही सलाह लालसिंग याणे ठेहेरावोन वोढीस न पडता कूच करून गेले. सरकारात सविस्तरे वर्तमान दरपे कळत आहे. ऐसियासी परभारे किलेवाल्यानी आपली आकल खर्ची पाडली. यात सरकार तर्फेचा शुभा नवाबाचे मनात काये गेला आसेल? महंमद शाह खां व कंपूवाले सरकारनक्षावर नमूद त्याची हमराई कसी राहिली असेल! रजवाड्यात छलछिद्राचे पाहाणे. ते त्याचे निदर्शनास आलिया वर दबावाचा पर्याये कोणता? याचे मनन तुमचे व राजश्री लालाजी बलाळ याचे ध्यानात न यावे यैसे नाही. इकडे सर्वेपरी आपली खातरी सूक्त आसूक्त सुचविणे तसेच बरोबर राखणे येविसी वडीलपणे तुमच्या भरवसावर व लालाजीबाबाही सर्व जाणोन असता प्रसंगास आसे व्यत्यय टाळून तुमचे दौलतीविसी जपणे याचा देशावरात बाह्यात्कार प्रस्फोट होण्याची कसर कोणती राहिली? राजश्री नवाब आमिरूद्दौले[१३५] सर्व विचारे दूरंदेसी. किलेवाले याचे आचारावरून त्याचे मनात दुसरे यावयाचे नाही. कदाचित आले असता त्याचे माथा वोझे व राजश्री नवाब गफूर खां[१३६] समजवान, तेव्हां वाकडे मोजतील असे नाही. कंपु व फौजेत चहू घरचे च्यार. ते आपलाले जागा आणखी

---

तो कांहीं काळ शिंदेशाहींत राहून परत होळकरांकडे गेला.] [Prinsep's Amir Khan page 112, 120, 180, 237, 273, 275.]

(१३३) उदेपुरचे मेवाड, जोधपुरचें मारवाड तसेंच धुंढाड हें जयपुरराज्याचें जुनें नांव होय. या नांवाची एक लहान नदी जयपुरराज्याच्या मधोमध वहात असल्यामुळें त्यास हें नांव प्राप्त झालें असावें.

(१३४) लाडाबाई व तुलसाबाई या दोघींच्या नांवाचें पत्र मागें आलें आहे. [लेखांक १७४] त्या दोघींपैकीं 'बाईसाहेब' किंवा 'बयासाहेब' म्हणजे अमकीच असें निश्चित समजत नाहीं पण 'मातोश्री' हे विशेषण ज्याअर्थी आलें आहे तेव्हां ती बहुधा मल्हारराव होळकर यांची मातोश्री [लाडाबाई] असावी. [लेखांक १८६]

(१३५) नवाब अमिरुउद्दौला महमद अमीरखां पठाण पेंढारे.

(१३६) नवाब गफूरखां हा अमीरखां पेंढाऱ्याचा नातेवाईक असून त्याचा जो 'धडा' होळकरशाहींत होता त्याच्या खर्चास हा जावरा महाल होळकरांनीं लाविला होता तोच इंग्रजानीं त्याजकडे चालू ठेविला. अशा प्रकारें हें जावऱ्याचें मुसलमानी राज्य अस्तित्वांत आलें व तें होळकरांचें अंकित आहे. [Aitchison vol. iv page 337]

मनात आणिले तर मसलत जड भारी पडून रजवाड्यात दरज दृष्टिस पडल्यास ते आपले काबूस चुकणार नाहीत. याचा अंदेसा तुम्ही [ व ] लालाजीबाबानी न केल्यास दिवस मानाचे महातम ! आस्तु. सरकारातून किले मारची जप्ती चिरंजीव परशराम होळकर याजकडे सांगोन पत्रे रवाना जाहली आहेत. सरकारनक्षाचा भार श्री मार्तंडावर.[१३७] त्याचे कृपेने आजपर्यंत निर्वाह जाहला. पुढे आवलंब सर्वेपरी तोच आहे. इतके विस्तारे लिहिण्याचे कारण, आजपावेतो तुमचे जपण्यामुळे पडले नाही. याचे मनन मारनिले सहित राहून मुनासब दिसेल तैसे घडावे. तीर्थरूप मातोश्री बयासाहेबाचा हुकूम किले वाले यास पोहोचला त्याचे पत्र चिठी कांही शाबूद असल्यास जाहला विचार ठीकच मोजण्यात येईल. यास्तव [ ते ] चिठी पत्र पाठउन द्यावे. रा छ * १३ रमजान. सुा सलास आशर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. मा सुध.

---

लेखांक [ १८६ ] श्रीम्हाळसाकांत * संवत् १८६९ भाद्रपद वद्य ७

[ २७ सितंबर १८१२ ]

श्रीमंत राजश्री मल्हारराव होळकर याचे पत्र

राज [ जालमसिंग ] साहेबाचे नावे [ आलें ] त्याची नकल.

रामराम विनंती उपरी. जैपूरवाले यानी नवाब महमदशाह खां यासि भोमगडात[१३८] लडाईचा मुकाबला सुरू केला. त्याचे मदतीस लालसिंग कंपूसुधा येताना किले रामपुऱ्या नजीक मुकाम ठेउन सडे पलटणे करून पुढे जावे, बहिर बुणगे किल्या नजीक राहील, त्याचा उपर ठेउन पलटणाकडील रसदेचा पुरावा आसावा, सरकार जागा जाणोन आसा विचार ठराउन किलेदाराकडे सांगून पाठविले. त्यानी आपले जागा हुशारी करून बाईसाहेबाचा हुकूम नाही म्हणोन तोफा फिरउन कंपूवाल्याचा

---

(१३७) जेजूरीचा खंडोबा किंवा श्रीमार्तंड किंवा म्हाळसाकांत उर्फ लक्ष्मीकांत हें होळकरांचें कुलदैवत होय. होळकरांच्या सिक्यांत व पत्रांत श्रीकाराबरोबर तें बहुधा सर्वत्र आलेलें आहे.

(१३८) भोमगड हें नकाशांत सांपडत नाहीं. पण तें टोंक [ रामपुरा ] परगण्यांत असावें. कारण येथील किल्याचा जीर्णोद्धार होऊन त्यास अमीरगड असें नांव पडलें व तेथें अमीरखां याचा महाल आहे असें वर्णन आलें आहे. [ Prinsep's Amir Khan, page 67 ]

मुकाम राहू न देता इसरद्यावर[१३९] चांदसिंग त्याचे रसदेस अडथला वगैरे कोणते येक घडले नाही. येविसी सविस्तरे वर्तमान सरकारात कळत गेले. ऐसियास तीर्थरूप मातोश्री बयासाहेबाचा हुकूम पुढे केला. यात नवाब अमीरुद्दौले याचे मनात विनाकारण व्यत्यय किती आला व महमद शाह खां कंपूवालेसुधा सरकारनक्षावर सख्त ते किल्या नजीक राहू पावले नाहीत. त्याचा दबाव व रवाब किती राहिला ! रजवाडी प्रकार छलछद्मास पुरकस पाहणार तसी वर्तनूक करणार. त्याजला येवढी मोठी दरज सापडल्यावर हामराह कसे होणार नाहीत ? यात नक्षाची नोक जाउन नवाब अमीरुद्दौले व महंमद शा[ह] खां यास प्रस्थाव्याचे कारण पडल्यात कसर कोणती राहिली ? तुम्ही व राजश्री लालजीबाबा सरकार लक्षात इकडील जपणे येथील लोभ रजवाड्यात प्रसिद्ध आसोन लोभाचे जागा किल्यावाल्यानी जाब बदलून केला. या व्यवहारात इकडील खातरी तुमचे राखणे देशावरचे दिसण्यात तथा राहिली न राहिली ? याचा विचार तुमच्या व लालजीबाबाच्या ध्यानी न यावा अशातील [ प्रकार ] नाही. मातोश्री साहेबाचा हुकूम पोचला त्याचा दस्तायेवजही असेल. तदन्वये प्रसंगानुरूप पुरवणीही घडेल. अस्तु. नीट दिसेल तसे केले. किले मार येथील जप्ती चिरंजीव परशराम होळकर याजकडे सांगून ता॥ गरोठ येथील घालमेल करण्यात आली. [तिकडील] पैरवी दिसली तैसा वोघ ठेवणेही प्राप्त झाले. येथवर येउ नये परंतु दिवसामानाचे विपर्यास ! तेव्हां दुरंदेसीचे जागा विशेष लिहिणे ते काये ? मुनासब दिसेल तैसे केले असेल. रा॥ छ * २० रमजान. सुा सलास अशर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती. मोर्तब सुद.

---

चेखांक [ १८७ ]

श्री म्हाळसाकांत * संवत् १८६९ कार्तिक वद्य १४

[ २ दिसंबर १८१२ ]




राजश्री राव बिसनसिंघजी संस्थान बूंदी गो यां.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होलकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. 'वेदमूर्ती राजश्री राजाराम जोसी याचे विा सरकार यैवज ठरांवात आला. त्या प्रा॥ फडचा व्हावा

(१३९) इसरदा हा गांव बनास नदीच्या पश्चिमेस व सवाई माधवपूरच्या वायव्य दिशेस १० कोसांवर आहे.

यास्तव मारनिले संस्थानी येउन येक मास होउन गेला. त्याजला यैवजाचा ठिकाण लागू न देता आजचे उद्यावर टाकून टाळाटाल होत आहे' म्हणोन सरकारात विदित जाहले. यैसियासी जोसीबाबा यासि बोलण्यात आले आहे त्याप्रमाणे यैवजाचा फडचा करून देणे. यावर दिकतीचे जाब करून दिवसगत लागल्यास स्वारींतून न्‍ राजश्री आनंदराव राजाराम याजला लिहिण्यात आले आहे. त्याप्रमाणे मारनिले संस्थानचे जाग्यात आमल करून वसूल घेतील. येथवर न येता जिनसीकडील यैवज देउन बाकीचा यैवज राजाराम जोसी यांजकडे निकाल करून देणे. सरकारांत चित्याची[१४०] जोडी चांगली सत्वर पाठउन देणे. रा छ * २७ जिलकाद. सुमा सलास आशर मयातेन व अलफ. ।॰ बहुत कायलिहिणे हे विनंती. (मोर्तब सुद)

---

लेखांक [ १८८ ] श्री ।॰ म्हाळसाकांत * संवत् १८७० वैशाख शुद्ध ३

[ ३ मे १८१३ ]

(श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर यशवंतराव सुत मल्हारराव होळकर)

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरी. सरकारात बोढीचा प्रकार यास्तव कोटे मुकामी राजश्री राज जालमसिंगजी तेथे आसता राजश्री बालाराम आगरवाले व विठल महादेव [ जोग ] याची रवानगी स्वारीतून जाली व राजश्री नवाब गफूर खां व माधवराव गोविंद तेथेच होते. महालसंबंधी च्यार रुपये उभयेताकडील देणे, त्याचा पर्याय निघोन पुढे आणेखी च्यार रुपये घ्यावे येविषई आज्ञा अन्वये कारभारी यानी बोलणे केले. त्यात कोणताही व्यत्यय न आढळता राज जालमसिंघजी याचे म्हणणे दोहीकडील[१४१] जाबसाल येकविचारचे घडेल. त्या खात्रीवर हाली नवाब गफूरखां व विठल महादेव [जोग] यांची रवानगी जाली. राजश्री माधवराव गोविंद तेथे होते. गरोठच्या यैवजाबद्दल साल मारी महालचा यैवज येणे तो लाउन देण्यात येईल. [ पण ] पूर्वसंकेताप्रमाणे आणखी च्यार रुपयाचे काम करावे. याप्रमाणे त्रिवर्गाचे बोलणे पडले आसता कोटे मुकामचा जाब कोणताही न राहता बोढीचा प्रकार बोलण्यात आला.

---

( १४० ) महादजी व दौलतराव शिंद्याप्रमाणें शिकारीचा नाद मल्हारराव होळकरांसही होता असें स्पष्ट होते.

( १४१ ) शिंदेहोळकर यां उभयतांकडील.

ऐसियासी सरकार चाकरीविषई तुमचे लक्ष याचे निदर्शन [मागे] घडत आले, तोच क्रम चालून दिवसेदिवस प्रत्यये यावा, हे मनोगत आसोन वोढीचे [जाब] करण्यात तुम्हास काय प्रशस्त वाटले असेल न कळें ! विचार केला तो समजून करून तुटला जाब जाला असे दिसते. असो. साल मजकूरी महालचा यैवज येणे यात गरोठ व नेमणूकी खर्च वगैरे जाईल. राहता मागील हिसेब होउन बाकी देणे निघाली आहे. त्यास पुढे निखालस तुम्हास महाल करणे नाही हे खचित दिसल्यात आले. तेव्हां सरकारातून महालचा बंदोबस्त होउन दोन [म]हिन्यात मागील तुमचे कारकीर्दीचा आकार समजून सरकारी वाजबी ऐवज तुम्हाकडे येणे निघेल तो मागील देण्यात वजा जाउन बाकी तुम्हाकडील देणे निघेल त्याची शकल काढून ज्यात तुमचे यैवजाची निर्गती सत्वर घडेल तेच सरकारातून घडण्यात येईल. रा छ * २ जावल. सुरुसन सलास आशर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

पैा वैशाख शुा ९ रवीवार
मुा छावणी समत १८६९.
[९ मे १८१३]

---

लेखांक [ १८९ ] श्री म्हाळसाकांत * संवत् १८७० वैशाख वद्य २
[१७ मे १८१३]

श्री म्हाळसाकात चरणी तत्पर यशवंतराव सुत मल्हारराव होळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरी. किले रामपुरा प्रांत दुडाड येथील मामलत खासगीचे गांवसुधा बमये किला तुम्हाकडे होती ते दूर करून पेश्तर सन आर्बा आशरचे सालापासोन चिरंजीव परशराम होळकर याजकडे काम सांगावयाचे ठरून हे पत्र तुम्हास लिहिले असे. तरी तुम्ही पाो मार बमये किला जकीऱ्यासुधा व खासगीचे गांव येथील दखलगिरी न करिता किला जकीऱ्यासुधा महाल चिरंजीवाचे जिमेस करून पावती घेउन हुजूर पाठवणे. रा छ * १६ जमादिलावल. सुा सलास अशेर मयातेन व आलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब सुद

बार.

---

लेखांक [ १९० ]

श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८७० वैशाख वद्य १०

[ २५ मे १८१३ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर य
शवंतराव सुत
मल्हारराव हो
ळकर

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरी. किले रामपुरा येथील मामलत चिरंजीव परशराम होळकर याजकडे सांगितली आहे. त्याप्रमाणे चिरंजीवाकडे किले मारसहित आमला फैला जाला पाहिजे. महालसंमंधे च्यार रूपये तुमचे देणे [ निघते ] त्यास महालची रुजूवात होउन आलिया वर यैवजाचीही शकल निघेल म्हणोन पेशजी तुम्हास लिहिण्यात आले[च] आहे. हाली किले मारी कोणेविषई दिकत न पडे करिता तुम्हाकडील कारकूनास निकालस पत्रे जाउन परशराम होळकर याजकडे किल्यासहित आमलाची दखलगिरी होय ते करणे. रा छ * २४ जोवल. सुमा सलास आशर मयातेन व अलफ. ।' बहुत काय लिहिणे हे विनंती.

मोर्तब
सुद

पैा जेष्ट सुा ४ त्रितीये प्रहर बुधवार
समत १८६९ मुा छावणी.
[ २ जून १८१३ ]

---

लेखांक [ १९१ ]

श्री ।' म्हाळसाकांत * संवत् १८७० जेष्ट शुद्ध १

[ ३० मे १८१३ ]

श्री
म्हाळसाकांत
चरणी तत्पर य
शवंतराव सुत
मल्हारराव हो
ळकर

राजश्री राज जालमसिंघजी [झाले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो मल्हारराव होळकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावे विशेष. किले रामपुरा येथे चिरंजीव परशराम होळकर याजकडील कारकून ठाणे दखलगिरीस गेला आहे परंतु किल्याची जागा तेव्हां ठाणेदार दिकत करील. महालसंमंधे राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] याचे च्यार रूपये देणे त्यास जागजागाची रुजूवात होउन आलियावर सरकारचा यैवज मजरा घेण्यात येउन बाकीचे यैवजाची शकल निघेल म्हणोन पेशजी लिहिण्यात

आले आहे. त्याप्रमाणे मारनिलेसी बोलोन शमपुरा येथील ठाणेदारास सोडचिठ्या जाउन चिरंजीवाकडे आमला फैला होउन ये ते करावे. रा छ * २९ जावल. सुमा सलास आशर मयातेन व आलफ. । बहुत काय लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

लेखांक [ १९२ ] श्री । म्हाळसाकांत * संवत् १८७० जेष्ट शुद्ध १

[ ३० मे १८१३ ]

(श्री म्हाळसाकांत चरणी तत्पर यशवंतराव सुत मल्हारराव होळकर)

राजश्री बाळकृष्ण वासुदेव गोसावी यांसि

अखंडितलक्ष्मीआलंकृ राजमान्य स्नो मल्हारराव होळकर दंडवत. विनंती उपरी. किले शमपुरा येथील [ठाणे] सरकारातून चिरंजीव परशराम होळकर याजकडे सांगितले त्याप्रमाणे महाली कारकून रवाना जाला परंतु किल्याची जागा तेव्हां तुमचे पत्राचा आक्षप करतील. ठाण्यास दिकत करू नये म्हणोन तुमची पत्रे ठाणेदारास गेल्याचे श्रवणात आलिया वरून परभारे कारकून रवाना जाले. मा[हा]ल संमधे च्यार रुपये देणे [निघतात] त्यास जागजागाची रुजू वात होउन आलियावर सरकारचा यैवज मजरा घेण्यात येउन तुमचे यैवजाची शकल निघेल. या अन्वये पेशजी लिहिण्यात आले आहे. रुजूवात होउन आली म्हणजे बेताप्रमाणे यैवजाचाही मार्ग निघून येईल. किले मारी ठाण्यास दिकत न पडता तुम्हाकडील ठाणेदारास निकडपत्रे जाउन दिकत न होता चिरंजीवाकडील आमला फैला होउन ये ते करणे. रा छ * २९ जोवल. सुमा सलास आशर मयातेन व अलफ. बहुत काय लिहिणे हे विनंती.

(मोर्तब सुद)

पो जेष्ट शुा ६ भृगुवासर.

[ ४ जून १८१३ ]

लेखांक [ १९३ ] श्री * संवत् १८७० श्रावण वद्य ८

[ १९ अगस्त १८१३ ]

राजश्री लालाजी बलाळ [गुलगुले] गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो परशराम होळकर दंडवत विनंती उपरी. सरकार आज्ञा प्रो जिनसीतून रामगोल बुंधेले लोका पो शंभर माणसाची

निशाणे किले रामपुऱ्याचे कामगारी आपणाकडील कारकून राजश्री आबाजी कृष्ण नजीक बिजोला[१४२] याचे मुा आले त्याज समागमे पो. त्याचे वीस रोज पो लोकास खर्चास कस्बे पाटणचे मुकामी जुने बूंदी शिका पावणे दोनसे १७५ रूये इकडील कारकून राजश्री मल्हार नारायेण याचे विद्यमाने भरून पावलो. मिती श्रावण वाा ८. कळावे बहुत काये लिहिणे ही विनंती. हस्तआक्षर मल्हार नारायेण निा सरकार.

---

लेखांक [ १९४ ] श्री * संवत् १८७० भाद्रपद शुद्ध ७

[ २ सितंबर १८१३ ]

नकल

राजश्री बाळकृष्णरावजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो परशराम होळकर दंडवत विनंती उपरी. येथील कुशल ताा छ * ६ रमजान मुकाम नजीक झालचीवोरदा [?] जाणून स्वकीये कुशल लिहित जावे विशेष. जिनसी पलटनचे कूच बिजोल्याहून लाखेरीकडे जाले. दरम्यान मार्गात प्राा पाटण येथील गांवची नुकसानी होईल याचा बंदोबस्त व्हावा म्हणून आपले पत्र व गंगाराम हवालदार येउन फौजेचे घांसदाण्याबदल हवालदार याचे विाा ठरले १००० रूपये. येकुण येक हजार जुने बूंदी शिका घांसदाण्या बाा गंगारामा चे मार्फतीने पावले आसेत. बहुत काये लिहिणे समत १८६९ हे विनंती.

---

लेखांक [ १९५ ] श्री * संवत् १८७० भाद्रपद मास

[ सितंबर १८१३ ]

राजश्री बाळकृष्ण वासुदेव कमाविसदार गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्ये स्नो परशराम होळकर दंडवत विनंती उपर. किले रामपुरा येये जेपुरवाल्याचे दग्यामुळे निशान २ आाा १०२ पाा त्याचा वीस रोजा सरकारातून बांधून दिला त्या प्राो पावती महाल चलणी माधवपुर शिका ५०० रूये

१७५ गुाां आबाजी कृष्ण मुा पाटण तेथे कबज दिल्हे आहे ते रद आसे

३२५ किले मजकूरी गुाा बापूजी पांडुरंग

---

५००

येकुण रूा पांचसे माधवपूर शिका गुा मल्हारराव नारायेण निा फडनीस याचे विदेमाने पावले. इा छ मिती श्रावण वा ६ ता भाद्रपद वा २ रोज २६. कळावे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

---

लेखांक [ १९६ ] श्री * संवत् १८६९ अश्विन वद्य ५

[ २४ अक्टुबर १८१२ ]

नकल.

राजश्री बाळकृष्णरावजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो परशराम होळकर दंडवत विनंती उपरी. पाो रामपुरा बमये खासगीची जप्ती सरकारातून आम्हा सांगितली. जप्ती चे कामावर कारकून पाठविला. आगोधर जेपुरवाल्याचे वैद्याकरिता आपण बुंधेल्याची माणशे १०० सरकार आज्ञे प्रा बोलाविलेच होते. जप्तीमुळे बुंधेलही तेथेच राहिले. कारकून व बुंधेल्याकडे पाो मारचे गांवा पाो [सायर] चोत्र्या ऐवजी मा राजश्री बापूजी पांडुरंग हस्ते राजेश्री नरसो त्रिंबक व मल्हार नारायेण कारकून निा बुंधेले याचे मा ऐवज पडला रूये

७५ करवाडया पाो
४५ सोप
७९ उखलाणा
३० बामण्या
५० पचाल्या
२० नांदया
२५ रहादारी पाो
४० बिलोता

---

३६४॥।≡

येकुण तीनसे चवसष्ट रूये पंधरा आणे जिनसीकडे आदा आसे. मिती आश्विन वद्य * ५ दक्षणी. सुमा सलास असर मयातेन व अलफ. समत १८६९. बहुत काये लिहिणे लोभ करावा हे विनंती.

---

लेखांक [ १९७ ] श्री * संवत् १८७१ आषाड वद्य ५

[ ७ जुलै १८१४ ]

राजश्री बाळकृष्णरावजी गोसावी यांसि.

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नो परशराम होळकर दंडवत विनंती उपरी. किले रामपुरा येथील मामलत सरकारातून तुम्हाकडे होती. तेथे किल्याचे दास्तान पाो तुम्ही जोरी मन फुरोक्त केली. तो यैवज तुम्हापासी जमा माधोपुर सिका ५२८।।।७।। रूये. येकुण पांच से अठावीस रूये तुम्ही माधवपुर सिका राजश्री वामनराव मल्हार कारकून याचे विाने कंपणीवाल्याकडे देविले ते आम्ही भरून पावलो. मिती आषाढ वाा * ५ संमत १८७० मुाा किले मार. बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनंती.

---

लेखांक [ १९८ ] श्री [ १८१४ ]




× हिल त्याज × पासोन चंदी वा × चौधरी वकील यानी केला × × रोजीना तेथे चंदी सवाशे रुपये लागत गेले त्याजला पनास रुपये × × गेला. याज मुळें पागेचे चंदीचा हिसेब पाहता आडीच हजार रुपये घेणे राहिला आहे व दरबारखर्चा बदल रुपये ३००० सरकारातून वरात हुजरातीकडेच लाउन दिल्ही. हा ऐवज दो हपत्यानी खातरखां हावाला चौधरी व वकीलाने घेतला आसोन रा सदरदीन हवालदार व पागनीस याजकडे एवज दिल्हा नाही म्हणोन त्यावरून हे पत्र लिहिलें असे. तरी हुजरातकडे ऐवज माघ मासचे हप्त्याचा व वकील चौधरी यानी करार करून गेले आसतां आद्यापि बोभाट आहे हे चांगले नाही. यापूर्वीचे हप्त्याचा ऐवज येणे त्याचे एवजाकरिता पागा राहिली. त्याजला चंदी पौष शुद्ध ११ येकादसी पासोन शे सवासे लागेल तीसी द्यावी तीही गोष्ट न घडली. पनास रुपये देत गेला असल्यास तितक्याने चंदी जालीच नाही. त्याचबद्दल आडीच हजार रुपये घेणे हे त्याजला कधी पावावे ! दरबारखर्चाची ऐवजाचा जिमा चौधरी करून गेले आसतां हवलदार व पागनीस याजकडे एवज त्यानी दिल्हा नाही याचे कारण काय ! चौधरी [ अपूर्ण ]

# व्यक्तिसूची.

# स्थलसूची.

# टीपांचें शुद्धीपत्र.



| टीप | पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| १ | २ | १० | हें | हें पत्र |
| २ | २ | ३ | असला | असेल |
| ३ | ३ | २ | या पूर्वी | यापूर्वीं |
| ५ | ४ | ६ | टपका | ठपका. |
| २५ | २६ | ५ | होलकरांचे | होळकरांचे |
| ३७ | ३५ | ४ | मडसमसा बाद | मउसमसाबाद |
| ,, | ,, | ८ | संबंधी | संबंधीं |
| ३९ | ३९ | १५ | निवाडापत्र | निवाडपत्र |
| ,, | ,, | १९ | संबंधात | संबंधांत |
| ४३ | ४४ | ९ | पाहिजें | पाहिजे |
| ८५ | ७१ | १ | अर्थाचे | अर्थाचें |
| ८९ | ७९ | १ | श्रत | श्रत |
| १०८ | १०७ | ७ | अह्लवयी | अल्पवयी |
| १४८ | १४५ | २ | होते | होतें |

श्री



# पूर्वपानिपतीय शिंदेशाही.



'शिंदेशाही इतिहासाचीं साधनें 'शोधण्याची प्रवृत्ति होऊन ती प्रकाशित करण्याची इच्छा प्रबल झाली त्यापरी यथामति प्रयत्न केले. पण परिणामीं साधनसाहित्याचें विशाल स्वरूप पाहून स्वसामर्थ्यानुसार स्वेच्छाचार मर्यादित करून चिटोरात्मक प्रांतात प्रवेश करणें प्राप्त झालें. त्या प्रदेशांतील परिश्रमणप्रकार प्रगट करण्याचा परिपाठ पत्करला असला तरी हा प्रसंग फलद्रुप केला पाहिजे अशी स्नेहाची सूचना मिळाल्यामुळें विवश होऊन आपणांसमोर केवळ एक शब्दाविषयीं दोन शब्द बोलावयाची संधी घेत आहे.

२. शिंदेशाही हा तो शब्द होय. ही शाहीं निर्माण होऊन दोन शतकें संपूर्ण[1] झाली. हें तिसरें शतक चालू आहे. पहिलें उत्कर्षाचें तर दुसरें अपकर्षाचें द्योतक आहे. या तिसऱ्या शतकांतील पिंड भवितव्यतेच्या उदरांत अदृश्य आहे. भविष्याशीं संसर्ग नसून भूतकालाविषयीं प्रस्तुत प्रयोजन आहे. अर्थात् वरील चार अक्षरापुरतीच विषयव्याप्ति परिमित करणें प्रशस्त आहे. शिंदेशाही या सामासिक शब्दांतील पूर्वार्धाविषयीं कोणास फारसा प्रत्यवाय वाटणार नाहीं पण उत्तरार्धासंबंधीं कदाचित् प्रश्न पडेल. किंबहुना जी कालमर्यादा दर्शविली आहे त्या विषयीं साशंकित होऊन कित्येक पृच्छाही करूं पहातील. यासाठीं तत्संबंधीं संक्षेपतः स्पष्टीकरण करणें इष्ट आहे आणि तें सप्रमाण सिद्ध करतां यावें अशी धारणा धरली आहे ती कितपत साध्य होतें हें सर्वमान्य सभासद व उपस्थित सज्जनावर सोपवीत आहे.

३. वस्तुतः शिंदेशाहीबद्दल विचार कर्तव्य असला तरी या शाहीला स्थापणारे जे शिंदे त्यांच्या संबंधीं साहजिकच सिंहावलोकन करणें प्राप्त होतें. शिंदयांचा अर्वाचीन—म्हणजे स्वराज्यस्थापने पासूनचा—इतिहास साधनें असतांही निर्माण झाला नाहीं. मग त्यांच्या प्राचीन इतिहासाविषयीं जिज्ञासा काय धरावी ? शिलालेख, जुने ग्रंथ, जुनी काव्यें तथा जुन्या बखरी इत्यादि साधनान्वयें शिंदयांचा प्राचीन इतिहास लिहितां येणार नाहीं असें नाहीं. पण अद्यापि तिकडे लक्ष वेधल्याचें दिसत नाहीं. आमच्या पुरातत्वसंशोधनाची मर्यादा संकुचित असून शिंदयांच्या पूर्वपीठिकेचें क्षेत्र सीमेबाहेर पडल्यामुळें तिची कार्यक्षमता प्राचीन इतिहास जुळविण्याचे कामीं अपुरीच

---

(१) पारसनीस शिंदे शकावली पान १.

पडते. नाहीं म्हणावयास भारतपुरातत्वसंशोधनाची सोय आहे, शांततेचा सुकाळ आहे, **शिंदे** या अडनांवाचे सरदार व वतनदार आहेत, शिंयांचें राजघराणें विद्यमान आहे. अल्पस्वल्प साधनें प्रत्येकाकडे संभवनीय आहेत. सारांश इतिहासासारख्या सत्कार्यांत संघटन होऊन शोध करण्याची स्फूर्ति मात्र शेष आहे. शेषाभिमानी शिंदे हा आक्षेप निःशेष करतील अशी आशा वाटते. कारण कीं **चिंतामणराव विनायक वैद्य** या सारख्या विद्वानाचे यत्न त्या दिशेनें वाहूं लागले, तेव्हां स्वयम् **शिंयांचें** लक्ष स्वभावतः वेधलें पाहिजे. **वैद्यांच्या** शोधाचें सार असें आहे की, '**शिंदे** हे प्राचीन काला-पासून **लढवाई मराठे** म्हणून प्रसिद्ध आहेत. **शिंदे** हा **सेंद्रकाचा प्राकृत उच्चार असून**. बादामीच्या पूर्वचालुक्यांच्या वेळेस ते **सेंद्रक** म्हणून प्रसिद्ध होते. **कर्नाटकचे शिंदे** व **कऱ्हाडचे शिंदे** अशा दोन **शाखांचे** शिलालेख उपलब्ध असून या लेखांत मूळपुरुषाची उत्पत्ति भिन्न भिन्न रीतीनें सांगितली आहे. तिचा ऐतिहासिक रीतीनें मेळ घालतां असें म्हणतां येईल कीं **अहिछत्राजवळच्या देशांतून शिंदे** हे उत्तरेकडून आलेले आर्य क्षत्रीय आहेत. किंबहुना **शिंयांच्या** मुद्रेंत नागाबरोबर **सूर्य** दाखविला जातो तेव्हां हें मूळचे **सूर्यवंशी** (?) क्षत्रीय असावेत असें अनुमान निघूं शकतें.[२]

हा **वैद्यांचा** अभिप्राय झाला. **आलीजाह माधवराव शिंयांचे** चरित्रकार **नातू** हे '**शिंदे**' हा '**शिसोद्याचा**' अपभ्रंश[३] लेखितात. पण यास त्यांनीं आधार दाखविला नाहीं. अस्तु. **वैद्य** अथवा **नातू** यांपैकीं कोणाचाही अभिप्राय सिद्धांत ठरो त्याशीं तूर्त कर्तव्य नाहीं. पण स्वयम् **शिंयांची** स्वतःसंबंधीं साधारणतः समजूत काय आहे हें सांगितल्यासिवाय पुढें जाववत नाहीं.

४. 'मूळपुरुषापासून उत्पत्तीची वंशावली. **मंद्राचेल** पर्वताखाली **बाले** निवाली **बारा**. त्यात **शिंदे सोमवंशी नगर कोंडण्यगड**. संकोचन त्रिकाल संध्या, सिखासूत्र येज्ञोपवीत. गायत्री अष्टपद, वेयेद रूगवेयेद, शाखा अस्वलायेनी प्रवर सिंधू. **कुलस्वामी शेष**. भूषण छेत्र सिंव्हसन. निशाण सर्व लाल, **ध्वजेचे** मधे **शेष**. त्याचे गोत्रज तेरा कुलीचे. देवी उपासक. **जावळे शिंदे** [किताब रविराव समसेर बहादर] **बैस रजपूत क्षेत्र** वास्तव्ये **दिडियाखेड** येथून **दक्षिणेस** आले.' असें **लोणीकर**[४] **शिंदे** [रविराव] याचे कागदांवरून कळतें. गंगापार दिंडियाखेड, दुंडियाखेड अथवा **बैसवाडा** येथून **शिंदे दक्षिणेस** आले व ते **बैस रजपूत** आहेत अशी सर्वांची प्रामाणिक समजूत आहे **गुंजणमावळचे** देशमुख **सिलिमकर**[५] हे **शिंदे** असून तेही हीच साक्ष देतात. **बैसवाड्यांतील रजपूत**[६] देखील स्वतःस **चंद्रवंशी** लेखितात. **महिकावतीची बखर** हेंच सांगते[७]. **शिंयांचे** मुद्रेत केवळ **सूर्य** नसून **पानिपतपर्यंत सूर्य** व **चंद्र** दोनी[८] सांपडतात. **चंद्राचा** लोप[९] त्यानंतर झालेला आहे. संशोधकांसाठीं ही समस्या श्रेयस्कर वाटली म्हणून सुचवीत आहे. **तिचा संदर्भ सुसंबद्ध किंवा असंबध आहे हें ते ठरवितील.**

---

( २ ) शिंदेशाही इतिहासाचीं साधनें भाग १ राजचिन्ह पृष्ट १०.
( ३ ) नातूकृत महादजी शिंदे पृष्ट १४.
( ४ ) गुलाबराव रविराव शिंदे लोणीकर यांची वंशावली.
( ५ ) राजवाडे खंड १७ लेखांक २.
( ६ ) रुद्रसिंह तोमरकृत रुद्रक्षत्रिय प्रकाश पृष्ट ५५.
( ७ ) राजवाडे महिकावती बखर पृष्ट २५.
( ८ ) शिंसाधनें भाग १ राजचिन्ह व लेखांक २२४ ते २८६.
( ९ ) महादजी शिंदे यांचा सिक्का.

५. **शिंदे** या उपनांवाचा स्वतंत्र [१०] उपयोग होऊ लागला त्यासही बराच काळ होत आला आणि तेव्हांपासून या नांवाचीं अनेक घराणीं महाराष्ट्रांत वावरत आहेत.[११] किंबहुना बैंधांनीं वर्णिलेलें वैशिष्ट (शौर्य) प्रामुख्यानें त्यांचे अंगवळणी मुरलेलें दिसतें. त्यांपैकीच **कन्हेरखेडकरांची** एक शाखा होय- या शाखेंतील **मूळपुरुषाचें** नांव **महादजी शिंदे** असें सांपडतें.[१२] हा पाटील **महाराज महादजी शिंदे** नसून त्यांच्यापासून सात पिढ्यापूर्वीचा पूर्वज होता. **कन्हेरखेड** या गांवाची वसाहत करून तेथें **कनेरेश्वर** महादेवाची स्थापना केली व वतन मिळवून त्यानेंच वास्तव्य केलें असावें असें वाटतें. तेव्हांपासून या शाखेस **कनेरखेडकर** असें नामाभिधान प्राप्त झालें असलें पाहिजे. या मूळपुरूषापासून **राणोजी शिंद्यापर्यंतो वंशावली** दिली आहे ती पहावी. हेच **राणोजी शिंदे** या **शाहीचे संस्थापक होत.**

६. यांचे पूर्वींचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. तथापि 'मौजे **जेउर** पो **वांगी** येथील **पाटिलकी शिंद्याची** असून त्यांचे पदरीं मोतबीरी होती. ते **बिजापुरी** पातशाही चाकर होते. चाकरीचा धंदा सबब **अष्टपुतर** उर्फ **जगथाप** लहान मूल जवळ शहागा होता, त्याचे गुमास्तगीरी स्वाधीन केली. त्याचा पुत्र **रामोजी** याने निमकहरामी केली. त्यावर मोरा करून पारपत्य केले. सन १०२० मध्ये हाकिमाचा कौल घेउन गांव लाविला. पुढें कालदुकाल पडला. राजीबिराजी जाहली,' असें कळतें.[१३] या शाखेचा कन्हेरखेडकराशीं प्रत्यक्ष संबंध आहे असें सांगवत नाहीं. तसेंच **१०२०** असें जें वर्ष दिलें आहे तें हिजरी, **अरबी** किंवा **फसली** आहे तें उमजत नाहीं. **बिजापुरी** फसलीचा प्रचार [१४] होता असें **धरून** चाललें तर इसवी सन **१६११** येतो. तसेंच **विजापुरकराकडून** त्यांची नेमनूक **पेडगांव** [श्रीगोंदे] या भागास झाली असावी असें वाटतें. कारण कीं **पेडगांवीं** त्यांचें वास्तव्य **१७०७** चे सुमारें झाल्याचा बोध होतो. 'साल गुदस्त **जहागीर खाने** अजम **सिलेमान खान** यास गांव जहागीर होता. तो गांव तो **गनिमानी** लुटिला व लस्करचे बापरयाने गाववार देहीची बाकी जाली. त्यावर साल मजकूरी **जागीर खाने** अंजम **यासीन खानास** गांव जाला व **बादशहाचे** लस्कर **अहमदनगरास** आले. सेकदराने कौल देउन वसाहत केला. येसियास **पातसाह नगरी** फोती जाले. लस्कर उठोन **दिलीकडे** गेले. मग गनिमाची धामधूम जोर जाली. गाव खराब. तिसरी तकसीम दिली आसे. सेत व घरवाडा **सिंदिया सेजारी** यास हद मोहदूद पूर्वेस × उत्तरेसी × पश्चमेसी × दक्षिणेसी **शिंदे** येणे प्रो असे. **पाटिलाची इनामी** बीघे आहे त्यातून इनामात देउन वाटिया निघोन जो माल आहे तो बमूजिब शिरस्ता **पाटील शिंदे** या मार्गे घेणे.'[१५]

सरळ, स्पष्ट व संगतवार सुगावा लागत नसला तरी सार असें निघूं **शकेल** कीं **कन्हेरखेडकर शिंद्यांपैकीं** एक शाखा **बिजापुरी** चाकरीस होती. तिचे पदरी **'मातबरी'** असून ती **शहाजी** राजे **भोसले** याची **समकालीन** होती. ज्या भागात नेमणूक झाली तेथें पाटिलकीचीं वतनें संपादन केलीं.

---

(१०) राजवाडे महिकावती बखर प्रस्तावना पृष्ठ ३.

(११) कन्हेरखेडकर, कोपकर, कोपर्डेकर, कुडाळकर, तांबुलकर, तोरगलकर, पारनेरकर, पिंगोरीकर, लोणीकर व सिलिमकर.

(१२) क्षीरसागरविरचित वंशावली परिशिष्ट १.

(१३) सुरत महजर तारीख १० रजब मुताबिक ४ जून १७५०.

(१४) राजवाडे खंड १५ लेखांक ४९

(१५) महजरनामा शके १६२९ सर्वजित नाम संवछरे वैशाख वद्य १३ अदितवार मुताबिक १८ मे १७०७.

पुढें त्यासंबंधीं जगथापासारख्या गुमास्त्यांच्या गुंत्यांत गुरफटल्यामुळें 'राजीबिराजीवर' गोष्ट गेली. पर्यायें पाटिलकीवर प्रपंच साधावा लागला, किंतु 'काळदुकाळ' पडल्यामुळें एका पाटिलकीहून दूसरी कडे स्थलांतरही करावें लागलें असेल तर नवल नाहीं.

**श्रीशिवरायानें** स्वधर्म राखून **स्वराज्य** स्थापिलें त्या समयीं या घराण्याची सेवा काय घडली याचा बोध होत नाहीं. वस्तुतः शोधच झाला नाहीं असें सांगणें जास्त सत्य होईल. **शिवाजीच्या** स्वराज्याचें विराट स्वरूप पाहून **औरंगजेबासारख्या सम्राटास** स्वप्नींही सुख संभवनीय नव्हतें. सर्व शक्ति समर्पण करून सगळ स्वराज्य नष्टभ्रष्ट करण्याचा त्यानें संकल्प केला आणि सतत दोन तपें तपश्चर्या करून **संभाजीस** ठार केलें, **शाहूस** बंदीवासांत घातलें. अर्धाधिक **महाराष्ट्र** काबीज केलें. **छत्रपतीपदाची सूत्रें राजारामांनीं** स्वीकारिलीं. शक्यतेची सीमा करूनही शेवटीं **जंजीस** त्यांना आश्रय घ्यावा लागला. स्वराज्यसूर्यास खग्रास ग्रहण लागलें. शरण जाऊन परतंत्राची स्मरणी स्मरावी किंवा स्वातंत्र्यासाठीं पाशुपताचा जप सिद्ध करून पूर्णाहुति द्यावी यासिवाय सोयच नव्हती. सत्वशील **राजाराम**, शूर सेनापती, सेनानी व सैनिक तस्मात शहाणे सुमंत यांनीं 'सर्वस्व स्वहः' करण्याचा जो संकल्प केला त्यातच मराठ्यांचें श्रेष्टत्व आहे. 'स्वधर्में निधनं श्रेयः' हें गीतेचें सूत्र स्वराज्याचा **मंत्र** होता. व त्याची सिद्धी व शक्ति **'सरंजामी'** या शब्दांत होती.

हा शब्द संस्कृत किंवा मराठी नाहीं हें सत्य असले तरी तें सैनिकाचें सांकेतिक [१६] शरसंधान असावें असें मला वाटतें. त्यासंबंधीं थोडी स्पष्टता करणें इष्ट आहे. '**सर अंजाम**' या दोन फारसी शब्दाचा अर्थ सर्वांस श्रुत आहेच. शिलेदाराचे तें सोबती व संवगडी असून त्यांचे लवाजम्यांत तें चालत आलें असलें तरी मूळस्वरूपापेक्षां त्यांचें **संस्कृत व मराठी** सांकेतिक **रहस्यच** ज्यास्त चित्ताकर्षक वाटतें. सरंजामी या परभाषीय शब्दावरील परार्थाचें शास्त्रीय डगलें भालेराई करून झुगारिलें तर '**सर ! अन जामि**' असें संस्कृत रूप होतें आणि त्याचें '**सर ! न जा मी**' असें शुद्ध मराठी भाषांतर निघतें. किंवा सैनिकाच्या अशुद्ध भाषेत '**सरन ! न जा मी**' असें एक तीसरें स्वरूप पहावयास मिळतें. पाहिजे ते घ्या. अर्थ एकच निघतो. ही कोटि शास्त्रोक्त आहे किंवा **असेल** असें सांगवत नाहीं पण ती किती सार्थ सूचक व समर्पक आहे हें लक्षांत असूं द्यावें. शिलेदाराचा स्वाभाविक संबंध सरंजामी पद्धतीशीं असला तरी ती सर्वस्वी दोषमुक्त आहे असें सांगण्याची सत्ता नाहीं. पण या **शाहीचीच** काय इतर विद्यमान **शाह्यांची** ती **जननी** आहे असें मात्र निःशंकपणें सांगू शकेन. [१७] इतकेंच नव्हे तर संकट समयीं **मराठ्यांनीं** संकल्प काय केला ? त्यांची शक्ति काय व शस्त्र कोणतें होतें ? **सम्राटास** उत्तर काय दिलें ? त्याचें स्वागत व शिष्टाचार कोणत्या रीतीनें केलें ? **मोगल** हताश होऊन त्यानें स्वर्गारोहण कशामुळें केले ? या सर्वांचें उत्तर एका शब्दांत हवें असेल तर तो हाच शब्द होय. सरळ बोलावयाचें म्हणजे **स्वधर्म, स्वराज्य व संस्कृती** या त्रैयीचें संरक्षण होऊन त्याचे **सम्राज्यात रूपांतर** करून **भारत इतिहासांत मराठ्यांस अजरामरत्व** संपादन **करून** देणारा परिस तो हाच होय.

या रणसंग्रामांत ज्या शूरवीरांनीं अतुल पराक्रम गाजवून आपली कीर्ति अमर करून ठेविली त्यांत **शिंद्यांचाही** समावेश होतो. **महिमाजी राजे शिंदे** यांचें नांव सांपडतें [१८] परतु कृति कळत

(१६) राजवाडे खंड १५ लेखांक २८० ते २८३ व २९२.
(१७) कोल्हापुर खेरीज करून इतर शाह्या.
(१८) राजवाडे खंड १५ लेखांक १७ खंड २० लेखांक २६०.

नाहीं. शाहाजी शिंद्याचें नांव नुकतेंच निदर्शनास आलें असून तो 'सेनाखासखेल' होता असें स्पष्ट[१९] आहे. नेमाजी राजे शिंदे याचे शौर्य व साहस तर सर्वमान्य[२०] आहेच. अनेक वेळां शत्रुसेना समुदाय फोडून मोगल साम्राज्यांत शर्तीनें शिरून स्वराज्याचें घोडयास त्यानें पाणी पाजलें. तसेंच माळव्यांत पहिली स्वारी करण्याचें श्रेय संपादिलें.[२१] ही गोष्ट स्मरणीय आहे. स्वसंरक्षणार्थ छापा घालून 'चकव्यांस' चित करण्याचा आद्य उद्देश होता हें खरें होय. तथापि मराठमोळयाची जी लाट या वेळीं उसळली तीच पुढें मराठी साम्राज्याची सूचक झाली असून त्यातच या शाहीचा उगम झाला.

कन्हेरखेडकर शिंद्यांचे नांव किंवा त्यांचा संबंध सिद्ध करतां येत नाहीं मग वरील वर्णन किंवा त्याचें विवरण करण्याचें कारण काय असा बहुतेकांस भास होत असेल तर तो साहाजिक असून अयोग्य नाहीं. कोणाशीं तरी बादरायण संबंध दाखवून समाधान करूं इच्छित नाहीं. केवळ भूमिका या दृष्टीनेंच दिग्दर्शन करवून या संधीस राणोजीचा जन्म झाला असें दर्शवीत आहे. 'फौजा जोरावर करून औरंगजेब (बली) घेण्यासाठीं[२२] 'जो यज्ञ चालू झाला त्याचा ध्वनी धडधडाट[२३] करीत होता आणि 'धड घोडे व धड माणसाचा' धावा[२४] महाराष्ट्र करीत होता त्यावेळीं धडपड करूनही शिलेदारी धर्म धारण करतां न आल्यामुळें राणोजी शिंद्यानें जर धडाडीनें[२५] 'बारगीरींत'[२६] धांव घेतली तर त्याविषयीं धन्यताच वाटते. बाळाजी विश्वनाथ भट यास 'सेनाकर्तेपद' प्राप्त झालें तेव्हां त्यांनीं राणोजीस खिदमतगारीवर[२७] घेतलें.

'खिदमतगार व हुजूरी याचा अर्थ 'क्षुद्र नोकर' किंवा 'पादरक्षाधर' असा करणें शुद्ध अज्ञान[२८] व अर्थविपर्यास[२९] होय. शब्दार्थ लावण्यासाठीं कर्म व करणी यांच्या गूढांत न शिरतां वरकरणी रूढार्थावर विसंबिलें असतां अर्थाचा अनर्थ कसा घडतो हा प्रकार या 'खिदमतगारी' बद्दल प्रेक्षणीय आहे. 'खिदमतगारी' शिंद्यांस उत्कर्षास्पद झाली म्हणून भूषणावह असली तरी तिचें मर्म न ओळखतां जो मतितार्थ माजला आहे तो मात्र मान्य नाहीं कारण सरळ आहे कीं शिवाजीच्या राज्यव्यवहार कोशांत त्याला मुळींच मान्यता नाहीं 'हुजूरी स्यातसन्निहितो,१५ परिचर्या तु खिजमतिः१७ खासदारः[३०] पादरक्षाधर इत्यनुवर्ण्यते'१८.

---

( १९ ) भाइसं मंडळ त्रैमासिक वर्ष ७ अंक १, ४ पान ८९ लेखांक ६.
( २० ) राजवाडे खंड १५ लेखांक १८, २० व इतिसंग्रह ऐगो क्रमांक ४६.
( २१ ) पुरंदरे भाग १ प्रस्तावना पृष्ट ७.
( २२ ) राजवाडे खंड १५ लेखांक २८३ व खंड २० लेखांक १८०.
( २३ ) राजवाडे खंड १५ लेखांक ४१, २८०, २८१, २८२, २८३, २९२, ३०३, ३४२ व खंड २० लेखांक १७८, १८०.
( २४ ) राजवाडे खंड २० लेखांक १७८, १८०.
( २५ ) इतिसंग्रह ऐटि भाग २ क्रमांक ३५.
( २६ ) भाऊबखर पान ४६. शिंसाधनें भाग १ लेखांक १ टीप २.
( २७ ) पारसनीस पत्रव्यवहार भाग ५ लेखांक ५९, ९३ व रानवडेकृत अप्रकाशित फारसी बखर.
( २८ ) Malcolm's Memoir vol. i. page 95.
( २९ ) Burwe's Ranoji Sindia page 32, 38, 39, 40, 42 & Madhav Rao Scindia By Bull Haksar page 12.
( ३० ) भाइसं. मंडळ शिवचरित्र प्रदीप पान १४५.

**पादरक्षाधरासाठीं** कोशांत **'खासदार'** अशी स्वतंत्र संज्ञा आहे. तिचा संसर्ग खिद्मती सेवकांस निदान स्वराज्यांत तरी स्पर्श करूं शकत नव्हता असा टकसाळी सिद्धांत आहे. त्याचें प्रत्यंतर पहावयाचें असेल तर त्यासाठीं स्वराज्यांतच शिरून निरीक्षण केलें पाहिजे. फार दूर जावयास नको. शिंद्यानंतर **'खिद्मतगारी'** करणारा **लिंगोजी माने** १७३१ ते १७३७ पर्यंत दृष्टीस पडतो.[३१] **त्रिंबकजी** व **हंसाजी** जासूद, **दादजी** नाईक, **विठोजी** अबदागीरा, **सोनजी** सराफदार' या सारखे मानी **मराठे बाजीराव** पेशव्यांच्या **' शागिर्दपेशांत ' खिदमतगारी** [३२] ' करीत आहेत त्याजकडे क्षुद्र दृष्टीनें पहावें कीं काय ? **लिंगोजी माने** मराठेशाहीची 'मुतालकी' **शिंद्याकडे** आणीत[३३] आहे. त्याच्या करणीची ही साक्ष स्वयम् **बाजीराव पेशव्यांची** झाली. **गंगाजी अवाड हुजरे'** हा **महादजी शिंद्यांच्या** सेवेत 'खिद्मतगारीवर' सुमारें दहा वर्षे पेशव्यांकडून होता. त्याची कृति पहा कीं तो इंग्रज व **मराठे** यांच्या युद्धासंबंधीं जें खलबत चालतें त्या मसलतींत हाजिर **असून फड**णीसाशीं प्रत्यक्ष पत्रव्यवहार करीत आहे, तसेंच **राज**पूतान्यांतील राजकीय धोरणाचा ऊहापोह चालला असतां भाग घेतो. फार काय युद्धांतील लुटीच्या यादी तपासीत फिरतो [३४] त्याचप्रमाणें [**महादजी**] **शिंद्यांच्या** सेवेतील 'दतु **हुजरा** हा स्वार व **इंद्रसेन** धाकटा [Anderson Junior] याजकडील 'मुनशीस घेऊन **खितोली** नजीक **गोहद** येथें **गाडर** ( Goddard ) याचे बुणग्याची **झांबडाझांबड** ' झाली असता 'त्याची तहकीकात करून समाधान करण्यास '[३५] जात आहे. असली **अनेक** उदाहरणें[३६] **देतां** येतील पण विस्तारभयास्तव मन आवरावें लागतें. सारांश 'खिद्मतगार व **हुजरे'** यांचा खरा अर्थ कोणता हे इतिहासच सांगतो तेव्हां 'प्रथम **राणोजी** बावांस **खिजमतगारी** सांगितली' ही [महादजी] **शिंद्यांची** अभिमानपुरस्सर वाणी[३७] किंवा इतिहासकारांची विचित्र कहानी यांपैकीं कोणती गोष्ट खरी याचा निवाडा इतिहासभक्तच करतील. तसेंच **मराठेशाहीच्या** पडत्या काळीं व तवारिखनामे 'फीफावल्या' वेळींसुद्धां **भोसल्यांच्या** कुलाचारांच्या 'जाबत्यांत[३८] खिद्मतगार' किंवा **'हुजुरी'** यांचा अर्थ 'पादरक्षाधर' असा मुळींच संभवत नसून पुढें तो कसा प्रचार पावला निदान चतुर चरित्रकारांना तरी तो कसा रुचला हें कोडें पूर्ण उलगडतील. एवढ्याचसाठीं **राजा, सेनापती व मंत्री** यांच्या सेवेंतील 'अरदली, उटंगन व Page' इत्यादि शब्दांच्या भानगडींत जात नाहीं.

विषयभूत शब्दार्थांच्या भ्रामक भरारीत **मालकम** सारख्या भटानें **राणोजी शिंदे** यांच्या [भाळीं] 'शूद्रत्वाची व भाग्योदयाची' भलतीच भर घालून जें कुभांड[३९] उभारिलें आहे. त्याविरुद्ध भालेराई

( ३१ ) हिशेब देवजी पाटील ताकपीर मौजे चिखली प्रांत पुणें शके १६५९ पिंगलनाम संवत्सरे व शिंदे शकावली पान १.

( ३२ ) हिशेब देवजी ताकपीर शके १६५९.

( ३३ ) शिंदे शकावली पान १.

( ३४ ) पत्रव्यवहार भाग २ लेखांक २०१ व भाग ३ लेखांक २३, ७१, ८०, ८१, ८३ व भाग ४ लेखांक ४०.

( ३५ ) पत्रव्यवहार भाग ४ लेखांक ५९.

( ३६ ) पत्रव्यवहार भाग ३ लेखांक ७१, ८३ भाग ४ लेखांक १७ व महेश्वर बातमीपत्रें भाग १ लेखांक ११ भाग २ लेखांक १३९, १९२.

( ३७ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १ टीप २.

( ३८ ) इतिसंग्रह पुस्तक ६ अंक ७ तें ९ भोसल्यांचे कुलाचार पान २७, २८, २९, ३७, ३८.

( ३९ ) Malcolm's Memoirs vol i page 95, 96.

करून भ्रमाचा भोपळा फोडणें मात्र भाग पडतें. शब्दभडिमाराच्या भरीस भुलण्यापेक्षां सरळ भाषेंत असें भासवीत आहे कीं 'अवाली व मवाली पनाह आलीखानदान[४०] राव जयाजी जनकोजी व दत्ताजी सिंदिया' अशी स्पष्ट व समकालीन साक्ष निजामुलल्मुक व नवाब गाजीउद्दीनखां बहादुर यांची इतिहासभक्तांसमोर होणार आहे.

खिद्मतगारीनंतर 'हुजूर पागेचा चंदीचारा देण्याचें काम शिंयांकडे आलें. सकाळीं व सायंकाळीं पागेची वर्दी पेशव्यांस देत होते तरी राणोजीनें खिद्मतगारी सोडली नाहीं म्हणून पेशवे व पागा त्याजवर संतुष्ट राहिली. अर्थातच सर्व पागेची व्यवस्था [पागेदारी] राणोजी कडेच आली. या अवधींत कारकून व कामदार मंडळाशीं घनिष्ट संबंध येऊन सलगी वाढली. दरकदार व सरदार लोकांची मेहरबानी झाली. आणि [बहुधा] बाळाजी विश्वनाथ पेशवे याजबरोबर दिल्लीकडे गेले असावेत असा सबळ भास होतो. कारण तसें नसतें तर १७२३ सांत बुंदेलखंडची स्वतंत्र स्वारी शिंदे [व होळकर[४१]] यासारख्या नवख्या व अपरिचितास मिळणें शक्य[४२] नव्हती. अस्तु. त्याच संधीस एका किल्याच्या लोकांनीं सरकशी केली. त्यांचे विरुद्ध कोणी सरदार जावयास धजेनात म्हणून पेशव्यानीं शिंयांची योजना केली. शिंयांनीं निवडक स्वार सिबंदी घेऊन रामचंद्र मल्हार सुखटणकरांचें चातुर्य व महानुभव पाहून त्यास आपल्या तैनातीस मागून घेतले. रातोरात जाऊन चार दिवसांत किला स्वाधीन केला. त्यामुळें पेशवे फार प्रसन्न झाले. नंतर शिंयास समागमे घेऊन ते खानदेशांत गेले. तेथें राणोजीचें दुसरें लग्न करून दिलें. त्या द्वितीय पत्नीचें नांव चिमणाबाई असें ठेविलें. तेथून गोदावरीवर पोहोंचले. गोंड राजाचे किले घेउन त्यास पंधरा गांवची नेमणूक करून दिली.[४३]

या प्रकारें राणोजीचा उत्तरोत्तर उत्कर्ष होऊन त्यास 'मोकासा, इनाम व पालखी' मिळाली.[४४] किंबहुना १७२४ च्या अखेरीस त्यांना सरदारी[४५] प्राप्त होऊन ते मराठेशाहींत प्रामुख्यानें चमकूं लागले. त्यानंतर माळवा, गुजराथ, इत्यादि स्वाऱ्यांत अत्यंत कावाडकष्ट सोसून तेथें त्यानीं मोठा पराक्रम केला. राणूजिचें धैर्य, धूर्तता व धोरण पाहून माळव्याचा सर्व[४६] कारभार त्यांचे स्वाधीन झाला. किंतु मराठेशाहीची मुतालकी[४७] ही त्यांजकडे आली. याच सुमारें विभागणी होऊन माळव्यांत मराठयांनीं जी मुहूर्तमेढ रोविली त्यांत शिंदे (होळकर व) अर्ध्याचे[४८] भागीदार झाले. अशी या शाहीची निर्मिति आहे.

पहिली वांटणी माळव्यापुरतीच मर्यादित होती असा जो सार्वत्रिक ग्रह[४९] आहे तो वस्तुतः अवास्तव आहे. अधिकांश माळव्याचा होता हें जसें निर्विवाद आहे तसेंच अजमेर व बुंदेलखंड

(४०) क्षिरसागर अप्रकाशित संग्रह.
(४१) होळकरांची कैफियत पान २, ३.
(४२) राजवाडे ऐप्र. खंड २ पृष्ट १३३.
(४३) मोरो लक्ष्मण रानवडे फारसी बखर.
(४४) शिंदे शकावली पान १
(४५) शिंदे शकावली पान १.
(४६) रानवडे फारसी बखर.
(४७) शिंसाधनें भाग १ वंशावली पान ५.
(४८) शिंदे शकावली पान १, २, ३.
(४९) Aitchison Treaties vol iv page 11 & Madhao Rao Scindia page 11.

हे दोन सूभे त्यांत अल्पांशानें समाविष्ट[५०] होतें ही गोष्ट तितकीच निश्चित आहे. या वेळीं शिंद्यांचे विभागास सुमारें ६० लहान मोठे **'महाल' परगणे व सरकार'** आले. त्यांत ९ **राजाशीं संबंध घडला.** पैकीं दोन राजे समाईक असून बाकीच्याशीं **शिंद्यांचा स्वतंत्र संबंध** राहून त्यांचेवर पूर्ण[५१] **स्वामित्व** मिळालें. कांटेकोर कोष्टक न देतां आलें तरी उत्पन्नाचें सरासरी मान ५० ते **६० लक्ष** पावेतों गृहीत धरण्यास मुळींच संकोच वाटत नाहीं. थोडक्यांत सार सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं सांप्रत जितकें राज्य **शिंद्यांचें** आहे त्यापेक्षां तें आधिक न भरलें तरी तें क्षेत्रफलाचे मानानें कमी होतें असें मात्र म्हणतां येणार नाहीं.

हा मुख्य **राणोजी शिंद्या**पुरता विचार झाला. त्यांचे पुत्र व नातु ज्यांनीं **'आजमेर आगरे** हे **दोन सूभे व सर्व मुलकांत चौथाई घेण्याचे जे मोठे यश कोणाच्यानें न जाले ते** [सिद्ध] **करून घेतले**[५२]' ज्यांस **'भारतीय वीर, सर्व प्रकारें दौलतीचे स्तंभ'** अशीं गौरवपर व गुणानुवादपर उपमा स्वयम् **पेशवे**[५३] यांनीं दिली व ज्याचें शिंग बखरकार[५४] जोरानें फुंकीत आहे पण **दुर्दैवानें** [तिकडे दुर्लक्ष झाल्यामुळें दीन व हीन] 'Shadowy figures' अशी **अधुनिक चरित्रकारांच्या**[५५] लेखणींतून आज पुष्पांजली होत आहे त्या **जयाजी, दत्ताजी व जनकोजी शिंदे** या तिघांनीं जी **'वांटणी'** मिळवून **'दौलतींत'**[५६] भर टाकिली ती लक्षांत घेतां हल्लींच्या राज्याहून त्याचें **स्वरूप** केव्हांहीं विराटच दिसेल व **शिंदे** वैराट ठरतील.

**'यजमान दुपटीनें सैन्य** ठेवून तयारी करीत असेत' या संकेतावरून,[५७] **जयाजी शिंदे यांनीं** स्वसैन्य संख्याप्रमाण दुपटीनें वाढविलें तें सर्वच, 'आपली फौज **३० हजार'** या **रामाजी अनंत दाभोळकर**[५८] याच्या निर्देशा प्रमाणें **मारवाडच्या** स्वारींत 'जथलें' असेल असें संभवत **नाहीं.** राज्य संरक्षणार्थ आर्थातच **शिंद्यांची** आणखी निराळी फौज असली पाहिजे. अस्तु. सरासरी प्रमाणाच्या व विचाराच्या दृष्टीनें **राणोजी शिंदे** यांच्या वेळीं **शिंदे**शाही सैन्याचें मान पंधरा हजाराहून केव्हांही अधिकच धरलें पाहिजे.

या वांटणीच्यावेळीं राणोजी **शिंद्यांना** राज्याभिषेक झाला असा ध्वनी ऐकूं येत नाहीं किंवा शोधाधारें सध्यां सांगवत नाहीं. तत्कालीन परिस्थिति पहातां याची शक्यता संभवत नाहीं असें म्हणावें तर राज्यारूढ होताच **'सिक्कामोर्तब'** प्रत्येकाचें बदलतें[५९] आणि उदेपुर **जयपुरादिकांकडून** जे **'टीके**[६०]' येतात त्याला तरी कारण असलें पाहिजे. **नागोर** सारख्या स्वारीत जर हा विधी होतो तर त्यापूर्वीं झाला

---

( ५० ) शिंदे शकावली पान २, ३.
( ५१ ) शिंदे शकावली पान २, ३.
( ५२ ) शिंसाधनें भाग ३ चिंतोकृष्ण वळे जून १७५२.
( ५३ ) सरदेसाई नाना पेशवे पान ५६, १००, १४४.
( ५४ ) भाऊबखर पान १९,४०.
( ५५ ) Madhave Rao Scindia page 12.
( ५६ ) शिंदे शकावली पान ७, ८, ९ शिंसाधनें भाग ३ चिंतोकृष्ण वळे १ जून १७५२.
( ५७ ) शिंसाधनें भाग ३ कुसाजी कोनेर वळे १२ जनवरी १७४६.
( ५८ ) शिंसाधनें भाग ३ रामाजी अनंत दाभोळकर ६ जुलै १७५४.
( ५९ ) शिंसाधनें भाग १ लेखांक २, ३६, ३७, ३८, १४०, १४१.
( ६० ) शिंसाधनें भाग १ लेखांक १४६ टीप १७३.

नसल कशा वरून ? तथापि वांटणीनंतर राज्याधिकार व **राजचिन्हें**[६१] ग्रहण केल्याचा बोध होतों. हें राज्य स्थापन झालें त्यावेळीं **शिंद्यांनीं** आपला जो स्वतंत्र ' **सिक्का** '[६२] चालविला तो मित्रांत, **मांडलिकांत** व **मराठेशाहींत** मान्य झाला. स्वत परंपरागत चिन्हयुक्त **निशाण**[६३] उभारलें व त्याचें संरक्षणार्थ जे स्वतंत्र सरदार निर्माण केले[६४] त्यास ' मानपान[६५] पालख्या[६६] व पदव्या ' देण्याचा प्रघात घातला. आपले स्वतंत्र अधिकारी नेमून[६७] त्यांचे करवीं राज्यशकट चालविलें. स्वतःचीं न्यायखातीं निर्माण केलीं. त्यांसंबंधीं ' **निवाडपत्र** ' उल्लेखनीय आहे. प्रजेची **शिंद्यांविषयीं** काय भावना होती हें स्पष्ट दृगोचर होतें. ' **श्रीमंत महाराज, सरकार व दरबार**' इत्यादि पूज्य भावानें प्रजा त्यांस लेखीत[६८] होती. निवाडपत्रासारख्या कायद्याच्या कागदपत्रांत या शब्दांचा उपयोग होण्यास कारण तरी काय असूं शकतें हें निराळें सांगण्याची आवश्यकता भासत नाहीं.

या राज्यांतर्गत प्रकारापेक्षां बाह्यःस्वरूपाची महती कोणास विशेष वाटत असेल तर त्यां दिशेनें दृष्टी दिली असतां हाच निरंकुश निष्कर्ष निघतो. परदरबारी वकील[६९] **नेमून** त्यांच्या द्वारें प्रत्यक्ष पत्रव्यवहाराचा प्रचार केला. **शिंदे** राजघराण्यांत निधनसमयीं **हरताल**[७०] पडते. मित्र मांडलिकाकडून **नजर**[७१] व **टीकेचा**[७२] व्यवहार होतो. हें **वर्णन** कल्पनातीत वाटत असल्यास त्याचें मूर्तिमंत चित्र कोणाला पाहावयाचें असेलतर तीही इच्छा तृप्त होऊ शकते. **राव** ही संस्कृत उपाधी धारण केली असून ती '**राजा**' ची शुद्ध समानार्थी आहे. मित्र मांडलिकांनीं तर प्रत्यक्ष 'करारमदार' 'तहरह' या सारख्या महत्वाच्या कागदांत तिला मान[७३] तर दिलाच आहे. पण खुद्द पेशवे[७४] **निजाम**[७५] **वजीर**[७६] व गाजीउद्दीनखां या सारख्या माननीय लोकांच्या लेखनींतून ती निःस्खलित उतरली आहे. आणि तेणें करून ती सर्वतोमुखीं झाल्यामुळेंच वारंवार कानीं पडते. ' राव ' हा शब्द जर राजाचा समानार्थी आहे तर **शिंद्यांनीं** स्वतःस ' **राजा** ' कां म्हणून घेतलें नाहीं अशीं शंका निघण्या सारखी आहे. पण तिचें निरसन होणें फारसें कठिण नाहीं. तसें पाहिलें तर ' **राव** ' '**राजा**' यापेक्षांही श्रेष्ठ उपाधी धारण करण्याची पात्रता **शिंद्यांची** होती. व त्याच मानानें त्यांची मातबरी लक्षांत घेऊन त्यांची मान मर्यादा मोंगल दरबारांतून राखली जाऊन आगतस्वागत झालें आहे. अशी जी

( ६१ ) शकावली पान १ व शिंसाधनें भाग ३ चिंतोकृष्ण वळे १ जून १७५२.
( ६२ ) शिंसाधनें भाग १ लेखांक २, ३८, १४१, २२३ २६८.
( ६३ ) शिंसाधनें भाग १ वंशावली पान ९.
( ६४ ) पारसनीस ब्रम्हेंद्र स्वामी चरित्र लेखांक २७, २००, २०७, २१०.
( ६५ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १८६.
( ६६ ) शिंसाधनें भाग २ लेखांक ४२.
( ६७ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १९ टीप ३५.
( ६८ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १०७.
( ६९ ) राजवाडे खंड १ लेखांक ६१, २०५ शिंसाधनें भाग १ लेखांक १, २, ३, ७१.
( ७० ) शिंसाधनें. भाग १ लेखांक १४३ टीप १७१.
( ७१ ) शिंसाधनें. भाग १ लेखांक ५६.
( ७२ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १४६ टीप १७३.
( ७३ ) शिंसाधनें भाग २ लेखांक ५१, ६६.
( ७४ ) पुरंदरे भाग १ लेखांक ३९६.
( ७५ ) निजाम आसफजहां १७५८,
( ७६ ) गाजीउद्दीनखां वजीर जुलै १७५२.

ऐतिहासिक सामुग्री उपलब्ध झाली ती पुढें तिसऱ्या भागांत प्रत्यक्ष[७७] पाहावयास मिळणार आहे. त्यावेळीं मजप्रमाणेंच इतिहासभक्तांची सुद्धा बालंबाल खात्री होईल.

राणोजी शिंद्यांनीं या घराण्याचा उत्कर्ष केला असें इतिहास बोलतो तेव्हां हें विषयावडंबर निरर्थक वाटत असेल तर त्याबद्दल इतकेंच निवेदन करीत आहे कीं बखरी, इतिहास व संशोधन या परस्परांत एकवाक्यता नाहीं. बखरी व इतिहास यांस मागें सारून संशोधन पुढें सरसावलें आहे. मतभेद इतका तीव्र झाला आहे कीं **शिंदे [ होळकर व पवार ]** यांस **श्रीमंत सरकार महाराज दरबार** तर कोणी लेखीतच नाहीं पण **'सरदार'** या सदरा खालीं सुद्धां घेण्यास संकोच[७८] वाटतो. नुसतें **सेनापती** असें संबोधिलें जातें. सत्तेचें केंद्रीकरण करण्याचे भरारींत या भाग्यशील **भागीदारा**विषयीं जी भूल **पडते** त्यासंबंधीं संशोधकांचेच तंत्रमंत्रानुसार त्यांची निभ्रांति केली पाहिजे. 'पंच सहस्त्री **सेनापती नेताजी पालकर**' यास स्वराज्यांत जर **राजे** ही संज्ञा समर्पित[७९] करतां येत होती तर त्याच **शिवाजीचें** साम्राज्यरूपी स्वप्न सिद्ध करून दाखविण्याचें शील सामर्थ्य व सत्ता धारण करणारे शूर **शिंदे ( होळकर व पवार )** या पुरतीच शंका कां यावी ? **सरदार** संबोधण्याचाच कोणास सराव असला तर **शिंद्यांच्या सरदारी**ला दौलत[८०] म्हणण्याचा जो राजरोष सांप्रदाय पेशवाईत होता तो अनुकरणीय होय. प्रमाणानुगामी संशोधकांची शंका निरसन झाली म्हणजे मराठी घोडें गंगेस न्हाल्याचें पुण्य तरी पदरी पडेल.

दुसरा एक मानभावी पंथ निर्माण झाला असून त्याची पुंगी वेगळीच वाजते. **राणोजी** किंवा त्यांचे पुत्रपौत्रादि यांची ही **शाही** स्वार्जित **दौलत** नसून **मुसलमानी गादी** आहे व ती **मोगलाच्या** अनुग्रहानें आणि **फकीराच्या** आशीर्वादानें **महादजी शिंदे** यांना अनपेक्षित प्राप्त झाली अशी कोटि किंवा सुभाषित विनोद नव्हे तर डंक्याची चोप[८१] ऐकू येते. हा नाद कोणता ? डंका, डफ कीं भेरी ! याचा उमज पडेना. याविषयीं शोधांति जो बोध झाला तो दर्शवीत आहे. केवळ आपल्या धैर्य, धूर्तता, व धुरंधरता यांचे बळावर ही **शाही राणोजी शिंदे** यांनीं उभी केली तरी ती **कुलदेवते**च्या कृपेनें लाभली अशी त्यांची **'सिक्केमोहरी'**[८२] साक्ष आहे. त्यांत भर टाकणारे त्यांचे 'भारतीय **पुत्र**'मुक्त कंठानें त्या अंखड **'ज्योतिस्वरूपाचें'**[८३] ध्यान करीत आहेत. इतकेंच नव्हे तर **'श्रीमंताचे सेवक होउन बादशाहा स्थापिले'** असा अभिमान करणारे[८४] व फकीराचा प्रादुर्भाव झालेले **महादजी शिंदे** निष्कपट भावानें त्याचीच आराधना[८५] करीत आहेत. फार काय **'श्रीनाथा'** सिवाय[८६] **मोगली** मान मान्यतेचा प्रभाव त्यांचेवर होऊं शकला नाहीं आणि तीच परंपरा आजही अव्याहत[८७] पाहावयास मिळते.

( ७७ ) शिंसाधनें भाग ३ चिंतो कृष्ण वळे १ जून १७५२.
( ७८ ) राजवाडे ऐप्र. खंड १ पान ४९।५०.
( ७९ ) राजवाडे खंड १५ लेखांक २८२ व खंड १८ लेखांक ५७.
( ८० ) शिंदे शकावली पान ८, ९ व नाना पेशवे पान ५६.
( ८१ ) Gwalior City Municipal Address 6th March 1929.
( ८२ ) शिंसाधनें भाग १ लेखांक २ तें ३७.
( ८३ ) शिंसाधनें भाग १ लेखांक ३८, १४०, १४१ तें २२२. २५४ तें २५६, २६८.
( ८४ ) शिंसाधनें भाग १ लेखांक १ टीप २.
( ८५ ) श्रीमंत महादजी शिंद्यांचीं अप्रकाशित पत्रें.
( ८६ ) परिशिष्ट २ सिक्का वकील मुतलकी.
( ८७ ) श्रीमंत दौलतराव, जनकोजी, जयाजी, माधवराव व विद्यमान जिवाजीराव शिंदे यांचे सिक्क्यात हीच परंपरा चालू आहे.

राणोजी शिंदे यांनीं गुरुदिक्षा कोणाची घेतली हें जरी कळत नाहीं तथापि ब्रम्हेंद्र स्वामीचा समागम[८८] त्यांस होता असें स्पष्ट आहे. तसेंच ज्ञानी या महापुरुषाचें सानिध्य[८९] जयाजीस होतें. या पिता पुत्रांचा श्रीमंसूरशाहाशीं संबंध होता असें साधन मात्र सांपडत नाहीं. श्रीमंसूरशाहांसंबंधा शब्द काढण्यापूर्वी एक मनोरंजक गोष्ट सांगाविशी वाटते.

माळव्यांत आगर मुकामी श्रीबैजनाथ महादेवाच्या मंदिराच्या जीर्णोधाराविषयीं अशीं कथा प्रचलित आहे कीं तेथें जें सैन्य छावणीस होतें तें लढाईवर गेलें असतां त्यावरील युरोपियन अधिकारी [जो क्याप्टन] होता त्याच्या स्त्रीस पतिचिंता उत्पन्न होऊन तिनें पुजारी व भक्तजन यांच्या उपदेशावरून नवस केला कीं पति सुरक्षित आला तर मी जीर्णोधार करीन. श्रीकृपेनें तिचे मनोरथ सफल झाल्यानंतर तिनें आपल्या नवऱ्याकडून जें भव्य मंदिर उभारविलें तें आजही विद्यमान आहे. कल्पना करा कीं जीर्णोधाराचें वर्णन करतां. After all he wasa Hindoo Captain.

असें म्हटलें तर शोभेल काय? हीच भावना नबाव जंजिऱ्याची ब्रम्हेंद्रस्वामिचे ठायीं[९०] होती. त्यामुळें त्यांचे नवाबीस नवीनत्व कोणतें आलें? तोच प्रकार महादजी शिंदे व श्रीमन्शूरशहा यांचा आहे. हा मुसलमान भगवत्भक्त शिंद्यास पावला[९१] यासंबंधीं शंकाकुशंका घेण्याचें कारण नाहीं. पण ही गादी मुसलमानी गाजेल असें वचन घेतल्यासिवाय तो पावला नाहीं असा कोठें आधार नाहीं. कदाचित् सांपडला तरी संत महात्मे असें करीत नाहींत असें सरळ सांगितलें असतें. अस्तु. त्यांचे ठायीं प्रथम अण्णपूर्णाबाई यांची श्रद्धा[९२] जडली व तिचा प्रादुर्भाव शिंद्यावरही[९३] झाला हें स्पष्ट आहे. दिलेल्या उताऱ्यावरून तो महादजी शिंद्यांचा किंवा त्यांचे पत्नीचा गुरु होता हे मात्र संदिग्ध[९४] आहे. निदान श्रीसाहेबाचा इतिहास तरी याविषयीं स्पष्टता करीत नाहीं.[९५] असो शिंदे त्याचें जिवंतपणी[९६] दर्शनाचा लाभ घेत असून देवलोक झाल्यानंतर त्याच्या समाधीच्या[९७] दर्शनास जात असत. किंबहुना 'भाद्रपद वद्य द्वितीयाचे दिवशीं श्रीसाहेबाचा मुख्य दिवस' प्रेमानें साजरा[९८] करीत असत यांत तिळमात्र संदेह नाहीं. आणि तीच प्रथा आजही चालू आहे. पण त्यामुळें शिंद्यांची गादी मुसलमानी झाली किंवा भक्तिच्या भरांत शिंद्यांनीं आपल्या कुलस्वामी,[९९] देवी,[१००] देवता[१०१] व देवस्थानादिकांस[१०२] रामराम ठोकला असें सिद्ध होत नाहीं. उलट स्वारी शिकारींत ज्या

(८८) ब्रम्हेंद्र स्वामी पान १२० लेखांक १७७, १७८, २९८.
(८९) शिंसाधनें भाग १ लेखांक ६२.
(९०) ब्रम्हेंद्र स्वामी लेखांक २४२, २४३, ते २५३.
(९१) परिशिष्ट ३ लेखांक १०, १९ व पत्रव्यवहार भाग ३ लेखांक ३.
(९२) ताजा. भाग १ पान १ व परिशिष्ट ३ लेखांक ५.
(९३) परिशिष्ट ३ लेखांक १, ४, ८, ९, १०, ११, १४, १५, १६, १८, १९.
(९४) परिशिष्ट ३ लेखांक १, १०, १८, १९.
(९५) ताजा भाग १ पान १.
(९६) परिशिष्ट ३ लेखांक १.
(९७) परिशिष्ट ३ लेखांक ३, ११, १८.
(९८) परिशिष्ट ३ लेखांक १०, १९.
(९९) परिशिष्ट ३ लेखांक ३, ४, ६, ७, १२, १३, १४, १५, १६, १७, २०, २१, २२, २३.
(१००) परिशिष्ट ३ लेखांक ४, ८, ९, ११, १३, २१.
(१०१) परिशिष्ट ३ लेखांक २, ऐटि भाग ३ क्रमांक ४५ व बातमीपत्रें भाग २ लेखांक १७५.
(१०२) बातमीपत्रें भाग २ लेखांक १७५ व ऐटि भाग ३ क्रमांक ४५.

देशांत ते गेले व तेथें ज्या ज्या साधुसंताशीं समागम[१०३] घडला त्यांचा तितकाच नव्हे तर किंचित विशेष प्रेमानें परमार्ष घेऊन आपल्या अलौकिक, धार्मिक व पारमार्थिक प्रवृत्तीची प्रचिती देतात असें कोण बरें म्हणणार नाहीं ? राज्याभिषेकानंतर देवदर्शनाकरितां श्रीपंढरपुराकडे निघोन तेथून शिंद्यांचें कुलदैवत जें जोतिर्लिंग त्याचें दर्शनास जातात आणि आपले पूर्वजांचा किता गिरावितात. हाच किता दौलतराव शिंदे गिरवीत आहेत.[१०४]

**फकीरी** व **मुसलमानी** या शब्दांची सूक्ष्मता सज्जनांस सांगण्याची जरूर नाहीं. वेडीवाकडी लकीर न मारता **'फकीरी बाणा'** सुशोभित केला असतां तर गोष्ट वेगळी होती. तसें पाहिलें तर 'जोगी निर्वाण **फकीरी बाण्याचा ढोल**' वाजविणरे **ढोलीबुवा** यांचा **मठ मुसलमानी** आहे असें कोणी विचारवान म्हणेल काय ? किंवा याच **गालवगडाचें** आश्रयास राहाणारा **ऐनशहा** या **फकीर** व कवी संतानें आपलीं ईशभक्तिपर कवनें व स्तवनें आजन्म **हिंदीतच**[१०५] केलीं म्हणून तो मुसलमान **नसून हिंदू** होता असें सांगतां येईल काय ? किंवा कसला तरी बादरायण संबंध लावून आम्ही सर्वांना गादीवर बसवितो म्हणून सर्व **हिंदू मुसलमानाच्या** गाद्या खिश्चियन झाल्या असें **सुज्ञ इंग्रज** म्हणतील काय ?

कदाचित कोणी असें म्हणेल कीं 'नागरीसभेच्या मानपत्रांतील' या वाक्याविषयीं[१०६] विकारवशता किंवा वैशम्यता कां वाटावी. वस्तुत: हीच चितवृत्ति माझीही आहे. नवीन पुंगी फुंकण्याचा तालसुरांत चमत्कारिक तान मारून **तानसेन** म्हणवू पाहणाऱ्यांची विकारवशता आहे किंवा **शिंद्याच्या सच्छील** व पवित्र परंपरेचा परिचय[१०७] देणाऱ्याची विवशता आहे व त्यांत वैषम्यतेचें वारें कोठें व कितपत विहार करीत आहे यावद्दल गीतामुखेंच निवाडा होईल अशी आशा आहे.

शेवटीं इतकीच विनंती आहे कीं **महादजी शिंदे** हें 'नांव[१०८] ऐकतांच ग्रंथांचे ग्रंथ मनांत येतात पण या वेळपर्यंत केलेल्या 'बहुवाचकपणामुळें' एवढेंच सांगतो कीं **शिंद्यांत** हें नांव मोठें महत्वपूर्ण आहे दक्षिणेंत **पाटीलकी** करून या शाखेस **नामाभिदान** देणारा पाहावा तर **महादजी**, आपली परंपरा रक्षून प्रगतिपर शास्त्रीय सुधारणेचा प्रचार करणारा तरी **महादजी** आणि **पाटील** पदवी धारण करून **'सूर्यासारखा**[१०९] प्रताप करणारा **शिवरायाचें** साम्राज्यरूपी स्वप्न सत्य[११०] करणारा व **विक्रमाजितानंतर सार्वभौमत्वाचे** नगारे वाजविणारा[१११] पहावा तरी तो **महादजीच !** त्याचे 'घरी जें राजकारण खेळत[११२] होतें' त्यांचें दिग्दर्शन करण्याचा सुयोग कधीं तरी लाभेल म्हणून तत्संबंधीं भाषण एथेंच समाप्त करीत आहे.

---

(१०३) ऐटि भाग ५ क्रमांक ४ व जिवबा बक्षी भाग ८ पान १०४ ते १०७.
(१०४) जिवबा बक्षी लेखांक ११९.
(१०५) ऐनशाह फकरिकृत अप्रकाशित वाङ्मय.
(१०६) Gwalior Municipal Address. 6th March 1929.
(१०७) शिंसाधनें. भाग १ लेखांक ३ टीप ८.
(१०८) इतिसंग्रह ऐटि भाग १ क्रमांक १३.
(१०९) पत्रव्यवहार भाग ४ लेखांक ८६ व भाग ५ लेखांक ६१.
(११०) भाइसं मंडळ चतुर्थ संमेलन पान ८७.
(१११) इतिसंग्रह ऐटि भाग १ क्रमांक १३.
(११२) पत्रव्यवहार भाग ३ लेखांक १०३.

# कन्हेरखेडकर शिंदे याची वंशावळी.

## मूळपुरुष महादजी पाटील शिंदे.




† वंशविस्तार कळत नाहीं.

* पुढे वंश चालू.

$ एका जुन्या वंशावळीच्या आधारें सदभ दर्शविला असून असल पत्र पुढें येणार आहे त्या वेळीं या शाखेचा संबंध निश्चित होईल.

श्री मंत महादजी शिंदे यांच्या
वकील मुतलकीचे सिक्के.




१




२

श्री

लेखांक [१] **राघो शंकर**

यजमान गुरू दर्शनास बीडास गेले होते ते त्रिती [ये] स येथें दाखल जाले.

---

लेखांक [२] **बालाजी जनार्दन** २२ मार्च १७७५

रविवारी डाकूरास मुकाम जाहला. श्री रनछोडरायजी मुख्य द्वारकेहून येथे आले आहेत, त्याचे दर्शन घेऊन इंदुवारी कूच होउन या मुकामी आलो.

---

लेखांक [३]

जलदच पुढे रवाना होतील. मागाहून देवदर्शन घेउन आणखी फौजेचा सरंजाम करून खासा स्वारीही येउन पोंहचेल.

---

लेखांक [४] **बाळाजी जनार्दन** १८ नवंबर १७७६.

श्रीमंत येजमान येथून आज्ञा घेऊन श्री तुलजापुरास देवदर्शन घेउन बीडास जाउन तसेच मालव्यांत यावे.

---

लेखांक [५] **बाळाजी जनार्दन**

श्रीमंत येजमानाचा कुटुंबघात झाला. ईश्वरे अनुचित गोष्ट केली. हे वर्तमान आपणास लिहलेच होते. श्रीमंतास या दौलतींत असी स्त्री पुन्हां मिळणे दुर्घट आहे. कोणेही गोष्टीत न्युन्य नव्हती. शहाणपण, करतेपण सर्वांचे मनोधरण राखणें, स्वरूपे करून सर्व गोष्टीस दक्ष होती [तिचा] तसा प्रकार जाहला. संतान तरी वाचेल म्हणून भरंवसा होता. ते पंचवीसा दिवसा निवर्तले. येजमान आपले चित्तांत खिन्न आहेत. कनिष्टेसी प्रशस्त, हा प्रकार घडल्यापासून नाहींत. हे दिवस गेल्यावर लग्नाची तरतूद होईल. आपणास कळावे.

---

लेखांक [६] **बाळाजी जनार्दन** २९ जनवरी १७७९.

दोन्ही देवाची दर्शने घेउन पुरंदरास येणार. कामें उरकोन निरोप घेतील.

---

लेखांक [७] **बाळाजी जनार्दन**

फौजसुद्धां येजमान देवदर्शनास जातील. रामचंद्र गणेश करवीरच्या शहास आहेत.

---

लेखांक [८] **बाळाजी जनार्दन**

चार महीने हूजुर रहावे, देवदर्शन घ्यावीसे आहे. येविसीं पेशजी लिहिले पंढरपुर, तुळजापुर [व] बीड ही देवदर्शनें घ्यावीं, तदनंतर राजकरणी विचार जसा पडेल तसे करावे.

---

लेखांक [९] **बाळाजी जनार्दन** १७ मे १७७९

वृतबंधाचा समारंभ जाहल्यावर तुळजापुरची देवी व बीड येथील देवाची दर्शने घेउन बराणपुरचे छावनीचा निश्चये ठरल्यास तिकले स्वारी येईल.

---

लेखांक [१०]

भाद्रपद वद्य व्दितियेस श्री साहेबाचा मुख्य दिवस आहे या करितां स्वारी पुण्याहून सत्वरच येत आहे. साहित्याची तरतूद करून ठेवणें. [म्हणून आज्ञा आली] त्यास स्वारी सत्वरच यावीसी आहे.

---

लेखांक [११]

१९ नवंबर १७७९

आठा दिवसी स्वारी श्रीमंताची देवदर्शनास बीड, तुळजापुर [व] पंढर [पुर] येथे जाणार. देवदर्शन करून मास पक्षांत माघारे येथे यावे. पुढें स्वारी शिकारी मोहीम जसी पहावी तसी करावी हा विचार आहे.

---

लेखांक [१२]

श्रीमंत येजमानसाहेब श्रीच्या दर्शनास आठ पंधरा दिवसात जाणार आहेत. दर्शन करून माघारे येथेच यावे नंतर मोहिमेचा विचार.

---

लेखांक [१३] **बालाजी गोविंद** १८ अप्रेल १७७८.

'झाडून फितूरी राज्यात होते त्याची पारपत्ये झाली. याउपरी तिकडे यावयाची त्वरा आहे. सरकारची वस्त्रे सुधा घेतली आहेत. **देवयात्रा तुलजापुर, पंढरपुर** करून त्या प्रांतास येणे होईल.'

---

लेखांक [१४] **बालाजी गोविंद**

'**श्रीमंत यजमानाचे** लग्नास्तव **संगमनेरास** आलो होतो. लग्न मार्गशीर्ष वद्य दशमीस जाहले. तेथून कूच होऊन या मुकामी आले. कांहीं कामकाजामुले सात आठ मुक्काम येथे जाहले. उद्ईक कूच आहे. कूच होऊन **बीडाकडे** जातील. तेथे **देवदर्शन** घेउन **रत्नागिरीस** जातील. तेथील **श्रीचे** दर्शन घेऊन **पुरंदरास** येऊन त्याचा निरोप घ्यावा.'

---

लेखांक [१५] **बालाजी गोविंद**

'येथील वर्तमान **श्रीमंत येजमान बीडास** गेले होते. तेथील गुंता **दर्शनाचा** उरकोन माघारा **जांबगांवी** जातात.'

---

लेखांक [१६] **बालाजी गोविंद**

'इकडील कामाकाजाचा गुंता फार करून उरकलाच आहे. **देवदर्शनास बीडास** व **रत्नागिरीस** जातात. तेथून **पुरंदरास** येऊन निरोप घेऊन **श्रीमंताची** स्वारी तिकडे सत्वरच येईल.'

---

लेखांक [१७] **बालाजी गोविंद**

इकडील कामाकाजाचे कितेक बंदोबस्त करावयाचे आहेत. ते बोलण्यात येउन आठ पंधरा दिवसांत निश्चयात आले ह्मणजे **श्रीमंत येजमानसाहब** येथून निरोप घेउन **देवदर्शनास** निघणार. देवदर्शन जाहली ह्मणजे स्वारी तिकडे यावी असा उद्योग आहे.

---

लेखांक [१८]

येथून **श्रीगुरूचे समाधीच्या दर्शनास** जावयाचा विचार आहे. तेथून माघारे आल्यावर आणखी मंगल होउन मग **श्रीच्या** दर्शनास जातील.

---

लेखांक [१९] **बाळाजी गोविंद**

श्रीमंताची स्वारी पुण्यास गेली होती. तेथे आठ दिवस राहून आवघे जाबसाल उरकोन भाद्रपद कृष्ण द्वितियेस **श्रीसाहबाचा मुख्य दिवस** होता याजमुळे आटपून आले.

---

लेखांक [२०]

यासीही **श्रीच्या दर्शनास** जावयाचा **नवस** त्याअर्थी भाद्रपद आश्विन मासी जातील.

---

लेखांक [२१]

श्रीमंत येजमान **श्रीच्या दर्शनास** आले. येथील समारंभ जाहला. एका दोन दिवसांत येथून कूच होऊन दर मजल **तुळजापुरवरून श्री रत्नागिरी** जावे, **देवदर्शनाचा** गुंता उरकावा.

---

लेखांक [२२] **आबाजी रघुनाथ निगडीकर** ७ सितंबर १७७७

सो **बाळाबाईचे** लग्न कर्तव्य होते यास्तव **श्रीचे दर्शन** मात्र करून स्वारी माघारे येउन येथे छावनी जाहली.

---

लेखांक [२३]

तिकडे कोणी समागमे देउन रवाना करावी, मग देशी **देवदर्शनास** जाउन **देवदर्शन** करून माघारे यावे हा विचार आहे. घडेल ते खरे.